

नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

चित्रकार दीनानाथ दलाल ह्यांनी सन १९४७ ते १९७१ दरम्यान प्रसिद्ध केलेल्या दीपावली ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीय स्वरूपात जतन करण्याबाबतचा प्रस्ताव चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे राज्य मराठी विकास संस्थेस प्राप्त झाला होता. सदर प्रस्तावानुसार दुर्मिळ मराठी ग्रंथांचे संगणकीकरण ह्या प्रकल्पांतर्गत दीपावली नियतकालिकांचे अंक संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात राज्य मराठी विकास संस्थेद्वारे सहमती दर्शविण्यात आली.

चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला ही सामग्री संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहे.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

आनंदी आजीबाईची गोष्ट...

वास्तविक तिचें नांव 'आनंदी' नव्हे, परंतु
ती नेहमींच हंसतमुख आणि समाधानी दिसे
म्हणून तिला 'आनंदी' आजी म्हणत असत.
आतां तर पहिल्या नातवाच्या
जन्मानें तिच्या आनंदाला पारावारच राहिला नाहीं !
आणि तिचें 'आनंदी' नांव सार्थ झालें.

## कशांत आहे तिच्या आनंदाचें गुपित ?

इतकीं वर्षे प्रपंचाचा गाडा यशस्वी रीतीनें
चालविल्याचें समाधान ह्या आनंदाच्या मुळाशीं
आहे. योजनापूर्वक बचतीवर भर देऊन
केलेली कौटुंबिक खर्चाची आंखणी आणि
व्यवस्थित व नेकीनें केलेला संसार,
यामुळेंच आयुष्यांतील कसल्याहि
अडचणींना ती आत्मविश्वासानें तोंड देऊं शकली.

खर्च करण्यापूर्वीच
बचत योजनापूर्वक केली पाहिजे.
तुमच्या मिळकतींतून ठराविक
रकम शिल्लक टाकली नाहींत तर कदाचित्
सर्व पैसे खर्च होतील.

**दी बँक ऑफ इंडिया लि.**


















अनुक्रमणिका




## श्रेयनामावलि —

*बहुरंगी कलाकृति : वसुंधरेचें स्तन्य उसळलें :–* तेजस्विनी सिंधु ■ विलासिनी यमुना ■ तपस्विनी गंगा ■ शुभांगिनी सरस्वती ■ प्रमद्वरा नर्मदा ■ तीर्थरूपा गोदावरी.

*भारतीय दिव्य महोत्सव :* एक वेफाम विनोदी राजकीय व्यंगचित्रमालिका.

*आंतरभारतीय प्रेमा तुझा रंग असा :* एक पोटस्फोटक रंगीढंगी विचित्रमालिका.

*लेखकांच्या नाना कळा :* खास दिवाळीचे लवंगी फटाके : काव्य—शां. शं. रेगे

*रात्रंदिन आम्हां युद्धाचा प्रसंग :* इमर्जन्सी तुडतुड्या व फुलबाज्या.

*साहित्य :* ■ पु. ल. देशपांडे ■ पु. भा. भावे ■ अरविंद गोखले ■ चित्रकार द. ग. गोडसे ■ अच्युत बर्वे ■ कुसुमाग्रज ■ बा. भ. बोरकर ■ वामन चोरघडे ■ शिरीष पै ■ शामराव ओक ■ बाळ सामंत ■ जयवंत दळवी ■ विजय तेंडुलकर ■ श्रीराम कामत ■ गोपाळकृष्ण भोबे ■ वसंत सबनीस ■ विजया राजाध्यक्ष ■ पद्माकर गोवईकर ■ डॉ. दमयंती सरपटवार ■ आनंद साधले ■ सिनिक् ■ सरोजिनी बाबर ■ मंगेश पाडगांवकर ■ वृंदा लिमये ■ मधुकर केचे ■ निर्मळा देशपांडे ■ मधुकर कोसारे ■ केशव मेश्राम



■ रंगीत छपाई : प्रिमिअर ऑफसेट वर्क्स, मुंबई. जगदीश्वर प्रिंटिंग प्रेस व आशा प्रिंटरी, मुंबई. ■ मुद्रणस्थळ : मौज प्रिन्टिंग ब्यूरो, खटाववाडी, मुंबई ४; आवाज प्रिंटर्स, मोदी चेंबर्स, फ्रेंच ब्रिज, मुंबई ४. ■ ब्लॉक्स : बॉम्बे प्रोसेस स्टुडिओ, प्रभात प्रोसेस स्टुडिओ, मुंबई.

**"दीपावली'चा पुढील अंक १ नोव्हेंबरला प्रसिद्ध होईल.**



# दीपावली




**दलाल आर्ट स्टूडिओ**

४२, केनेडी ब्रिज, मुंबई ४

टेलिफोनः ७७७६५ ★ तारेचा पत्ता : DALALART


● **वर्गणीदारांस सूचना** : दीपावली व सर्व खास अंकांसह दीपावलीची वार्षिक वर्गणी रु. १२–५० न. पै., द्वैवार्षिक वर्गणी रु. २०; त्रैवार्षिक वर्गणी रु. २५ व चार वर्षांची वर्गणी रु. ३२. परदेशीं वार्षिक वर्गणी रु. १३–००

● **वर्गणी मनिऑर्डरनें यावी.** चेक पाठविल्यास तो दलाल आर्ट स्टूडिओच्या नांवें, मुंबई बँकेवरचा असावा. इतर ठिकाणच्या बँकेवरचा असल्यास ७५ न. पै. वटणावळ जादा पाठवावी. कोणत्याहि महिन्यापासून वर्गणीदार होतां येतें.

● **अंक न पोचल्याचें** कळवावयाचें झाल्यास १ तारखेपर्यंत वाट पाहून मग कळवावें. अंक ऑफिसमध्यें शिल्लक असल्यास जरूर पाठविला जाईल.

● **जाहिरातींचा व्यवहार** हा परस्परविश्वासाचा असतो. गिऱ्हाईकांच्या इच्छेनुसार जाहिरात छापण्याची कोशीस करण्यांत येते. तरीहि तांत्रिक अडचणीमुळें अगर अन्य कारणामुळें जाहिरातींत कमीजास्त फरक झाला तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकांवर नाहीं.

● **साहित्याच्या स्वीकृतीचा** निर्णय महिनाभरांत सामान्यतः कळविला जातो. पोस्टेज असलेलें नापसंत साहित्य परत पाठविलें जातें. पुरेसें पोस्टेज नसल्यास तें निकालांत काढलें जाईल.

● **स्वीकृत अगर इतर साहित्य** गहाळ झालें तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकांवर नाहीं.


संपादक, मालक, मुद्रक व प्रकाशक श्री. दीनानाथ दलाल यांनीं आवाज प्रिंटर्स, मोदी चेंबर्स, फ्रेंच ब्रिज, मुंबई ४ येथें छापून, दलाल आर्ट स्टूडिओ, ४२ केनेडी ब्रिज, मुंबई ४ येथें प्रसिद्ध केलें.


## अभीष्टचिंतन—



*गेल्या वर्षीची दिवाळी ! ! कोणताहि भारतीय वर्षापूर्वीचे ते दिवस विसरणार नाहीं. उत्तर सीमेवरच्या हिमावरचे रक्ताचे डाग अजून पुसले गेलेले नाहींत. पिवळ्या नरकासुराची काळीकुट्ट छाया विराटशक्तीच्या साहाय्यानें भारतीय जवानांनीं हटविलेली असली, तरी सबंध राष्ट्राची विस्कटलेली घडी सुस्थिर होण्याकरितां गेलीं सतरा वर्षे रक्ताचें पाणी करून आपण जेवढे परिश्रम केले तेवढ्याच परिश्रमांची पुन्हा जरुरी आहे. आणीबाणीची परिस्थिति अजून संपलेली नाहीं.*

*कोणतेंहि राष्ट्र आपल्या नैतिक बळावरच उभें असतें. साहित्य–संगीत व कला या तीन गोष्टी या बलाची वाढ करीत असतात. या कलांना सातत्यानें राबवून आम्ही आमच्या नैतिक बलाची वाढ करूं. वर्धिष्णु साहित्याची, संगीताची व कलेची आपल्याला आज जरुरी आहे. या तिहींचें पीयुष प्यालेला आपला भारतीय जवान पिवळ्याच काय, पण कोणत्याहि नरकासुराचा चुटकीसरशीं वध करील.*

*दीपावली वार्षिक गेलीं १९ वर्षे राष्ट्राच्या अभ्युदयाला साहित्य-कलेच्या संगमानें हातभार लावीत आहे. सेवा, भावना आणि व्यवहार या तिहींची सांगड समप्रमाणांत असावी असें भारतीय तत्त्वज्ञान सांगतें. यांतील पहिल्या दोन गोष्टी दीपावलीनें निष्ठेनें मनोमन पाळलेल्या आहेत हें आम्हीं सगर्व सांगतों आणि प्रामाणिक वाचकहि तें बिनदिक्कत कबूल करील.*

*नवीन योजना म्हणून यावेळीं बेफाम विनोदी अशा दोन व्यंगचित्रमालिका आम्ही सादर करीत आहोंत. त्याचप्रमाणें रंगीत चित्रमालिकांत भारतीयांच्या जीवनदात्यांचीं चित्रणें आम्हीं मुद्दाम दिलेलीं आहेत. चोखंदळ वाचकाला या तिन्ही मालिका आवडतील अशी खात्री आहे. या व अशा अनेक योजनांचें मूर्त स्वरूप, म्हणजे अनेक इष्टमित्रांचें साहाय्य. त्याशिवाय संकल्पांना सिद्धि प्राप्त होणार नाहीं. कामाचा डोंगर पुढें उभा असतांना आपलें खास ठेवणींतलें साहित्य दीपावलीसच द्यायचें असें आपलेपणानें ठरविणारे श्री. पु. लं. देशपांडे, श्री. पु. भा. भावे, दीपावलीच्या सर्व योजनांना नेहमींच आपला हातभार लावणारे श्री. शां. शं. रेगे, श्री. अच्युत बर्वे, श्री. बाळ सामंत व श्री. गोपालकृष्ण भोबे या सर्व हितचिंतकांचें साहाय्य तर केवळ अमोलिक. या प्रसंगी ज्यांचा बहुमोल सल्ला आणि मनःपूर्वक सहाय्य मिळत असे ते आमचे ज्येष्ठ मित्र कै. श्री. भाऊसाहेब तथा स. आ. जोगळेकर यांची आठवण होणें अपरिहार्य आहे—दीपावली 'घडविण्यांत' त्यांचा केवढा हात होता याची रसिक वाचकांस जाणीव आहेच.*

*'टॉम अँड बे'चे मॅनेजिंग डायरेक्टर व आमचे परमामित्र श्री. गणेशराव तांबे यांच्या सहकार्याचा हात आमच्या बाबतींत सदैव सढळ असतो. त्यांचे आभार मानणें कृत्रिमपणाचें होईल. दीपावलीचे व त्यांचे संबंध एकजीव आहेत. श्री. दाभोळकर, गेलीं १९ वर्षें आमचे साहाय्यक.*

*रंगीत छपाई प्रिमियर ऑफसेट वर्क्स, आशा प्रिंटरी व जगदीश्वर प्रेसमध्यें झालेली आहे. त्यांचे चालक श्री. शहा, श्री. मालपेकर व श्री. [illegible]चंद्र पाठक यांनीं सुबक सुंदर छपाईसाठीं सर्वस्व पणाला लावल्याबद्दल आभार. मौजेचे श्री. विष्णुपंत भागवत व कामगार वर्ग, आवाज प्रिंटर्सचे श्री. पाटकर या सर्वांचे आभार मानावे तेवढे थोडेच. बॉम्बे प्रोसेसचे श्री. कामत, प्रभातचे श्री. कडव यांनीं सर्व तऱ्हेच्या ठशांचे आत्मीयतेनें काम केलें. वितरण सफाईनें करण्यांत नामवंत असलेले श्री. बाबुराव बागवे यांचें दीपावलीवरील प्रेम अबाधित आहे. या सर्वांचें या मंगलप्रसंगीं अभीष्टचिंतन करतों.*

*याशिवाय कार्यालयांतील श्री. परब, श्री. देसाई, श्री. मधुकर कोसारे, श्री. आठवले, व गणपत या घरच्या लोकांच्या आपुलकीच्या साहाय्याबद्दल ऋणी आहें.*

*शेवटीं आभार वाचकांचे. दीपावलीवर एकनिष्ठ प्रेम त्यांचें, म्हणूनच एकोणीस वर्षांचा प्रवास सुलभतेनें झाला.*

**—दीनानाथ दलाल**









# खाकी ..............

कुसुमाग्रज



खाकीमधलें असेंच हें मन–
तारतम्य वा सूज्ञपणाचा
            विचार तेथें विरून जातो

खाकीमधला देह असा हा
पृथ्वीमध्यें पिरगळलेले सर्व तणावे
            क्रूरपणानें

तोडुनि सारे अपुल्या आपण
उन्मादाच्या अशा क्षणाला
            मरून जातो !

संसाराच्या सीमेवरती
बर्फाच्या मरणाळ तटावर
तिथें पहा ती गर्द लाल रक्ताची धारा
            वहात आहे

स्फटिकावरती उन्हांत धूसर
अविवेकाचा गर्भ तांबडा
उत्सवतेनें—
            नहात आहे !

खाकीमधलें असेंच हें मन
हिशेब त्यानें नव्हता केला
लाभ दरमहा होत रुप्याचा
            किती खिशाला

नकाशांतल्या रेघांसाठीं
अस्तित्वाचें हवन करावें
            व्यर्थ कशाला

व्यर्थ कशाला काठीवरती
फडफडणाऱ्या फडक्यासाठीं
            जाळुनि घ्यावें

कां न करावें गहन विवेचन
आकाशांतिल आदर्शांचें
विणीत कोळिष्टक शब्दांचें
दूरपणाच्या वळचणीस वा
            कां न बसावें !

खाकीमधलीं अशीं माणसें
माणुसकीचा गहिंवर त्यांना
            येतच नाहीं—

हजार मैलांवर तें घरटें पहा तयाचें
करुणेचा कवडसा तमीं त्या
            जातच नाहीं

बघा बापडी कुणी एक ती
चुलींतल्या जाळांत खुपसुनी अभाव डोळे
श्रमिष्टतेनें एकसारखी
            पहात राही—

ओटीवरती म्हातारा तो
हात फिरवितो हवेंत भवती
काठी त्याला
            गवसत नाहीं—

दोन पांखरें अशब्द बसलीं
परसामधल्या निंबाखालीं
पंख कुणाचा उडण्यासाठीं
            उकलत नाहीं—

या सर्वांचा विचार त्यानें
बर्फावरती कोसळतांना
            केला कांहीं ?
नाहीं—नाहीं—मुळींच नाहीं !



**आमच्या रक्षणासाठीं उत्तर सीमेवरच्या धारातीर्थावर ज्यांनीं आयुष्याचें सोनें केलें त्या शूर, त्यागी अशा भारतीय जवानांच्या पावन स्मृतीस अर्पण !**



अनुक्रमणिका



—पुरुषोत्तम भास्कर भावे

*....कुंडी झुलते आहे. ती कुंडी विजेसारखी खाडकन पडणार का? तुळशीची ती कुंडी कोसळली तर काय होईल?....तें घड्याळ बोलतें आहे—त्याचा लंबक डोलतो आहे....काळ म्हणतो आहे.......?*

आरामखुर्चीवर एकटा बसून मी घड्याळाकडे पाहतों आहें. खोलींत अर्धवट अंधेर आहे आणि भिंतीवरचें घड्याळ टकटकत आहे—कट्-टक्...कट्-टक! लंबक हेलकावे घेतो आहे. त्या लंबकाकडे मी वेड्यासारखा पाहतों आहें. घड्याळ म्हणतें आहे—'आला क्षण, गेला क्षण!'—खोटं वाटतं तुम्हांला? अहो, खरंच, घड्याळ बोलतं आहे. घड्याळाच्या रूपानें प्रत्यक्ष काळ बोलतो आहे. तो टाळ्यावर जीभ आपटून-आपटून म्हणतो आहे—'आला क्षण गेला क्षण!'... आणखी खरोखरच एकेक क्षण जातोच आहे! एकेक क्षण तुमच्या-माझ्या आयुष्यांतून उणाच होतो आहे. तुमचं-आमचं आयुष्य अखेर पुष्कळशा क्षणांचंच बनलं आहे ना? क्षणांचा एक मोठा ढीग म्हणजे आयुष्य! पण वाळूच्या ढिगासारखा तो ढीग सारखा सरतोच आहे, झरतोच आहे! क्षणाक्षणानं आणि कणाकणानं कमीच होतो आहे!—जागे व्हा, जागे व्हा! विचार करा जरा! असे कितीसे कण आहेत तुमच्या आयुष्याच्या ढिगाऱ्यांत, आहे ठाऊक?

—नाहीं, नाहीं ठाऊक!

—ठाऊक नाहीं तें बरंहि आहे आणि वाईटहि आहे...!

—माझ्या नानूच्या आयुष्यांत किती क्षण होते ते मला तरी कुठें ठाऊक होतं?—मला वाटलं होतं, खूप क्षण आहेत त्याच्या आयुष्यांत. ते कधीं संपणारच नाहींत. सत्तर वर्षं मी जगतों आहें; निदान तितका तरी तो जगेल, त्याच्या आधीं मी जाईन; त्यानं मला पोहोंचवावं हीच तर माझी इच्छा होती. त्यानं माझी राख गंगेंत टाकायला पाहिजे होती. त्यानं माझ्या तोंडांत पाणी ओतायला पाहिजे होतं...!

—पण प्रत्यक्षांत काय झालं ठाऊक आहे का तुम्हांला? त्याचं प्रेत माझ्या मांडीवर आलं, मीं त्याची राख गंगेंत टाकली, मीं त्याला पाणी दिलं...!

—हें पहा, हें पहा! गेलीं पांच वर्षे माझ्या डोळ्यांतलं पाणी मी त्याला देतोंच आहें!

घड्याळावरचे आंकडे वेडेवांकडे त्या पाण्यांतून भरकटताहेत. सात वाजायला आले आहेत...

—संध्याकाळचे सात.

—सात वाजतां नानू घरीं परत येणार होता.

—पण कितीकदां सात वाजून गेले, कितीकदां साडेसात वाजले. पण नानू कांहीं घरीं परत आला नाहीं. घरीं परत आला तो नानूचा रक्तबंबाळ देह! देह आला आणि नानू कुठें गेला? कुणास ठाऊक! कुठे रे गेलास तूं नानू? हे बघ, सात वाजायला आले, साडे-सात झाले, दहा झाले! मग तूं घरीं परत यायला कसा विसरलास?

—लहानपणापासून मी तुला सांगतों आहें कीं, लहान मुलांनीं तिन्हीसांजा घरीं परत यावं.

अनुक्रमणिका

# आला क्षण गेला क्षण

—गेलीं पांच वर्षे तिन्हीसांजा होताहेत; मी तुझी वाट पाहतों आहें पण तूं कांहीं घरीं येत नाहींस! अशानं वडील माणसांना काळजी वाटते नानू!

...टक्–कट्! टक्–कट्!...लंबक आपला हलतोच आहे. घड्याळ बोलतच आहे...

—काय बरं म्हणत होतों मी? मी कांहींच म्हणत नव्हतों. हें अभद्र घड्याळ सारखं म्हणत आहे—

'आला क्षण!...गेला क्षण!...आला क्षण, गेला क्षण!'

—नानू गेला बरं का! गेला तो परत आलाच नाहीं!!

नदीवर पोहायला म्हणून नानू गेला, तो काळ नदींत—बुडाला उंचावरून नानूनं सूर मारला, तो खडकावर पडला. टाळू फुटली नानूची! ही टाळू त्याच्या आईनं भरली होती बरं का! खडकावर फुटण्यासाठीं! नानू पोहायला निघायला कीं त्याच्या आईचा जीव खालींवर व्हायचा. मलाहि मनांतून काळजी वाटायची. नानू आमचा एकुलता एक मुलगा होता. माझी पन्नाशी उलटतां उलटत तो आम्हांला नवसासायासानं झाला होता. आतां मला असं वाटतं कीं, ऐन तरुण वयांत ह्या अशा रीतीनं जाण्याऐवजीं नानू आमच्या पोटीं आलाच नसता तर!...पण आमच्या पोटीं कांहींच नव्हतं. तेव्हां मला वाटायचं कीं एखादं मेलेलं पोर तरी हिच्या पोटीं येऊं दे!... घड्याळाकडे मी तेव्हांहि पहात बसायचा! काळ धांवत चाललेला दिसायचा...आज मी तीसचा झालों, उद्यां चाळीसचा, परवां पंचेचाळीसचा!...माझं तारुण्य संपल्यासारखंच होतं; हिलाहि म्हातारपण येऊं लागलं होतं.

—आणि आमची आशा सुटली तेव्हां नानू आमच्या आयुष्यांत आला. फार वर्षं ओसाड पडलेल्या भुईंत हिरवागार कोंब उगवला. नानूचं पहिलं रडणं ऐकलं आणि मी हंसत सुटलों. एकोणीस वर्षं मी हंसत होतों. मला वाटलं—मी हंसत हंसतच मरणार! नानूच्या मांडीवर डोकें ठेवून त्याच्या तरण्याबांड चेहऱ्याकडे पहात मी डोळे मिटणार. ह्या कल्पनेनं मी हंसत होतों...घड्याळ तेव्हांहि टकटकत होतं, तिकडे माझं लक्षच नव्हतं. घड्याळ म्हणत होतं—'आला क्षण, गेला क्षण!'...नानूचं आयुष्य क्षणाक्षणानं कमी होत होतं. त्याच्या ललाटीं फारसं आयुष्य नव्हतंच मुळीं. उगाच चिमूटभर वाळू होती त्याच्यापाशीं. एकोणीस वर्षांच्या चिमटींत मावतील इतकेच क्षण त्याच्यापाशीं होते. ते त्याला ठाऊक नव्हते कीं आम्हांला ठाऊक नव्हते. नाहींतर कशाला आम्ही त्याला नदीवर जाऊं दिला असता? ही नको–नको म्हणतच असे; पण एकोणीस वर्षांचा तरणाताठा पोरगा का आमचं ऐकणार होता?—आणि असे कितीसे जपणार होतों त्याला आम्ही?...'दिवे लागणीला परत ये नानू!'—'वाटेनं जपून ये हो नानू!'—'पाण्यांत वांकड्यातिकड्या उड्या घेऊं नकोस नानू!'—आम्ही म्हणायचं तें म्हणत होतों; पण असं कांहीं आम्ही बोललों कीं तो म्हणायचा—'मला तुम्ही कुक्कुबाळ का समजतां? तुम्ही माझी कांहीं काळजी करूं नका. एखादा मासा सुळकांड्या मारीत असेल तसा मी पाण्यांत पोहतों.'

—आणि असं म्हणून नानू गेला; 'संध्याकाळीं सात वाजेपर्यंत येतों' म्हणून सांगून गेला. जातांना आपल्या आईला त्यानं शिरापुरी आणि बटाट्याची भाजी करून ठेवायला सांगितली होती. नानूची प्रकृति चांगली होती. भूक चांगली होती. गेलीं एकोणीस वर्षे त्याच्या आईनं तो मागेल तें त्याला प्रतिदिवशीं करून घातलं होतं. आज त्यानं शिरापुरी करून ठेवायला सांगितली होती. त्याच्या आईनं ती करून ठेवली. आम्ही दोघे त्याची वाट पाहात बसलों. नेहमींच्या संध्याकाळसारखी ही एक संध्याकाळ होती. ही संध्याकाळ वेगळी आहे हें आमच्या स्वप्नांत नव्हतं. आज सात वाजेपर्यंत नानू जगणार होता. तिथेंच त्याचं आयुष्य संपणार होतं. आम्हांला तें ठाऊक नव्हतं. घड्याळाला तें ठाऊक होतं. काळाला तें ठाऊक होतं. घड्याळ टकटकत होतं, तें म्हणत होतं—'क्षण आला, क्षण गेला.' त्या टकटकण्याचा अर्थच आम्हांला तेव्हां कळला नाहीं. आम्ही नानूची वाट पाहत होतों. आम्ही घड्याळाकडे पाहत होतों. क्षणांची वाळू सारखी सरत होती. नानूच्या आयुष्याचे हे शेवटचे क्षण होते. जीवनाची शिल्लक शून्याजवळ जात होती. आणि इकडे त्याच्या आईनें पाट–पाणी केलं होतं. अन्न गरम ठेवलं होतं. कांहीं पुऱ्या तळल्या होत्या, कांहीं नानू आल्यावर तळणार होती. पण नानू येणार नव्हता, नानू तें अन्न खाणार नव्हता. नानूचें शेवटचें खाणें मधल्या वेळींच झालें होतें. आतां तो काळाच्या तोंडांत जाऊन बसला होता. आम्हांला कुठें काय ठाऊक होतें? पण घड्याळ घाईघाईनें म्हणत होतं, "आला क्षण, गेला क्षण!"

हेंच तें घड्याळ, हीच ती खोली, हींच तीं नानूचीं पुस्तकं. ह्या खोलींत तो पुन्हा कधीं येणार नव्हता. ह्या पुस्तकांना कधीं स्पर्श करणार नव्हता. ह्या घड्याळाकडे कधीं पाहणार नव्हता. ह्या घड्याळाला नानूच चावी देत असे. तेंच घड्याळ नानूचं आयुष्य मापत बसलं होतं. 'सात वाजेपर्यंत येईन,' असं मोठ्यानं सांगून नानू गेला. घड्याळ तेव्हां खदखदून हंसत असेल आणि म्हणत असेल—'आला क्षण, गेला क्षण!'

हें पहा, अजून घड्याळ फिदीफिदी हंसतच आहे. मला हंसत आहे. तुम्हांला हंसत आहे. तुमचं नाहीं ना घड्याळाकडे लक्ष? म्हणून तर तें हंसत आहे. मलाहि तें असंच हंसलं असेल. हीं पुस्तकं नानूनं विकत घेतलीं तेव्हां मला वाटलं—नानू आतां बी. ए. होईल, एम. ए. होईल, परदेशांत जाईल, मोठें नांव काढील. घड्याळ तेव्हां हंसत असेल. ही नातवंडांचा चेहरा पहायला हपापली होती. तेव्हांपासून सुनेसाठीं सोनं जमवीत बसली होती. नानू बोहोल्यावर चढलेला तिला पहायचा होता. पण तो सरणावर चढायचा आहे हें कुठें तिला ठाऊक होतं? नानू लग्न न होतांच मरायचा आहे, हें त्या घड्याळाला मात्र ठाऊक होतं. तें सारखं म्हणत होतं—'आला क्षण, गेला क्षण!' तुमचं नाहीं ना लक्ष तें घड्याळ काय म्हणतें आहे तिकडे? फार कामांत आहांत ना तुम्ही? म्हणूनच घड्याळाकडे पाहतां आहांत ना सारखे? पण घड्याळाचे कांटे सारखे पुढें सरकताहेत! पुढें म्हणजे कुठें, ठाऊक आहे का? मरणाच्या दिशेनें ते कांटे सरकताहेत! ह्या गोल तबकडीवर यमदूत छपून बसले आहेत जागोजाग! अगदीं रेषेरेषेवर, बिंदूबिंदूवर

यमदूत आहेत. कुठें आणि केव्हां त्यांची झडप पडेल–सांगतां येत नाहीं. ह्या क्षणीं पडेल, पुढच्या क्षणीं पडेल. प्रत्येक क्षणीं कुणा ना कुणावर त्यांची झडप पडतेच आहे. प्रत्येक क्षणीं कुणी ना कुणी मरतोच आहे. तुम्हीसुद्धां मराल कुठल्याहि क्षणीं. काय म्हणतों मी ? ऐका, ऐका जरा! टिक् टिक् टिक् टिक्!...हाः–हाः–हाः–हाः!... आला क्षण, गेला क्षण! आला क्षण, गेला क्षण...!

—कोण ओरडत आहे तें वाहेर ? 'उद्यां भेटूं रे मन्या !' म्हणून म्हणत आहे. तो शेजारच्या मन्याचा कॉलेज–मित्र आहे. अशोक त्याचं नांव. नेहमीं ऐकतों मी ही त्याची आरोळी !

'उद्यां भेटूं रे मन्या ! सिनेमाला जायचं उद्यां !' मारे खालून हात हलवतो आहे. पुन्हा पुन्हा म्हणतो आहे – 'विसरूं नकोस – संध्याकाळीं भेटायचं उद्यां !"

—जाऊं का खालीं ? हलवूं का त्याला गदगदां ? उद्यांचे वायदे करतो आहे खुळा ! उद्यां संध्याकाळचे वायदे करतो आहे ! किती सहज हवाला देतो आहे हा वेडा पोर उद्यांचा ! घड्याळ नाहीं का ह्याच्या-जवळ ? "उद्यां"चा अर्थ कळत नाहीं का ह्याला ? बोलत नाहीं का ह्याचं घड्याळ ? समजत नाहींत का ह्याला त्या घड्याळाचे बोल ? सहज उद्यांचे वायदे करतो आहे.



बघा, चालला तो दुचाकीवर टांग टाकून!

संभाळ–संभाळ, अरे अशोक, दुचाकी कुठेंतरी आदळेल तेथें ! वाटेवर धाडकन् उताणा पडशील ! डोक्यावर पडलास तर तूं मरशील-वाटेंत सुद्धां ताडकन् ! दुचाकीवरून पडलेलीं माणसंसुद्धां मरतात. वाटेंत माणसांची गर्दी पहा केवढी आहे ? मारे एक हात सोडून तूं दुचाकी दामटतो आहेस. तुझा कुणाला तरी धक्का लागेल. मग तो माणूस चिडून तुझ्या कानशीलांत मारील ! तेवढयानंसुद्धां माणसं मरतात ! तूंसुद्धां मरशील कदाचित् तसाच. कशाला उगाच उद्यांचे वायदे आज करतोस ? ह्या चोवीस तासांत काय काय घडणार आहे, तें तुला ठाऊक आहे का ? पंखा फिरतो ना तुझ्या डोक्यावर ? तो पंखाच निसटून तुझ्या डोक्यावर पडेल ! तुझी मान साफ कापली जाईल ! असं कुणाचं तरी झाल्याचं मीं वाचलं आहे. सिगारेट ओढतो आहेस ना तूं अशोक ? दुचाकी चालवीत सिगारेट ओढतो आहेस ना ? अरे ठिणगी उडेल एखादी तुझ्या कपड्यावर आणि हां–हां म्हणतां भडका उडेल. पाहतां पाहतां जळून मरशील रे पोरा तूं. असंहि झाल्याचें मीं वाचलं आहे. दुचाकीवरून पडून माणसं मेलीं आहेत, मारामारींत माणसं मेलीं आहेत, सिगारेटची ठिणगी उडून माणसं पेटलीं आहेत. मरण जागोजाग दबा धरून बसलं आहे बाबा. कुठें केव्हां कुणावर घाला घालील त्याचा नेमच सांगतां येत नाहीं. जरा हळू दुचाकी चालव, अशोक, जरा हळू दुचाकी चालव आणि ती हातांतली सिगारेट दे फेकून. घरीं आई-वडील आहेत ना तुझे ? ते तुझी वाट पहात असतील रे बाबा. त्यांना तुझं जळकं मोडकं प्रेत नको दिसायला. उद्यां सिनेमाला जाणार आहेस ना तूं ? दोघांचीं दोन तिकिटंसुद्धां काढून ठेवलीं असशील. केवढी निश्चिति आहे तुला उद्यांविषयीं. मग जरा जपून तरी वाग. हळू चालव आपली दुचाकी. टाक ती सिगारेट. बघ, त्या गुरख्याला तुझा धक्का लागेल. तो तुझ्या छातींत चिडून आपली कुकरी मारील. ऐकतो आहेस का अशोक तूं ? नाहीं ऐकत ! थांब, मीच येतों तुला सांगायला.

—मला थांबवूं नका, शास्त्रीबुवा. 'आला क्षण—गेला क्षण !' बघा तें घड्याळ बोलत आहे, तो अशोक धांवतो आहे दुचाकीवरून ! अहो, तो आपल्या मरणाकडे धांवत असेल ! मला वाचवूं द्या त्याला ! वेड ! अहो, वेड नाहीं शास्त्रीबुवा ! सहस्रावधी माणसं दुचाक्या चालवीत असतील, पण सहस्रावधी माणसं मरतातसुद्धां ! सोडा, सोडा मला ! आला क्षण–गेला क्षण ! मी त्याला चार गोष्टी सांगतों. मला नाहीं हो घोडागाडीचं भय ! आणि मी मेलों तर मेलों ! मी अजून मेलों कां नाहीं, तेंच मला कळत नाहीं. सोडा मला. मला त्या अशोकला वांचवायचं आहे. तरणाताठा पोर आहे. चार दिवस जगूं द्या त्याला. जाऊं द्या मला. सोडा माझा हात. काय, म्हणतां काय शास्त्रीबुवा ? काय ऐकूं मी तुमचं ? घरीं ती एकटी आहे हो ! आहे ना एकटी. तीसुद्धां मरणाची वाटच पहाते आहे. आपण कां जगतों आहोंत तें मला विचारते. अहो ती जगते आहे माझ्यासाठीं. माझे डोळे अधू. माझं डोकं अधू नाहीं शास्त्रीबुवा. खरं म्हणजे तुम्हां लोकांपेक्षां माझं डोकं जास्त तल्लख आहे. मला किती कळतं हें तिला ठाऊक आहे. समज दांडगी, पण शरीर थकलं आहे. थकलं आहे. पण मोडत नाहीं. हे खंगलेलं शरीर संभाळण्यासाठीं ती जगते आहे. आणि ती जगते आहे म्हणून मी जगतों आहें. तीहि थकली आहे. तिच्याकडे पाहणारं माझ्याविना दुसरं कोण आहे ? तिचंहि वय झालेलं आहे ! माझंहि झालं आहे ! झालं आहे

पण सुत नाहीं! घड्याळ आपलं रेंगाळत रेंगाळत चालतच आहे. क्षण येतात, क्षण जातात! पण आयुष्य संपतां संपत नाहीं. आयुष्य संपलं आमच्या नानूचं. सुरू होतं न होतं तोंच संपलं! असं नको त्या अशोकचं व्हायला. मेलों, सोडा मेलों! काय म्हणतां? एव्हांना तो घरीं पोंहोंचलासुद्धां असेल? घड्याळ ऐकतां आहांत का शास्त्रीबुवा? तें म्हणतें आहे-'आला क्षण-गेला क्षण!' कदाचित् अशोकचं प्रेत पोहोंचलं असेल त्याच्या घरीं! ठाऊक काय आहे तुम्हांला? तुम्ही आपले धुंदींत आहांत धुंदींत! एखादा फटका बसला म्हणजे मग उघडतील डोळे! तोंपर्यंत असेच झोंपेंत जगायचे तुम्ही! जागे व्हा शास्त्रीबुवा, जागे व्हा! आला क्षण-गेला क्षण! क्षण आला, क्षण गेला! बघा, तो शेवटचा क्षण येतो आहे. केव्हां येईल तें कळणारसुद्धां नाहीं! कुठल्या भ्रमांत आहांत तुम्ही?

"राम-राम-राम!" कोण हो......तें शास्त्रीबुवा? "चार दिवसांनीं येऊन जा कोट!" समोरचा शिंपीच बोलतो आहेना तें? तरी बरं, त्याच्या दुकानांत घड्याळ आहे. तें सारखं टकटक टकटक करत आहे. आणि हा म्हणे चार दिवसांनीं कोट देणार! हा देणार आणि घेणारा घेणार! दोघेहि मूर्खच! तरी बरं, दोघांच्याहि हातांत घड्याळं आहेत. सारखीं दोन्ही घड्याळं पालीसारखीं चुकचुकताहेत! तरी हे शहाणे चार दिवसांनीं काय करायचं तें आज ठरवताहेत! अरे बाबांनो, ठरलेल्या गोष्टी वेगळ्याच आहेत. तुम्ही ठरवणारे कोण? त्या घड्याळानं वेगळंच कांहीं ठरवलं असेल! म्हणे-चार दिवसांनीं कोट देतों! अगदीं निश्चित देतों! अरे एवढी निश्चिती देणारे तुम्ही कोण टिकोजीराव? नाहीं देतां येणार तुला कोट! आणि तो नाहीं घेतां येणार त्याला! इस्त्रीखालीं जळेल तुझा कोट! राख होईल त्याची! उंदीर त्याला कुरतडून कुरतडून टाकतील! चिंध्या होतील त्या नव्या कोटाच्या! नवेपणींच निकालांत निघेल तो कोट! तो मुळीं कुठल्या कारणीं लागायचाच नाहीं! आमच्या नानूचं नाहीं का असंच झालं? तसंच होईल त्या कोटाचं! तूं मारत बस यंत्राचे टाके-कट्-कट्-कट्! पण तिकडे तें घड्याळ बोलत आहे ना! कोट शिवून संपतो न संपतो तों मुळीं त्याचं आयुष्यच संपून जाईल! वाळवी लागेल त्याला. कसर लागेल त्याला. शाई सांडेल त्याच्यावर. आग लागेल तुझ्या दुकानांत! मग कसा देशील तूं मागणारा त्याला तो कोट? आणि तो घेईल कसा? पान खात होता तो कोट सोकाजी!...पान चघळत होता! अहो, पानाचा चोथा नरड्यांत अडकून गुदमरून मरतात माणसं? अहो साधा सुपारीचा तुकडा घशांत अडकून माझा एक नातलग मेला! असाच पोटभर जेवून ढेकर देत आनंदांत सुपारी चघळत होता! बढती मिळाली होती त्याला! दुसऱ्या दिवशीं नव्या जागेंत रहायला जाणार होता. लवकरच विलायतेला जाण्याचे बेत करीत होता. पण—कसचं काय आणि कसचं काय? साधं सुपारीचं निमित्त होऊन मेला! घड्याळाकडे लक्षच नव्हतं त्याचं. घड्याळानं ठरवला होता त्याचा दिवस. सारखं घड्याळ त्याला सावध करत होतं. पण तो कशाला ऐकतो आहे? त्याला वाटलं घड्याळ म्हणजे एक मेलेली वस्तू! केवळ यंत्र पण यंत्र तो होता! मरणार तो होता! त्याच्या छातीचे ठोके बंद पडणार होते. सुपारी खातांखातां बंद पडणार होते. त्यानं सुपारी तोंडांत टाकली तेव्हां घड्याळ फिसफिसतच होतं-"आला क्षण-गेला क्षण!' पण तो कशाला ऐकतो आहे? तो आपल्याच धुंदींत होता!

—तसाच हा कोट घेणारा आपल्या धुंदींत आहे. चार दिवसांनीं घेणार आहे म्हणे तो कोट! नवा कोरा कोट! पण तंवर ह्याच्या शरिराचा डगला गळून पडेल ना! कातड्याचा तर आहे ह्याचा डगला. चार दिवस तरी तो टिकेल कशावरून? चार दिवसांत इकडची पृथ्वी तिकडे होऊं शकते! चार घटकांत होऊं शकते! फार काय सांगावं, चार क्षणांत होऊं शकते! असा कितीसा वेळ लागतो माणसाचे प्राण जायला? हा चामड्याचा डगला गळून पडायला तसा वेळ किती लागतो? कारण केवढं पुरतं? मुळींच मोठंसं कारण लागत नाहीं माणसाला मरायला. अगदीं साधी टाचणीसुद्धां पुरते. खोटं वाटतं तुम्हांला शास्त्रीबुवा? साध्या टाचणीपायीं माणसाचे प्राण जातात. अहो, अशीच माझ्या एका मित्राला टांचणी टोचली. बोटांतून रक्ताचा थेंब आला. त्यानं तें बोट चोखलं आणि बोटावर बारीक माती टाकली. तेवढ्यामुळें धनुर्वात झाला त्याला. हाल हाल होऊन मेला. तसं होऊं शकेल हा नवा कोट करणाऱ्याचं. ती बघा तिकडून म्हैस धांवत येते आहे. गुराखी तिला पिटाळतो आहे. तिचं शेपूट पिरगाळतो आहे! म्हैस चौखूर धांवते आहे. केवढीं टोंकदार त्या म्हशीचीं शिंगं आहेत. शिंप्याच्या दुकाना समोर हा नव्या कोटाची वाट पहात उभा आहे. म्हशीचीं शिंगं ह्याच्या पोटांत गेलीं तर? टरटर फाटेल ह्याची कातडी. शिंग पोटांतून बाहेर येईल. मग कशाचा घालणार हा नवा कोट? खोटं नाहीं सांगत तुम्हांला शास्त्रीबुवा, ह्या अशा गोष्टी होतात. आपण उगाच एका भ्रमांत असतों. आपल्याला वाटतं—असं कांहीं आपलं होणार नाहीं. व्हायचं तें दुसऱ्याचं होईल. आणि दुसऱ्यांना वाटतं कीं आपलं होईल. पण खरं

(पान १७० वर चालू)





अनुक्रमणिका

लहानपणीं इसापनीति वाचली नसती तर जगांत इतके निरनिराळे प्राणी आहेत याचा तें लहानपण संपेपर्यंत मला कधीं पत्ता लागला नसता. चार पायांच्या प्राण्यांत व्हिक्टोरियाला बांधलेला घोडा, कुत्रीं–मांजरें, आणि पक्ष्यांत–कावळा, चिमणी आणि दाणे-वाल्याच्या दुकानापुढें जमणारे पारवे यांपलीकडे ज्यांना प्राणिसृष्टींतलें फारसें कधीं कांहीं बघायला मिळत नाहीं अशा मुंबईत—जन्मून वाढलेल्या पोरांपैकीं मी एक आहें.—तसें माझें लहानपण मला पुष्कळच आठवतें. ताटलींत दूधभात घालून 'आता हा काऊच्या–हा कनी चिऊच्या' अशा चालीवर मला भरवल्याचें मला आणि माझ्या मातेलाहि स्मरत नाहीं. 'कणी पानांत पडेल तें खालच्या मानेनें गिळायची त्याची लहानपणापासूनच संवय हो' हें सर्टिफिकेट मला सवत मिळत आलें आहे; दुधाचे दांत पडून भाकरीपोळीचे आले. त्या दातांनीं खाणावळींतल्या पोळ्याहि तोडल्या. पण मला भोजन ह्या क्रियेसाठीं कोणत्याहि अन्य भुलभुलावणीची गरज भासली नाहीं. तात्पर्य, बालपणींच्या 'वदनिं कवळ घेतां'च्या अवस्थे-पासून ते उद्यांच्या 'वदनिं कवळि घेतां'च्या परिस्थितीपर्यंत पानांत पडेल तें मुकाट्यानेंच मी खात आलों आहें—खाणार आहें. सांगायचा मुद्दा माझ्या बालजीवनांतच जिथें काऊ–चिऊ–हम्मा–कुतू वगैरे मंडळी आली नाहींत तिथें त्यांच्या विषयींचें कुतूहल वाढण्याचा प्रश्नच संभवत नाहीं. नाहीं म्हणायला शेणाचें घर असलेला कावळा आणि मेणाचें घर असलेली चिमणी लहानपणीं चार दिवस गोष्टींचीं घरटीं बांधून गेलीं. पण आठवणींतून दोघांचींहि घरें वाहून गेलीं आहेत. देवानें पहिल्यापासून दृष्टींतच कांहीं दोप ठेवल्यामुळें वर्गाच्या वळच-णीला असलेल्या चिमणीच्या घरट्यापेक्षां दामलेमास्तरांच्या टोपीबाहेर लडबडणाऱ्या शेंडीच्या गांठीचेंच आकर्षण मला अधिक असे. लहान मुलें फुलांत आणि पांखरांत रमतात हा नियम माझ्या सन्माननीय अपवादानेंच हवा तर सिद्ध करावा. लहानपणीं मी बागेंतल्या फुलांऐवजीं गल्लींतल्या मुलांतच अधिक रमलों आहें. कुत्र्याचें भिजलेलें पिल्लूं उचलून मी कधींहि घरीं आणलें नाहीं. कीं नदीकाठची होल्यांची लोंबतीं घरटीं शोधीत गेलों नाहीं. एकतर नकाशावरचीच नदी पहाण्यांत बराच काळ गेला. आणि पहिली नदी पाहिली ती नकाशावरच्या नदीसारखी निळी नसते हें दिसल्यावर नकाशावरचा विश्वास उडाला आणि नदीवरचं प्रेम उडालं. थोडक्यांत म्हणजे थोर वयांत कविता करणारी माणसें हस्तें परहस्तें बालपणींच्या आपल्या फुलपांखरांत रमणाऱ्या संवेदनाशील (कीं क्षम) मनाबद्दल ज्या कथा पसरवितात तसला कुठलाच

# आणि कांही इतर पाळीव प्राणी-प्राणसख्यांनो

*दीपावलीच्या गेल्या वार्षिकांकांत पु. ल. देशपांड्यांनीं वाचकांना कडूगोड 'खाद्य जीवनांत' यथेच्छ डुंबविलें. यंदा साखरेची, गुळाची, फराळाला लागणाऱ्या एकंदर वस्तूंची बरीच टंचाई आहे; पण त्यामुळें गोंधळून जायचें मुळींच कारण नाहीं. देशपांडे आपल्याला एका अद्भुत विश्वांत फिरवून आणताहेत. तें विश्व म्हणजे प्राणीजीवन....!*

पैलू माझ्या मनाला नव्हता. सर्कशीला गेलों तरी विदुषकाखेरीज इतर कोणत्याहि मनुष्य अगर अन्य प्राण्यांनीं माझ्या त्या वेळच्या चिमुकल्या मनाचा ताबा घेतला नाहीं. रिंगणांतून विदूषक गेला कीं मी उदास होत असें. हत्ती स्टुलावर बसून जाई—घोडे रिंगणें धरीत—कुत्रीं रिंगांतून उड्या मारीत=एकनाथमूर्ति–राममूर्ति असलीं नांवे धारण करणारे भीमकाय लोक तोफेचे गोळे झेलीत=मोटारी अडवीत पण व्हिक्टोरिया राणी म्हणाली होती त्या चालीवर सांगायचें तर आय वॉज नॉट् ॲम्यूझ्ड्!—आमची तब्रियत बहेल्त नव्हती! पिंजऱ्यांतल्या वाघाच्या तोंडांत मान देणाऱ्या सर्कसवाल्याचें मला आतां आतांशा कौतुक वाटूं लागलें आहे. किंबहुना सर्कस ही गोष्ट लहानपणीं हल्लींच्या इतकी आवडतहि नसे. लहानपणीं वाघ ही गोष्ट जरासुद्धां भयप्रद वाटली नव्हती. कारण त्यावेळीं चिंचेच्या फोकानें आमच्या पार्श्वभागावर ताशा वाजवून घेण्याची हौस भागवणारे दामले मास्तर ह्यांच्याहून अधिक भयप्रद असें दुसरें कांहींहि वाटत नसे. त्यावेळची गोष्ट सोडा पण त्यानंतर अनेक वर्षें दामले आडनांवाच्या कुठल्याहि इसमाशीं मी आपण होऊन सलगी करूंच शकलों नाहीं. दामले-मास्तरांपुढें वाघ देखील शेपूट घालून गेला असता याची सर्कस पहातां पहातां खात्री पटली होती. मलाच नव्हे—साऱ्या वर्गाला.

पशुपक्ष्यांत ज्या काळीं मन रमायचें त्यावेळीं रमलें नाहीं आणि आतां वेळ निघून गेली. माझ्या शहरी जीवनांत पहिला पक्षी आला तो 'कावळा'! माझें बालपण शहरांत गेल्याचें मला दुःख नाहीं तसेंच माझ्या पांचवीला कावळा पुजल्याचेंहि नाहीं. 'कावळा म्हणे मी काळा, पांढरा शुभ्र तो बगळा'—अशी एक आम्हांला कविता असे. लहान मुलांच्या कवितेलाहि त्याकाळीं कविताच म्हणत—बालगीत नव्हे. कावळा आम्ही रोजच पहात होतों. पण सफेद बगळा मात्र भारताला स्वातंत्र्य मिळाल्यानंतरच पाहिला. त्यावेळीं बगळे फारसे नसावेत. पक्षीसृष्टीचा पहिला प्रतिनिधि म्हणून बालजीवनांत 'कावळा' हा अतिसामान्य प्रतीचा पक्षी आल्यामुळें त्या सृष्टीविषयीं एकूण त्याच काळांत वैराग्य उत्पन्न झालें. ह्या पक्ष्याच्या सर्व लीला मी बारकाईनें पाहिल्या आहेत. वास्तविक हा तसा अगदींच गरीब परिस्थितींतला. पण मुंबईच्या भाषेंत सांगायचें म्हणजे 'साला आखडू' आहे. पूर्वीं कडक कॉलर नांवाचा पांढऱ्या स्वच्छ कापडी बांधणीचा एक लाकडी गळफांस पैरणीला जोडीत. ती कडक कॉलर लावणारी मुंबईकर मंडळी थेट कावळ्यासारख्या माना फिरवीत. तें पहाणें खटक्खटक् करीत चाले. काळे डगले किंवा सूट आणि ती कडक कॉलर घालून माना खटखटावीत बघणारीं माणसें आणि कावळे यांचें माझ्या मनांत तेव्हांपासून समीकरण बसलें आहे. कावळा हा कांहीं पाळीव पक्षी नव्हे. पिंजऱ्यांत घातलेला कावळा मी एकदांच पाहिला. लंडनच्या झूमध्यें. अगदीं पोपटाच्या ऐटींत हा कावळा बसला होता. आपला हिंदी कावळा. पिंजऱ्याबाहेर नांवाची पाटी होती 'इंडियन् क्रो' अशी. एखाद्या अस्सल इंग्लिश कंपनींत गोऱ्यासाहेबांच्या पंक्तींत एखादा डिसोझा बसतो तसा. लंडनमधले इतर हिंदी साहेब जसे एकमेकांना पाहून न पाहिल्यासारखें करतात तसेंच कांहींसें मला पाहून ह्या कावळ्यानें केल्याचें मला अंधुक स्मरतें. वास्तविक इतर रंगीबेरंगी पक्ष्यांत त्यालाहि स्वतंत्र पिंजऱ्याचा मान मिळालेला पाहून मलाहि बरें वाटलें होतें. कारण कावळा हा पाळीव नसल्यामुळें त्याचेंमाझें कांहीं भांडणच नाहीं. इतर पक्ष्यांच्या मानानें हा पक्षी किती तरी समंजस दिसतो. त्या काव–काव ह्या ओरडण्याला 'काव–काव' एवढाच अर्थ असतो. माणसाची बोली बोलण्याचा आव नसतो. सहसा पक्ष्यांच्यांत न आढळणारा एक चार पावसाळे पाहिल्याचा भाव त्याच्या चेहऱ्यावर असतो. काका–कुव्याच्या चेहऱ्यावर रिटायर व्हायला आलेल्या हायकोर्ट जजाचें गांभीर्य असतें. फार वेळ ह्या पक्ष्याकडे पहात राहिलें कीं कांही वेळानें जस्टिस काकाकुवा एकदम 'ज्यूरींतील सभ्य गृहस्थ हो...'अशी सुरुवात करील कीं काय अशी मला नेहमींच धास्ती वाटत आली आहे. चारपांच कावळे तीन तिठ्यावर रिंगण करून बसले कीं म्हाताऱ्या वकिलांची मुरब्बी टोळी एखाद्या दिवंगत इंग्रज न्यायाधीशाविषयीं एकमेकांना आख्यायिका सांगत बसल्यासारखी वाटते. कावळा मेल्यावर इतर कावळे शोकसभा घेतात आणि दिवंगत काकासाहेबांनीं आपल्या ज्ञातीच्या उन्नतीसाठीं फार प्रयत्न केले ह्या चालीवर गुणवर्णनपर कावकाव करतात असेंहि मी ऐकलें आहे. कावळ्यांचीं हीं कौतुकें मी कांहीं प्रत्यक्ष पाहिलीं नाहींत. कावळा खिडकीशीं बोलूं लागला तर पाव्हणा येतो असा एक समज आहे. हें खरें असतें तर मुंबईत खोलीदीडखोलीच्या खुराड्यांत रहाणाऱ्या सगळ्यांनीं

जॉन बुलबरोबर इंडियन 'डिसोझा'

एव्हांना पिंडाला शिवण्यापुरताहि कावळा जिवंत ठेवला नसता. एकेकाळीं तो निरोप वगैरे आणीत असावा. त्याशिवाय त्या काऊचे सोन्यानें मढवीत पाऊ म्हणणारे निघाले नसते. हिंदींतहि कागाला संदेसवा देण्यासाठीं धाडलें आहे. पण आमच्या पहाण्यांतले कावळे असलें कांहींहि करतांना आढळले नाहींत. त्यामुळें त्याचें आवर्जून कौतुक करावें असें ज्याप्रमाणें कांहीं घडलें नाहीं त्याचप्रमाणें त्याला नांव ठेवावें असेंहि त्यानें कांहीं केलें नाहीं. क्वचित् म्हशीच्या पाठीवरून सहलीला निघालेला कावळा पाहून पक्ष्यांनाहि उडण्याचा कंटाळा येतो, असा बोध घेतला आहे. मात्र पाळीव नसूनहि ज्याच्याविषयीं कौटुंबिक कथा बऱ्याचशा आहेत असा हा एकच पक्षी. कारण पिंडाला शिवण्याशीं त्याचा संबंध येतो. पिंड ठेवले. कावळा शिवला. आणि मंडळी परतली. इतक्या तीन सरळ वाक्यांत तें शेवटलें कार्य आटोपलेलें क्वचितच ऐकायला मिळतें. आमच्या एका मित्राची आजी एकदां —आणि एकदांची—वारली. आतां तिच्या पिंडाला न शिवण्याचें कावळ्याला कांहींच कारण नव्हतें. चांगली नव्वद ब्याण्णव वर्षे पाहून डोळे मिटले होते. मंडळी बुचकळ्यांत पडली. 'तुझ्या मुलाबाळांची काळजी घेऊं' म्हणावें तर मुलगा म्हणायचा तोच बावीस वर्षे पोष्टांतून पेन्शन् खाऊन आणखी बावीस वर्षे खाण्याइतका टुणटुणीत. (असो बापडा!) लेकी, सुना, नातू, पणतू सगळं कांहीं 'एथासांग' होतं. शेवटीं कुणी तरी—"आजीबाई—एक मोठी बरणी आणि दोन भक्कम आलीं तरच तुमची शाल-जोडी देईन हो बोहारणीला", असें हात जोडून म्हटलें आणि कावळा शिवला. कावळा हा प्राणी कौटुंबिक गोष्टींत इतक्या बारकाईनें लक्ष घालीत असेल याची कल्पना नव्हती मला! एरवींचा हा अतिपरिचयामुळें अवज्ञेला पोहोंचलेला पक्षी त्या विशिष्ट ठिकाणीं इंगा दाखवून जातो. स्टँडावर डझनभर टांगे उभे असल्यावेळीं 'साहेब, बसा की आपला - टांगा आहे' म्हणणारा लाचार टांगेवाला, एकटाच असला आणि डेक्कन क्वीनचा टाइम भरत आलेला असला म्हणजे जी बेफिकिरी दाखवतो ती आणि ही जात एकच! अडचणींत गांठल्यावर कोण कसा वागेल सांगतां येत नाहीं. दुपारची रणरणती वेळ, माणसें वैतागलेलीं-भटजीच्या पोटांत ओरडणाऱ्या कावळ्यांची कावकाव ऐकूं येत असते अशा वेळीं हा कावळा अडून बसतो. इथें त्याचा दोष नाहीं-एकेकाची वेळ असते.

कावळ्यामागोमाग येणारा पक्षी म्हणजे चिमणी. वास्तविक ह्या दोघांत कांहींच साम्य नाहीं. केवळ काऊशीं-यमक जुळतें म्हणून चिऊ येते. मात्र काऊ आणि चिऊ हा निदान मुंबईच्या पक्षी जमातींतला अनुक्रमें बहुजन-समाज आणि कनिष्ठ मध्यम वर्ग आहे. संख्येनें विपुल. कष्टानें जगणारा. सुबक पिंजऱ्यांत नांदून डाळिंबाचे दाणे खाणारा ऐदी नव्हे. काऊ-चिऊ बिचारे आपली स्वतःची बोली बोलतात. त्यांना नागरांची शिकाऊ पोपटपंची जमत नाहीं. खाण्यापिण्यांतला चोखंदळपणा परवडत नाहीं. खाऊं तर पेरू किंवा मरूं! हें गाणें पोपटाला ठीक आहे. किंबहुना आधीं पेरू खाऊनच ते असलीं गाणीं म्हणतात. चिमणाचिमणीची आर्थिक परिस्थिति कावळ्या-पेक्षां जरा बरी असते. नाहीं म्हटलें तरी त्या सभ्य घरांच्या वळचणीचा आसरा करतात. कांहीं माफक प्रणयक्रीडा करतात. फिरत्या वाचनालयांतल्या मासिकांतल्या कथा वाचून कारकुनांचीं पोरंपोरी जितपत प्रेम करतात तितक्याच. कावळे मात्र अगदींच मजूर वर्गातले. शहरांत पहांटे उठून कामावर जायचें, नशिबांत असेल तें शिळेंपाकें खाऊन दाटीवाटीनें रहायचें. चिमणा-चिमणी त्या मानानें लोअर डिव्हिजन क्लार्कच्या दर्जानें रहातात. सुटींत देशावर जाऊन पिकांच्या तुऱ्यांवर बसून येतात. 'हे' कामाला गेल्यावर चार घरट्यांतल्या चिमण्या जमून मंडळें चालवतात-थोडा चिवचिवाट करतात. एका खोलीच्या घरट्यांत कां होईना, पण स्वतंत्र संसार थाटतात. कावळ्यांचीं घरें मजुरांच्या खुराड्यांइतकीच दृष्टीआडच्या सृष्टींत. मोठ-मोठ्या लोकांच्या पंख्यांवर, दिव्यांच्या टोपणांत—दिवाणखान्यांतल्या तुळईजवळ पोटभाडेकरू म्हणून रहाण्याची धिटाई चिमण्याला जमते तशी कावळ्याला जमत नाहीं. ह्या पक्ष्याला विलक्षण न्यूनगंड आहे. हा चिमण्यासारख्या किंवा पारव्यासारखा एकदम कधींहि घरांत शिरत नाहीं. चिमणा-चिमणीपैकीं चिमणी हा स्त्रीसमाज बराच पुढारलेला असल्यामुळें तीहि संसाराला हातभार लावते. कावळी चारचौघांत मोकळे-पणानें वावरतांना दिसतच नाहीं. मी तरी अजून कावळी कशी काळी की गोरी ती पाहिलीच नाहीं. गोरी नसावी. कारण इतक्या कावळ्यांतला एखादा तरी आईच्या वळणावर गेला असता. काक समाजांत काकूंना फारसें पुढें येऊं देत नसावेत. म्हणूनच कॉले-जांतल्या मागासलेल्या पोरींना 'काकू' म्हणतात कीं काय? कावळी मी पाहिली नसली तरी दामलेमास्तर मुलींना 'ए कावळे' म्हणत तें ऐकलें आहे. त्यांना गोविंदा-अन्तू-हरी-वेणू-प्रभी इत्यादि नांवें समोर दिसत असूनहि आठवत नसत. तरी आमच्या काळीं-अमिताभ, हर्षवर्धन, आशुतोष-अर्चना-सस्मिता वगैरे मास्तरांची कवळी उडवणारीं नांवें नव्हतीं. पण आमचीं नांवें सोपीं असूनहि दामलेमास्तर बैलोबा-गाढव-कावळी ह्याच नांवांत रमत. हजेरी देखील देशपांड्या-साठ्या-फडक्या-अशा लाडिक उच्चारांत घेत. आतां इतक्या गद्य वातावरणांत बालपण गेल्यावर कुठलीं फुलें आणि कुठलीं पांखरें? खिडकीशीं आपण होऊन येणारे कावळे, चिमण्या आणि तळमजल्यावरच्या वाण्याकडलें खाऊन वळ-चणीला दिवसभर घुमणारे पारवे वगळले तर आमच्या बालजीवनांतून पक्षी केव्हांच उडाला होता. आमच्या लहानपणीं आकाशांत पक्षी उडत नव्हते असें नाहीं पण चाळीच्या खिडकींतून जिथें आकाशच दिसायची पंचाईत तिथें पक्षी कुठले दिसायला?




*विजयासाठीं सिद्ध व्हा ! उत्पादन वाढवा व अधिक बचत करा.*



अनुक्रमणिका

मुंबईच्या पांखरांतच काय पण मुंबईत रहाणाऱ्या यच्चयावत् प्राणीमात्रांत अत्यंत सुखी प्राणी म्हणजे मुंबईच्या शा० चापशी, तेरशी, किरपाळ वगैरे नांवें धारण करून मुंबईकरांच्या अन्नधान्याची सगवड करणाऱ्या कीराणा अने भुसार मालाच्या व्यापाऱ्यांनीं शेफारून ठेवलेले पारवे! गळ्यांतून लोक-विलक्षण असा आवाज काढीत प्रेम करणें एवढ्याचसाठीं यांचा जन्म आहे. त्यांच्या घाऊक पंक्ती उठवण्याचें काम मुंबईच्या दाणेवाल्यांकडे आहे. त्यांना टाकण्याचें धान्य जर हे दुकानदार गिऱ्हाइकांना देतील तर आख्या मुंबईचा दुवा घेऊन जातील. सगळ्या धान्यांत आणि कडधान्यांत ती ती रंगसंगती साधणारे खडे मिसळून झाले कीं उरलेलें धान्य हे लोक ह्या पारव्यांना टाकतात. पिंजऱ्यांत न ठेवतां पाळले गेलेले असे हे समस्त पक्षीसृष्टींतले पक्षी आहेत. मुंबईच्या पारश्यांसारखे पारवेहि आपली जमात सोडून इतरांशीं मिसळतांना दिसत नाहींत. त्यांचें गळ्यांतून आवाज काढून बोलणेंहि पारश्यांच्या बोलण्याशीं मिळतें जुळतें असतें आणि कांहीं बाबतींतलें वागणेंहि!

पिंजऱ्यांतला सर्वांत लोकप्रिय पक्षी म्हणजे पोपट. वास्तविक हा आवडायला हवा. पण पाळीव पशु आणि पक्षी यांविषयीं सर्वस्वी अप्रीति निर्माण करण्याचें कार्य माझ्या लहानपणीं ह्याच पक्ष्यानें केलें. पोपट तोताराम, मिठुमिया असें कांहीं कांहीं बोलतो हें एक साक्षीत् असत्य आहे. पोपटाचें बोलणें हें आगगाडीच्या कशासाठीं पोटासाठीं सारखें आहे. रुळावरून सांधे धरीत सोडीत धांवणारी आगगाडी 'कशासाठीं पोटासाठीं-खंडाळ्याच्या



'मघई' खाणारा काशीचा पंड्या

घाटासाठीं' हें बालगीत म्हणते हें जर सत्य असेल तर मी पोपट तोताराम-तोतारामच काय, पण संपूर्ण गीतरामायण म्हणतो हें मानायला तयार आहें. उगीच कांहींतरी! पोपटाचें बोलणें हें त्याच्या मालक मालकिणीनें आधींच मनांत धरलेलें असतें. आजवर मीं शेंकडों पोपट पाहिले. 'क-र-यू-पी-त्र्यँ-चॅक्-व्ह्यू' एवढीं अक्षरें एका दमांत किंचाळणारा हा एक पक्षी आहे. दिसायला मस्त. बनारसी तमाखू घातलेलें मघई पान जमवल्यासारखी चोंच रंगवून-काशीच्या पंड्या-सारखीच हिरवीगार शाल पांघरून-पिवळा जर्द पेरू फोडीत पिंजऱ्यांतल्या पिवळ्या दांडीवर न ओरडतां बसलेला असला तर पहायला बरा वाटतो. आंब्यापेरवांच्या बागांतून थव्यांनीं उडत असला तरीहि प्रेक्षणीय. पोपट लोकप्रिय व्हायला गार्डांच्या बावट्यासारखी त्याची लाल-हिरवी रंगसंगती पुष्कळ कारण आहे. पण तो 'सगळं-सगळं बोलतो' हा मात्र त्याच्यावर आरोप आहे.

पण ही त्याची चूक नाहीं. सकल पाळीव पशुसृष्टि आणि पक्षीसृष्टि यांच्याशीं माझें वैर जुळवणारा घटक ह्या इथें येतो. हा घटक म्हणजे ह्या प्राण्यांना पाळणारे पाळंदे लोक! कावळा चिमणी ह्यांची ह्यांतून सुटका झाली. पारव्यांचें वागणेंहि बऱ्याचवेळां अश्लीलतेच्या कायद्यांत येण्यासारखें असलें तरी त्यांचें कौतुक सांगणारे लोक नसतात त्यामुळें त्या पक्ष्यांचें आमचें वैर नाहीं. असलाच तर थोडासा मत्सर आहे. ह्या पक्ष्यांनीं इतके आवाज काढून कधीं कुणाला माणसाच्या बोलींत बोलल्याचा भास झाला नाहीं. वळचणीला वर्षानुवर्षें नांदणाऱ्या चिमणीनें कधीं 'काय काकू, झाली का पूजा?" म्हटल्याचें ऐकलें नाहीं—खिडकींतल्या काव-कावींतून 'काय बळवंतराव, काय म्हणतोय दमा?' असा सवाल फुटल्याचें कुणी सांगत नाहीं—पारवापारवीच्या घुमण्यांतून कुणालाहि "केम डार्लिंग—" सारखें कांहींच ऐकूं आलें नाहीं आणि पोपटाच्या त्या कर्णभेदक किंकाळीं-तून सगळं सगळं ऐकूं येतं काय? वास्तविक पिंजऱ्यांत भिजवलेले हरभरे, पेरू, हिरवी मिरची असलें खाणें खाऊन बिचारा ब्रह्मचर्य-सत्य-अस्तेय-ऽऽ करीत बसलेला असतो. हा काय बोलणार? कावळ्याची कावळी चार-चौघांत बाहेर पडली नाहीं तरी ती असते हें कावळ्यांच्या वाढत्या संख्येवरून उघड आहे. पण पिंजऱ्यांत पोपट—पोपटीचा जोडा बसवलेला मीं तरी पाहिला नाहीं. मोकळ्या पोपटांचेंहि मैना नामक विजातीय पोरीशींच संधान असतें म्हणतात—ती देखील विशुद्ध मैत्रीच असावी. कारण राघू-मैना ह्या मी फक्त लावण्यांतूनच ऐकल्या आहेत.

पोपटाला एक अक्षरहि बोलतां येत नाहीं हें सत्य मी लहानपणींच बोलून दाखवल्यामुळें

शेजाऱ्यांचा रोष ओढवून घेतला होता. ह्या पोपटकल्या शेजाऱ्यांच्या पिंजऱ्यांतला राघू नुसताच 'क्यीऽऽर्र' करायचा. किंबहुना तो क्यीऽऽर्र एवढेंच बोलूं शकतो म्हणून त्याला कुण्या सत्यवक्त्यानें कीर असें म्हटलें आहे. पण आपला पोपट सगळं घडाघड बोलतो असा आमच्या शेजारच्या फडकुल्यांचा दावा होता. आतां त्यानें पिंजऱ्याच्या सळयांवर शेपटी आपटून 'क्यीऽऽर्र' केलें कीं त्याचा अर्थ 'काय गणपतराव, झालं का जेवण?—आज काय बेत—वा! पुरणपोळी का—मजा आहे बुवा—तुमचं कुटुंब भलतंच सुग्रण की होऽ—हॅ हॅ हॅ!" एवढा होतो हें मज बालकाला कसें उमजावें? मीं त्या पोपटाचा फार बारकाईनें 'स्टडी' केला होता. पोपट हा डोळ्याच्या विरुद्ध कडांना बुबुळें लागलेल्या चकण्यासारखा पहातो. चकण्या लोकांत कांहींचीं बुबळें नाकाच्या पुलाजवळ भेटायला येतात तर कांहींचीं कानशिलांच्या दिशेनें पांगलेलीं असतात. पोपट दुसऱ्या वर्गांतला. पोपटाचें तें पहाणें मला कधींच आवडलें नाहीं. कारण असल्या डोळ्यांचीं माणसें सदैव रागावल्यासारखीं वाटतात. पोपट देखील तें सक्तीचें ब्रह्मचर्य-सत्य-अस्तेय आणि मिरच्या ह्यामुळें नेहमीं कावलेला दिसतो. शिवाय त्याच्या साध्या पाहण्यांतहि धूर्त संशय असतो. मी फडकुल्यांच्या पोपटाकडे तासन् तास पहात असें. मधूनच त्यानें 'क्यीऽर्र' केलें कीं कुणावरून तरी शिवी हासडल्याचा भास होई. पण फडकुलीणकाकू मात्र म्हणत "ऐकलंत का कसा—सत्य वदे वचनाला नाथा म्हणतोय तो—" असल्या भयानक डोळ्याच्या पक्ष्यानें क्यीऽर्र केल्यावर फार तर स्वयंवरांतलें 'धष्ट-पुष्ट नरवडा' हें गाणें (होय—ह्यालाहि गाणें म्हणत एके काळीं.) म्हटलें आहे असें वाटलें तर तें मला कदाचित् पटलेंहि असतें. पण सत्य वदे वचनाला नाथा! त्याला अर्थात् फडकुलीणकाकूंचाहि नाइलाज होता. त्यांना पेटीवर वाजवून गायला तेवढें एकच गाणें येई. येई म्हणजे, त्यांना पेटीवर 'सत्य' सांपडेपर्यंत गळा 'नाथा'पर्यंत पोहोंचलेला असे. फडकुलीणबाईचें गाणें म्हणजे पेटीच्या पट्ट्यांवरून इष्ट स्वर तपासत धांवणारीं बोटें आणि बेगुमान वेगानें सुरांशीं भांडण करून निघालेला गळा यांची शर्यत असे. तेंहि मी सहन करीत होतों—पण 'क्यीऽर्र' म्हणजे सत्य वदे हें मी प्राण गेला तरी मानायला तयार नव्हतों. फडकुल्यांना तो शिवमहिम्नस्तोत्र म्हणत असे; त्याचा साक्षात्कार होत असे. आणि मी ग्यालि-लियोच्या धैर्यानें 'अहो पण तो बोलत नाहीं.' हें सांगत होतों. (ग्यालिलियोच ना तो? सूर्य किंवा पृथ्वी कुणाभोंवतीं तरी कुणी तरी फिरतेय् म्हणाला म्हणून फांशी गेलेला?) शेवटीं माझ्या आईनेंदेखील 'मेल्या, तो बोलतो म्हटलंस तर काय जीभ झडणार आहे तुझी?' इत्यादि मातृसुलभ दमदाटी करून पाहिली. पण मीहि हट्टाला पेटलों होतों. फडकुलीणबाई तिथून मारे 'बघा कसा विठ्ठू विठ्ठू करतोय' म्हणायच्या. मी इथून ओरडून सांगत असें. "मुळींच नाहीं. तो नुसता क्यीऽऽर्र क्यीऽऽर्र करतोय—क्यीर्र क्यीर्र म्हणजे काय विठ्ठू विठ्ठू आहे?" शेवटीं माझ्या वडिलांनीं ती चाळ सोडली. त्यावेळीं मुंबईत शेजाऱ्यांचा पोपट आवडत नाहीं एवढ्या कारणासाठीं सुद्धां जागा बदलतां येत. नव्या चाळीच्या ग्यालरींत कुठेंहि पिंजरा टांगला नसल्याची खात्री केली आणि चाळीच्या भय्याच्या हातावर अखंड बारा रुपये टिकवले. (त्यावेळीं कांहीं चाळवाले दोन महिन्यांचें आगाऊ भाडें घेत.) पशुपक्षी पाळणारांविषयींच्या माझ्या अनादराची गंगोत्री ही इथें आहे.

• मुख्यतः पाळीव प्राणी तीन. पोपट, मांजर आणि कुत्रा. एका इसमानें माकडहि पाळलें होतें. परंतु दोघांचीहि आचरटपणाची इतकी चढाओढ चाले कीं कुणी कुणाला पाळलें आहे हें कळत नसे. घार-गरूड वगैरे पक्ष्यांना कुणी हौसेनें पाळल्याचें ऐकिवांत नाहीं. शिवाय ह्या आणि इतर बऱ्याचशा पक्ष्यांना मी पेंढा भर-लेल्या स्वरूपांतच पाहिलें आहे. इतिहासाच्या पुस्तकांत कुठल्याशा मोगल बादशहाच्या मनगटावर बहिरी ससाणा काढलेला असायचा. तोहि प्रत्यक्षांत पाहिला नाहीं. हा म्हणे इतर पक्ष्यांचा पाठलाग करून त्यांना पकडतो. राज्यकर्त्यांच्या मर्जीत येण्यासाठीं स्वकीयांचा वध करणारी अवलाद केवळ माणसांत नसून पक्ष्यांत देखील आहे एवढाच एक समाधानाचा सुस्कारा सोडण्यापलीकडे ह्याहि पक्ष्याविषयीं कांहीं कुतूहल उरलें नाहीं. मोर वगैरे मातबर पक्षी राणीच्या बागेंतच पाहिले. फार वर्षें तिथें राहिल्यामुळें इथले मोर नाचकाम विसरलें असावे. लहानपणीं मुंबईकर बाप आपल्या मुलांना अधूनमधून तिथेंच फिरायला नेत. दामले मास्तर नामक सुल्तानाच्या अमदानींत शालेय सहली वगैरे कौतुकें अशक्य होतीं.

लेखकांच्या नाना 'कळा':

राजकीय लेखक



सर्कशींतला खडा विदूषक
टोपि पांढरी नूर भयानक
कसरत करतो गिरक्या घेउनि
मुखीं लेखणी—तार ही जुनी
खादले जरी चणेफुटाणे
पचणें नाहीं—दंत किति उणे
घेतो चावे, भुंके बेसुर
भेडसावि हा बाळां दर्दुर

त्यामुळें मुलांना नेण्याची एकमेव जागा म्हणजे राणीचा बाग. तिथें इतक्या वेळां जाऊन मयूरनृत्य कधींच पहायला मिळालें नाहीं. पुस्तकांत मोरपीस घातल्यानें विद्या येते असा एक समज होता. गणिताच्या पुस्तकाचें पानन् पान दाखवलेल्या त्या पीसानें परीक्षेंत आपल्या डोळ्याएवढेंच वर्तुळ दाखवून तोहि मयूरनृत्या-सारखाच भ्रम आहे हें सिद्ध केलें. लांबलचक पिसाऱ्याचा तो लंबे-झाडू ओढीत राणीच्या बागेंतून हिंडणारा मोर आजहि माझ्या डोळ्यापुढें आहे. पण त्याला मीं नुसताच पाहिला. नाचतांना पाहिला नाहीं. त्यामुळें डोक्यावरच्या केसांचा पिसारा संभाळीत इडली खात बसलेल्या एखाद्या जागतिक कीर्तीच्या भरतनाट्यम्‌वाल्याला उडप्याच्या दुकानांत पाहून जितका आनंद व्हावा तितकाच माफक आनंद ह्या राणीच्या बागेंत नुसत्याचे

(पान १७५ वर चालू)

अनुक्रमणिका



—अरविंद गोखले



पिंडाला कावळा शिवला होता.

काय एकेक विचित्र समजुती. हृषिकेशला आतां सगळ्याचंच हसूं येत होतं. थंडगार पडलेल्या शरिराची राख होते. जड शरीर सोडून आत्मा आपली वाटचाल करूं लागतो. चराचर सृष्टीशीं त्याचं नातं तुटतं. पण उत्सवप्रिय माणसं पिंड ठेवून काळ्या पक्ष्याची वाट पहात ताटकळत बसतात. मृताच्या राहिलेल्या वासना पुऱ्या करण्याच्या शपथा घेतात. या सगळ्या शपथा पाळणं जरूर असतं का? वचनभंग केलाच तर काय होतं? मरणापूर्वी माणूस काय वाटेल तें मागतो. बरळतो. त्याला तेवढीच किंमत द्यायची. तेवढ्यापुरतं हो म्हणायचं. पिंड पुढें ठेवून पुन्हा त्याचा उच्चार करायची रूढी कसली हास्यास्पद नि तापदायक!

अंबिकेच्या तसं पाहिलं तर साऱ्याच इच्छा अपुऱ्या राहिल्या होत्या. आयुष्य नुकतंच कुठें मोहरत होतं. लग्न होऊन सारीं तीनच वर्षे झालीं होतीं. हृषिकेशला नुकतीच नवी, वरच्या पगाराची नोकरी मिळाली होती. राहायला मोठी, चांगली जागा मिळायची शक्यता होती. अम्बिकेची अद्याप कूस उजवायची होती. सगळं कसं झगमगतं झालं होतं. आणि अचानक अम्बिकेला मुदतीचा ताप आला. ती झपाट्यानें झिजत चालली. सगळे उपाय लटके टरले व मृत्यु अटळ दिसूं लागला. तिलाहि उमगलं कीं आपण आतां जगत नाहीं. आपण मांडलेल्या डावांतून आपल्यालाच उठावं लागणार. विझण्यापूर्वी दिवा मोठा व्हावा. तसं ती, सगळं शांतपणें सोसणारी मुलगी, जगण्यासाटीं आकांत करूं लागली. आणि मग एकदम पंचतत्त्वांत विलीन झाली.

वांकड्या मानेचा व भुकेल्या डोळ्यांचा कावळा झाडावरून खालीं उतरेना तेव्हां दुःखानें काळवंडलेल्या हृषिकेशला कुणीतरी म्हणालं, "तिचा आत्मा घोटाळतोय. शेवटीं ती सारखं घोकत होती—तुम्ही दुसरं लग्न करा म्हणून. तोच तिचा एक आग्रह होता. तुम्ही दुःखी, एकाकी राहिलांत तर तिच्या आत्म्याला शांति मिळणार नाहीं. तो तुमच्याभोंवतीं अनवाणी फेऱ्या घालीत राहील. उठा—सांगा तिला..."

हृषिकेशच्या डोळ्यापुढें मालिनीची मूर्ति तरळत होती. कितीतरी दिवसांत तिचं दर्श

*मालिनीच्या डोळ्यांत विचित्र भाव दाटले. काय भयंकर ऐकत होती ती ! नुकतीच कुठें तिला सुखाची सावली दिसत होती. नियतीनें तिच्या पदरांत सुखाचं दान टाकलं होतं; पण अंबिका जातांना केवढी अडवणूक करून गेली....!*

नव्हतं. आणि आता लवकर भेटणं वाईट दिसणार होतं. तिच्या आपल्यांतला अडसर कायमचा दूर झाला, कीं एक नवाच अंतराय उत्पन्न झाला-त्याचा कळेना. थरथरत्या अंगानें व भकास मुद्रेनें तो कसाबसा उभा होता. म्हणायचा यत्न करीत होता, 'पुन्हा लग्न करीन अंबू. तुझी आठवण काढीत बसणार नाहीं. तूं शपथ घातलीस म्हणून....अम्बिके, जातांना काय हें करून गेलीस...'

...हृषिकेश उशिरां घरीं परतला तेव्हां अम्बिका दारांत वाट पहात होती. अम्बिकेला पाहातांच तो मनांत चरकला. लग्न झाल्यापासून आज प्रथमच त्याला तिचं संपूर्ण विस्मरण झालं होतं. संध्याकाळीं तो सहसा एकटा बाहेर जात नसे. गेला तरी असा उशीर करीत नसे. आपलं माणूस काळजी करीत दारांत उभं आहे ही कल्पना मोठी सुखाचा होती. त्या सुखाची चव त्यानें पांचसहा वेळां चाखलीहि होती. पण आज अम्बिकेची काकुळतीची नजर पाहून त्याला कसंसंच झालं. तिच्या शरिराचा स्पर्श टाळीत तो घरांत आला. कपडे बदलून तोंड धुवूं लागला.

"इतका उशीर? पोस्टांत पत्रं टाकून येतों म्हणालांत अन् तासभर बाहेरच राहिलांत... कुणी भेटलं वाटेंत?"

हृषिकेशनें तिच्याकडे दचकून पाहिलं. पानावर बसत तो म्हणाला,

"हो—"

"वाटलंच मला. बसलां असाल चहा पीत हॉटेलांत...जेवणाकडेहि लक्ष नाहीं...बाहेर जाऊं म्हणालांत म्हणून मी वाट पाहात राहिलें—"

हातांतला घास तसाच ठेवून हृषिकेशनें तिच्याकडे पाहिलं. अन्नाचीं भांडी जवळ घेत ती जेवायला सुरुवात करीत होती. तिचा हात धरीत तो म्हणाला,

"आय् ॲम् सॉरी, अंबू—"

"इश्श...त्यांत काय एवढं? मला कुठें जायचं होतं असं नाहीं. तुम्हाला उशीर झाला म्हणूनच काळजी..."

दोघंहि न बोलतां जेवूं लागलीं. हृषिकेशच्या घशाखालीं घांस उतरेना. त्याला वाटलं, अंबिकेला एकदम सांगून टाकावं. तिच्यापासून कांहीं लपवायचं नाहीं असं आपण ठरविलं होतं. पतिपत्नींनीं विश्वासानें एकमेकांना आपापल्या मनातलं सांगायचं! सुखी संसाराचा पायाच तो. सुखी संसार कसला—सगळ्यालाच आज सुरुंग लागल्यासारखं झालेय. उगीच संसार थाटला असं वाटायला लागलं आहे. स्वप्नांतूनहि जी गोष्ट नाहींशी झाली होती ती आज प्रत्यक्ष त पाहिली. मालिनी नुकतीच त्याच्या पुढून गेली होती. आज चारएक वर्षांनंतर मालिनीचं दर्शन घडलं.

कसंबसं जेवून तो बाहेरच्या खोलींत आला. गॅलरींत गेला. परत आंत येऊन रेडियोशीं खेळूं लागला. छे, एकाएकीं सगळं तकलुपी वाटूं लागलं होतं. ह्या सगळ्या वस्तू, हें बिऱ्हाड, स्वैपाकघरांत लगबग करणारी बायको—हा कसला डाव मांडून बसलों आपण! इतके कसे निष्ठुर झालों? साळसूदपणें मालिनीला विसरून गेलों? अंबिकेला पाहातांच वेडे झालों. तिच्यासह संसार थाटला. वाटलं, आतां जुनं कांहीं आठवायचं नाहीं. पण आज मालिनी नुसती ओझरती दिसली अन् सगळं डळमळीत झालं.

हृषिकेशला अगदीं गुदमरल्यासारखं झालं व तो वरच्या स्वरांत म्हणाला, "अंबू, झालं कीं नाहीं तुझं अजून? बाहेर ये आतां—"

"आलेंच—" अंबिका म्हणाली व थोड्या वेळानें बाहेर आली. तीं दहापंधरा मिनिटं हृषिकेशला फार घालमेलीचीं गेलीं. अंबिका लवकर इथें आली नाहीं तर आपण, मन आवरणं अशक्य होऊन घराबाहेर पडूं, मालिनीचा शोध घेत वणवण करूं, असं भय वाटलं. छे, मालिनीशिवाय सगळं व्यर्थ आहे. अंबिकेवर एवढी माया केली. तिच्यासह संसार थाटला, पण आपण खरोखर यांत गुंतून गेलों नाहीं...

अम्बिका बाहेर आली तशीच गॅलरींत गेली. परत आली व खिडक्यांचे पडदे ठाकठीक करूं लागली. सुपारीची डबी उघडून सुपारी चघळूं लागली.. सहजच म्हणाली,

"कोण एवढं भेटलं होतं?"

क्षणमात्र हृषिकेशला वाटलं, हिला कांहींच सांगूं नये! पण त्यानें अवसान आणलं. आरामखुर्चीवर रेलत तो म्हणाला,

"अम्बू, आज मला माझी एक जुनी मैत्रीण भेटली..."

"कोण ती? तिला घरीं तरी आणायची."

त्याला एकदम तिची कणव आली. साधी भोळी!—पण मग तो म्हणाला,

"तुला पूर्वींच सांगायला हवं होतं. माझं एका मुलीवर प्रेम होतं. मालिनी नांव तिचं. आम्ही लग्न करायचीं वचनं दिलीं होतीं. आज ती मला दिसली. नुसती दिसली..."

"म्हणजे भेटली नाहींच तर. मग गेलां होतां कुठें इतका वेळ?"

—ती दिसली नि ती उन्मळून गेलों. बेचैन झालों. मला सगळं जुनं आठवलं. अन् घरीं परतावंसं वाटेना. आम्ही लग्न करणार होतों. ती लग्न करायला, संसार थाटायला फार आतुर होती...हृषिकेशला हें सगळं म्हणावंसं वाटलं. पण तो नुसता बसून राहिला. अम्बिकाहि मग बोलली नाहीं. रेडियो लावूं लागली. दिल्लीवरच्या बातम्या, कुठलं तरी सुगम संगीत, हिंदी चित्रपटाच्या चालीवरचं तामिळ गाणं, एका विदेशी स्टेशन, नुसतीच खरखर, गोंगाट...निरनिराळीं स्टेशनं फिरवीत तिनें रेडियो बंद केला. ती आवाजांची सरमिसळ ऐकून हृषिकेश अधिकच उन्मळून गेला. जुनी जखम वाहूं लागली.

अंबिका त्याच्यासमोर बसली. पदर खालीं टाकून, पाय हालवीत, सुपारी गालांत चघळीत तिच्याकडे पाहात हृषिकेश म्हणाला,

"ती दिसली नि मला कसंसंच झालं. तसाच मी उभा राहिलों नि वेळ गेला. तिला माझ्याशीं लग्न करायची फार इच्छा होती—"

"मग—कां नाहीं केलत? फसवलंत तिला?"

"असं बोलूं नको अम्बू—सगळ्या गोष्टी विचित्र होत्या. ती मामाच्या आश्रयानें रहात होती. तिची धाकटी बहीण पांगळी होती. आजारी होती. नोकरी मिळाल्यावर मी तिला म्हटलं, ह्या तुरुंगांतून चल नि माझ्याशीं लग्न कर. तुझ्या बहिणीला आण हवं तर!



## समुद्र-राग

••••••••••••

बा. भ. बोरकर

पावसांत जागला समुद्र-राग सांवळा
लाट लाट दाटते भरून भाव कोवळा
कांठ कांठ ढांसळे, पिसाट माड स्फुंदती
आंधळ्या ढगांतुनी प्रकाशबिंदु सांडती
हाक ये दुरून एक झाकळून टाकते
गाढ गूढ आठवांत मूक वेल वाकते
माखते चराचरीं अथांग गांग गारवा
आगळा जगास ये उदास रंग पारवा
धूसरे सरींत दूर, सूर सूर व्याकळे
भाव कीं अभाव हा करी सुगंध मोकळे!
कोण ही व्यथा अशी सुवास लाज आणते
सागरार्थ कोणत्या उसासुनी उधाणते ?

ती लगेच तयार होईना. म्हणाली, बहीण फार आजारी आहे. मी गेलें तर तिचे हाल होतील. मामा तिला मारून टाकील. आमचा वाद झाला नि मी निघून आलों. तिला पत्रहि लिहिलं नाहीं. तिनेंहि मला कधीं लिहिलं नाहीं. क्षुल्लक वादाचं असं चिडींत रूपांतर झालं...अन् तसंच वर्ष गेलं. मला वाटलं, तिनें मला टाळलं. मला तिला विसरायला हवं. तेवढ्यांत तुझं स्थळ आमच्या घरमालकानें सांगितलं. तुला पाहिल्यावर..."

हृषिकेश भडाभडा बोलला व एकदम जीभ तुटल्यासारखा थांबला. आपण निर्दोष आहोत हें अंबिकेला पटलं का हें बघू लागला. मालतीची चूक नाहीं असंहि तिला पटावं असं ...ला मनापासून वाटलं.

अम्बिका न बोलतां जरा वेळ बसून राहिली. मग ती पलंगावर आडवी झाली. डोक्याची एक उशी पोटाशीं घेत म्हणाली,

"झालं गेलं गंगेला मिळालं...तिच्याशीं लग्न झालं असतं तर तुम्ही कदाचित् जास्त सुखी झालां असतात. मी तिच्याइतकं नाहीं, तरी माझ्याकडून होईल तसं सुख तुम्हाला देईन..."

तें ऐकतांच तिच्याबद्दलच्या मायेनें त्याला भरून आलं. वाटलं, खरंच सगळं गंगेला गेलं. आतां कशाला मालिनीची आठवण? अंबिकेनें आपलं आयुष्य केवढं सुखानें भरून टाकलं आहे. तो आवेगानें तिच्याकडे गेला. उशी दूर सारून तिला पोटाशीं धरूं लागला.

हळूहळू रात्र वाढली. डोळे मिटून पडलेल्या अम्बिकेला झोप लागली. किती शांतपणें, विश्वासानें ती त्याच्या कुशींत निजली होती. तो मात्र जागा होता. सताड डोळ्यांनीं समोरच्या जळणाऱ्या दिव्याकडे पाहात होता. अम्बिका मिठींत होती, पण त्याला आठवत होती मालिनी! बसमध्यें चढतांना दिसलेली. नक्कीच मालिनी ती. गळ्यांत मंगळसूत्र नव्हतं. वाळली होती किती! पण तेंच नाजूक पण धारदार नाक, टपोरे डोळे, दोन्ही कानांवर आलेले केसांचे पेड. पदर लपेटून घेण्याची पद्धत. तो हांक मारणार तों बस गेली. त्याला तिला थांबवतां येईना, पाठलाग करतां येईना. कुठें गेली ती? इथें कशी आली? भेटेल? भेटल्यावर रागावेल? कीं पुन्हा पूर्वीच्या प्रेमानें...

एकेक आठवणी बिलगू लागल्या. मालिनीची आकृति अगदीं जवळून दिसत राहिली. तिच्याशिवाय एकक्षणहि काढणं कठीण वाटूं लागलं. ती भेटायला हवी. हवीच. तीच हवी. झोपलेल्या अंबिकेला हृषिकेशनें हलकेच दूर सारलं व आरामखुर्चीत तो एकटा जागत राहिला.

होटेलमधल्या स्पेशलरूममध्यें दोघं समोरासमोर बसलीं होतीं. खाद्य पदार्थांच्या बश्या, चहाचे कप, पाण्याचे ग्लास टेबलावर रिकामे झाले होते. खूप बोलल्यानंतर मनं मोकळीं झालीं होतीं. मालिनी हाताच्या घड्याळाच्या पट्ट्याशीं चाळा करीत होती. आणि हृषिकेशला तिच्या चेहेऱ्याकडे लावलेली टक सोडवत नव्हती.

पट्ट्याचा हूक बोटाला बोचला व मालिनीनें हात दूर केला. उन्हाच्या कवडशाकडे पाहावं तशी तिनें वाकडी मान करून हृषिकेशच्या नजरेला नजर दिली. भिजलेल्या पांखरासारखे ओठ थरथरवीत विचारलं, "काय बघतोस एवढं?"

"अजूनहि सगळं स्वप्न वाटतंय मालिनी. चमत्कार वाटतोय. तूं ह्या गांवांत राहायला येशील, मला परत भेटशील, त्याच मैत्रीनें बोलशील—"

"तसं घडलंय ना सारं—चिमटा घेऊन सांगूं?" मालिनी हंसून म्हणाली, "कीं मधासारखं डोळे पुसत सांगूं?—"

हृषिकेशनें आवेगानें तिचा टेबलावर ठेवलेला हात दाबला. आपल्या दोन्ही हातांत धरून ठेवला. ही मानधन मुलगी आपल्यामुळें आतां जन्मभर आसवं टाकीत राहाणार—ह्या जाणीवेनें त्याच्या काळजांत कालवलं. आपण धीर धरला नाहीं! तिच्यासाठीं थांबलों नाहीं! तिनें नकार तर दिला नव्हता. नुसतं म्हणाली होती, "माझ्या बहिणीकडे मला आधीं पाहिलं पाहिजे. तिच्यापुढें सध्यां लग्नाचा विचारच मला सुचत नाहीं..." तेवढ्यावरून आपण निराश झालों. बहिणीला सांभाळण्यासाठीं ही स्वतःचं प्रेम नि संसारसुद्धां बाजूला सारील असं तिचं वर्तन पाहून वाटलं. एखाद्या श्रद्धेनें झपाटणारी ती! तिच्या त्या वृत्तीवरच आपण लोभावलों होतों; आणि त्याचमुळें माघारीं वळलों. लगेच लग्न करून बहिणीलाहि आणायची कल्पना तिला रुचली नाहीं व ती मामाकडे जाच सहन करीत राहिली. आपण तिला निरोपहि पाठवला नाहीं. रुसलों, संबंध तोडला आणि अम्बिकेचं स्थळ येतांच लग्न करून बसलों. कुणी कुणाला दगा दिला? ती अजून अविवाहित असेल, आपल्या प्रेमवचनाला जागली असेल, असं ह्या भेटीपर्यंत त्याला वाटलं नव्हतं.

"मालिनी, मग तूं परत जाणार? ही नोकरी सोडणार?" त्यानें एकदम बावरून विचारलं.

"नौकरी सोडून कुठें जाऊं? मामाचा चिरेबंदी वाडा बंद आहे मला. जगायचं कांहीं साधन हवं ना! वाटलं होतं, इथली नौकरी पकडावी नि मग तुझा शोध घ्यावा...पण येतांना प्रवासांतच कळलं कीं तुझं लग्न झालंय...तशीच परत फिरणार होतें. पण..." त्याचा व्याकुळ चेहेरा पाहून ती थबकली व क्षीण हंसली. त्यानें आणखी हळहळूं नये म्हणून. त्यानें दुसरा विषय काढावा म्हणून.

हृषिकेशनें बराच वेळ घोळत राहणारा प्रश्न विचारला,

अनुक्रमणिका





"तुझी बहीण कुठंय ? मामाकडेच ? कीं गेलीं ?"

"मेली म्हणतेस ?"

ती हात सोडवून, हंसत म्हणाली, "तूं शेवटी आला होतास तेव्हां ती फार आजारी होती म्हणून म्हणतोस कीं काय ! छे रे, ती बरी झाली. अंथरुण सोडलन् नि कुबडी घेऊन हिंडूं लागली. चांगली बोलकी, गलेलठ्ठ झाली—"

"अन् मग ?"

"ती पळून गेली ! तिनें लग्न केलं. मामाकडे देवपूजा करायला येणाऱ्या भटाबरोबर गेली. कोकणांत आहे सध्यां. मूलहि झालंय म्हणे तिला..."

"काय म्हणतेस काय—?"

"तिच्यासाठीं मी मामाकडे राबलें. तुला दूर केलं. अन् ती मला न कळवितां गेली... पाहिलंस, लुळ्यापांगळ्या मुलींचीं देखील लग्नं होतात. त्याहि कुणाबरोबर पळून जाऊन लग्न करतात..." मालिनी थांबली व पर्समधून रुमाल काढूं लागली.

हृषिकेशचा चेहेरा पुरता उतरून गेला. केवढा भयंकर घोटाळा आपण करून ठेवला आहे हें उमगून तो तळमळूं लागला. कुठल्या तिरमिरींत आपण मालिनीला विसरायचं ठरवलं ? अम्बिकेशीं लग्न करायची कशी भूल आपल्याला पडली ? आपण मालिनीचं प्रेम प्रकरण ही तारुण्यांतली चुटपुटती घटना, एक ठेंच मानायचा यत्न केला आणि ती मात्र तो साक्षात्कार उराशीं धरून इथें आली. काय झालं हें ! कसं सुधारायचं सारं ?

मालिनीनें डोळे पुसले, नाक कोरडं केलं. पर्समध्यें परत रुमाल टाकीत म्हटलं, "जाऊं दे रे ! कशाला कांहीं इलाज नाहीं. तूं कशाला इतकं लावून घेतोस ? मी तुला दोष देत नाहीं. तुझी काय चूक ? तूं माझ्या विनवण्या केल्यास, अपुऱ्या पगारांत बहिणीलाहि सांभाळीन म्हणालास. मला तें मानवलं नाहीं. वाटलं, ताई वर्षांभराची सोबतीण आहे. ती गेल्यावर मग...हृषिकेश, मी तिचं मरण चिंतलं, त्याची मला अद्दल घडली..." तिला वाटलं, आपल्या परत रडूं येणार. ती जरा थांबून म्हणाली, "चल. जाऊंया आपण...तास होऊन गेला..."

• दोघंजण रस्त्यावर आलीं व न बोलतां चालूं लागलीं. संध्याकाळ संपली होती. हृषिकेशला घरी जायची घाई नव्हती. मालिनी इथेंच मुलींच्या शाळेंत नौकरी करते हें काल त्याला कळलं तेव्हांच त्यानें घरी अम्बिकेला थाप मारली होती कीं उद्यां ऑफिस सुटल्यावर एका मित्राकडे फराळाला जायचं आहे. थाप ! बायकोला काल खोटं सांगितलं आणि आज भेट घडल्यानंतर तर यांतलं कांहींच सांगणं सोयीचं नव्हतं. पुन्हा तिला फसवलं पाहिजे. आतां फसवीत राहिलं पाहिजे. हृषिकेशला एकदम विचित्र वाटलं. अम्बिकेचा भाबडा चेहरा दृष्टीपुढें तरळला. पण दुसऱ्या क्षणीं तो मालिनीला लगटून चालूं लागला.

"चांगली जागा मिळालीय तुला ?"

"दाखवतें ना. येतोस ना ?"

"येतों. भरपूर वेळ आहे मला—"

तिची दीड खोल्यांची जागा वाईट नव्हती. नीट सजवली तर छान दिसली असती. त्याची स्वतःची जागाहि लहानच होती. पण अम्बिकेनें किती सुंदर नटवली होती. रेडिओ, गोदरेजचं छोटं कपाट, टेबलावर विणलेले रुमाल, खिडक्यांना पडदे, भिंतीवर चित्रं व कागदी फुलं, न दिसेल असं वहाणांचं खोकं. कांचेच्या कपाटांत लग्नांत मिळालेली प्रेझेंट्स्, स्वैपाक घरांतलं पाण्याचं पिंप, कपबश्यांचं खुंटाळं, हारीनें लावलेले चकचकीत डबे. छोट्याशा कोनाड्यांतला छोटा चंदनी देव्हारा...आणि इथें दोन ट्रंका, कपड्यांचे बोळे, शाळेच्या वह्यांचे गठ्ठे. निर्जीव पलंग. वेणी माळीत आरशांत बघणारी अम्बिका त्याला आठवली व तो व्यथित मुद्रेनें मालिनीच्या ओढग्रस्त आकृतिकडे बघूं लागला. त्याचं मन एकदम भरून आलं व पलंगाला टेकतांना त्यानें तिला कवेंत घेतलं.

क्षणकाल ती त्याच्या स्वाधीन झाली—व मग घाईनें स्वतःला सोडवीत म्हणाली, "नाहीं नाहीं...हृषिकेश, असलं कांहीं नको..."

"कां ग...इतक्या दिवसांनीं भेटलीस..."

"हो. पण हें नको. तुझं लग्न झालंय हृषिकेश..."

"म्हणून आपण जन्मभर दूर राहायचं ? एकमेकावर प्रेम..."

"तुझ्या बायकोशीं तूं वचनबद्ध आहेस. तिचं व्रत मोडूं नकोस." तो नाईलाजानें मागं झाला. बाजूच्या ट्रंकेवर बसत म्हणाला,

"मग आपण भेटायचं पण नाहीं ?"

"तसं कुठं म्हटलं मी ! भेट टाळायची असती तर तुझ्याबरोबर आलें नसतें. तुला इथें आणलंच नसतं. भेटूं ना—भेटायला काय हरकत आहे ? मी तर मोकळीच आहें. तुझ्या वाटेकडेच डोळे लावून आहें. तुला जेव्हां सवड मिळेल तेव्हां ये. रोज नको; बायकोला टाळून नको..."

हृषिकेशच्या मनावरचा ताण असह्य झाला व तो भकासपणें मालिनीकडे बघूं लागला. तिच्या आयुष्याची परवड झाली होती. प्रथम बहिणीसाठीं—अन् आता प्रियकरामुळें ! ह्यांतून कांहींच मार्ग नव्हता. मीलनाची जराहि आशा नव्हती. आतां फक्त अशा चोरट्या, चुटपुटत्या भेटी...तो एकदम म्हणाला,

"माझ्या घरीं येशील ? अंबूची तुझी ओळख करून देईन. तिला मी अंधुक कल्पना दिली आहे..."

मालिनी लगेच बोलली नाहीं. हृषिकेशला उत्तेजित वाटलं. मालिनी घरीं आली, अंबिकेची व तिची मैत्री झाली तर अशा चोरट्या भेटी नकोत. उघडपणें संबंध...असतात कीं अशीं उदाहरण !

**लेखकांच्या नाना 'कळा':**

**मंत्री लेखक**



**अनंत हस्ते कमलावरानें**
**देतां—किती लेखिशी दो करांने ?**
**वाणी तशी लेखणी ती प्रचुरा**
**स्त्रवी स्वभाषा स्वगिरा मधुरा**
**लाभेल कीर्ती तव लेखनीं त्या**
**कुठें वास्तवी ?–हे स्तवी अन्नदात्या**





अनुक्रमणिका

"नको हृषिकेश. तुझ्या बायकोशीं माझं भांडण नाहीं. पण एक सांगूं? मंगळसूत्र घातलेली नि तुझ्या संसारांत वावरणारी तुझी बायको मला पहावणार नाहीं. तें माझं स्वप्न होतं. तुझ्याशीं लग्न करावं, संसार थाटावा, अत्यंत विश्वासानें एकमेकांनीं वागावं..."

हृषिकेशचा चेहरा उतरला. त्यानें दोन्ही हातांनीं तोंड लपवलं, खाली केलं व तो आपले अश्रु आवरायचा यत्न करूं लागला.

त्या दिवशीं हृषिकेश उशीर करून घरीं आला तरी अम्बिकेनें त्याला कांहीं विचारलं नाहीं. नंतरहि तो ब्याच वेळां उशिरां घरीं येई पण अम्बिका त्याबद्दल कधींहि चवकशी करीत नसे. आठवड्यांतून दोनचारदां तरी मालिनीला भेटायचं, तिच्याबरोबर भटकायचं, अगर तिच्या बिन्हाडीं बसून राहायचं म्हणजे घरीं यायला वेळ व्हायचाच. तो उशिरां आला, उदास दिसला कीं अम्बिका निमूटपणें घरकाम काढी. रेडियो लावी. पलंगावर एकटी पडून राही.

एकदां तिनें अनपेक्षितपणें विचारलं,

"तुमची ती मैत्रीण कुठाय? तिला आणणार आहांत ना?"

हृषिकेश चमकला. त्याला वाटलं, तिला संशय आला. आपण मालिनीला भेटतों हें तिला कळलं आहे. आपल्या संसारांत आतां असंतोषाची आग पसरणार. भोळी भासणारी अम्बिका आतां आकांडतांडव करणार! तो तिच्याकडे विचित्रपणें पाहूं लागला. कित्येक दिवसांत त्यानें तिच्याकडे नीट पाहिलंहि नव्हतं. तिला जवळ घेतलं नव्हतं, तिच्याशीं प्रेमालाप केले नव्हते. तीनचार महिन्यांत सगळं कसं बदलून गेलं होतं. ह्या संसाराबद्दल दुरावा वाटूं लागला होता. खऱ्या प्रीतीचा झरा परत वाहूं लागल्यानें अंबिकेशीं बोलणंहि मचूळ वाटूं लागलं होतं.

पण हा डोलारा असाच सांवरीत राहिलं पाहिजे. अम्बिका नाराज होऊन चालणार नव्हतं. तिला दुखवणं, दूर ठेवणं मालिनीला खपलं नसतं दोघी आतां अशाच अंतर राखून आपल्याशीं वागणार!

"नाहीं तर आपण जाऊं एकदां तिच्याकडे–" अम्बिका त्याच्या समोरच्या खुर्चीवर बसत शांतपणें म्हणाली.

हृषिकेशला क्षणमात्र वाटलं, ही सरळ मनाची, सज्जन मुलगी आहे; हिला आपल्या काळजांतली वेदना कळायची नाहीं. तो म्हणाला,

"कशाला उगाच वाढवायची ती जुनी आठवण? जाऊं दे...भेटते मला कधींतरी ती..." मग तो एकदम सांवरून म्हणाला, "अन् भेटली तरी मी वावगं वागणार नाहीं, अंबू —" त्याला वाटलं ती आतां कांहीं तरी कडवट बोलणार!

पण तिनें विलक्षण आपुलकीनें त्याच्याकडे पाहिलं, अन् मग जराशानें म्हटलं,

"माझी खात्री आहे. माझा विश्वास आहे तुमच्यावर... पहिल्या रात्रीं तुम्ही मला वचन दिलंत. माझा मान राखीन, माझी शपथ पाळीन म्हणून. तुम्ही खरोखर तशा नेकीचे आहांत... तुम्ही जरी तिला भेटलांत तरी मला त्यांत कांहीं वाटायचं नाहीं —"

क्षणमात्र हृषिकेशला वाटलं, कीं ती मानभावीपणानें बोलते आहे. तो थबकून तिच्या प्रसन्न, शांत चेहेऱ्याकडे बघत राहिला. जितक्या विश्वासानें ती त्याच्या मिठींत निद्रिस्त होत असे, तितक्याच विश्वासानें ती ते शब्द उच्चारीत होती. हृषिकेशला तिच्याबद्दल एकाएकीं प्रेमाचा उमाळा आला. पण तो तसाच बसून राहिला. तिनें कांहीं म्हटलं तरी तो तिला फसवत होता. वावगं वागत नव्हता, तरी मनांत वेडेवाकडे विचार बागवीत होता. तिच्यापासून फार दूर गेला होता. तिनें संमति देण्यापूर्वीच मालिनीला भेटत होता. पहिल्या एकांतांत अंबिकेला वचन दिलं होतं खरं,— पण पहिल्या प्रेमांत फसवणूक झाल्याच्या वेदनांपुढें त्याला आतां कांहीं सुचत नव्हतं.

हृषिकेश आतां दोन स्त्रियांशीं स्नेह ठेवून होता. दोघींच्या अंतरंगांत वावरत होता. आत्म्यांना स्पर्श करूं पाहात होता. दोघींचाहि त्याच्यावर विश्वास होता. श्रद्धा होती. त्याच्या पायावर आयुष्यं वाहून त्या जगत होत्या. एखाद्याला हेवा वाटेल असं दुथडं वाहाणारं प्रेम, सुख. पण हृषिकेशच्या आयुष्याची फार ओढाताण होऊं लागली. मनावर एकसारखं अपराधाचं, चोरटेपणाचं, शरमेचं, वैफल्याचं दडपण पडून तो दमून जाऊं लागला. कासावीस झाला.

अम्बिका समाधानानें राहात होती. आपला नवरा एखाद्या वेळेस त्याच्या जुन्या प्रेयसीला भेटत असेल, पण तो आपलाच आहे, अखेर त्याचं स्थान इथें आहे, जीवन आपल्या आयुष्याशीं निगडित झालं आहे ह्या समाधानांत होती. तो कधीं वाईट वागायचा नाहीं, आपल्या शब्दाविरुद्ध वागायचा नाहीं ह्यावर तिची श्रद्धा होती. आणि म्हणून हृषिकेश कधीं उशीरां आला, अस्वस्थ दिसला तरी ती तिकडे दुर्लक्ष करीत होती. उलट त्याला अधिकच जपत होती. त्याची पूर्वायुष्यांत झालेली वंचना आपल्या मायेनें सौम्य करीत होती. अंबिकेच्या अशा वागण्याचा हृषिकेशला अधिकच त्रास होई. वाटे, ह्या मुलीनें संशय बाळगावा, आपल्याला छेडावं, भांडणतंडण करावं! म्हणजे हिचा जरा राग तरी आपल्याला येईल, ह्या

(पान १६२ वर चालू)



## कोण दुसरें गा मग?

मधुकर केचे

माझ्या अपेक्षा सांगून  
नासू कशी तुझी शांती  
तूं तो तेव्हां होतासच  
माझ्या अवतीभवती.  
नव्हतास कसा तेव्हा;  
कोण दुसरें गा मग?  
तुझ्या—विनाच कशी मी  
सारी साहिली ती धग?  
तूंच होतास होतास  
पुन्हा आठव ते सारे;  
कुठले ते महा वारे?  
नसो; नसूं दे स्मरण  
नको आताही उच्चार  
तुझ्या उदासीनतेची  
नको बोथटाया धार.  
नको दाखवूस कधीं  
तुझ्या संगाचा आकार  
असा मुक्यानेंच पण  
करी माझ्यावर वार.

अनुक्रमणिका








*'पोत' या खळबळजनक व विचारप्रवर्तक लेखमालेनंतर चित्रकार गोडसे तितक्याच जोमानें ललित साहित्याकडे वळत आहेत. या वार्षिकांकांत सुरू होत असलेल्या त्यांच्या अपूर्व संवादिकामालेचा हा पहिला भाग. पुढील चार भाग दीपावली मासिकांतून क्रमशः प्रसिद्ध होतील.*

आडवाटेला एखादी प्राचीन मूर्ति सांपडावी त्याप्रमाणं प्रस्तुत लोककथा, रायगडाच्या परिसरांत हिंडतांना, आज जवळजवळ आडवाटेलाच असलेल्या किल्लेवाडीला मिळाली. लोककथेला बसायला नेहमींच एखादी खुणेची जागा, वस्तू अथवा वास्तू लागत असते. एखादा शिलाखंड—भग्नमूर्ति-जीर्णवृक्ष—एखादी ओसाड जीर्ण वास्तु वगैरे वगैरे. प्रस्तुत कथासुद्धां एका समाधीच्या जीर्ण वास्तूला विलगलेली आढळली. ती जीर्ण वास्तू म्हणजे किल्लेवाडीजवळ असलेली गोदावरीची समाधी.

सांपडलेल्या मूर्तीप्रमाणंच घरीं आणून आस्थेनं तिला साफ केली. तिच्यावर चढलेली मातीचीं पुटं उकरून काढलीं. तिला धुतली, पुसली, स्वच्छ केली—आणि बारकाईनं न्याहाळली. कथामूर्ति अभिजात होती. ती ज्या खडबडीत स्वरूपांत प्रथम दिसली—ऐकली—त्या श्रवणदर्शनांतच तिचा अभिजातपणा जाणवला होता. आतां खात्रीच पटली. निरनिराळ्या कोनांतून तिच्याकडे अनेकवार पाहिलें. तिचा बांधा, घाट, डौल तिच्यावरची कलाकुसर—जवळून दुरून बारकाईनं न्याहाळली—तींत प्रतीत होणाऱ्या जाणिवा निष्ठांचा अंदाज घेतला—लोककथा जिवंत होती—नाट्यपूर्ण तर होतीच. एरवीं ती लोककथाच झाली नसती.

तरुण शंभुराजांनीं पळवून नेलेल्या एका ब्राह्मण विवाहित तरुणीची ही कथा. तिची वर उल्लेखिलेली पार्थिव समाधी शिवकाळांतच बांधण्यांत आली असावी. तीच घटना लोकभाषेंत सांगणारी ही लोककथासुद्धां एकापरीनें त्या तरुणीची समाधीच आहे. लोकसाहित्यानं आपल्या धाटीनं बांधलेलं एक शब्दवृंदावन—काळाच्या ओघांत लोकांच्या श्रद्धासमजुतींनीं जपून ठेवलेली एक अक्षर स्मृति.

गेल्या तीनशें वर्षांत रायगडाच्या परिसरांतील अनेक पिढ्यांनीं या कथेचा वहाळ आपआपल्यापरीनं जिवंत व प्रवाही ठेवला आहे. मला ही कथा प्रथम सांगणाराहि त्याच परिसरांतला होता. आणि त्यानं ती आपल्या खेडवळ ढंगानं रंगवून मोठ्या जिव्हाळ्यानं सांगितली होती. लोकस्मृतीनं स्वाधीन केलेलं

अनुक्रमणिका

# 'शंभूराजांकरितां माझंहि मन आज, रक्ताचीं आसवं ढाळून रडत आहे....

चित्रकार : द. ग. गोडसे

हें लोण आपणहि आपल्यापरीनं परत करावं; शक्य झाल्यास अधिक निश्चित स्वरूपांत, जरा विस्तारानं इतरांना सांगावं असं वाटलं आणि आणि त्या दृष्टीनंच हा प्रयत्न आहे.

प्रत्यक्षांत कांहींतरी घडल्याशिवाय लोककथाहि घडविल्या जात नाहींत. प्रस्तुत उदाहरणांत लोककथेच्या बाजूनें पुरावा देण्यास प्रत्यक्ष समाधीच उभी आहे; त्यावरून लोककथेंतील घटना प्रत्यक्षांत घडली याबद्दल शंका उरत नाहीं. मग प्रश्न उभा राहतो - इतिहासाच्या नेमक्या कोणत्या काळखंडांत ही कथा प्रत्यक्षांत घडली असावी ?–त्या कालखंडांत जर प्रस्तुत लोककथा संगतवार नेमकी बसवतां आली तर कथाकथनाच्या ह्या प्रयत्नाला अधिक निश्चित स्वरूप प्राप्त होईल असें वाटलें. ह्या धोरणानें अधिक ऐतिहासिक तपशील गोळा करण्याचा प्रयत्न केला, त्यांतील महत्त्वाचा भाग सारांशानें असा....

लोककथेंत राजमाता जिजाबाईचा भाग प्रामुख्यानें आहे. जिजामातोश्री शिवराज्याभिषेकानंतर थोड्याच दिवसांत निवर्तल्या म्हणजे राज्याभिषेकापूर्वी ही घटना घडली हें निश्चित. लोककथेंतील घटना इ. स. १६७२-७३ सालांत घडली असावी. त्यावेळीं जिजाबाईचें वय ७८ वर्षांचें असून त्या व इतर मंत्री पाचाडला रहात असत.

जिजामातोश्री वृद्ध झाल्यामुळें शिवाजी राजांनीं शंभुराजांना त्यांच्या वयाच्या १४ व्या वर्षीं (२६ जानेवारी १६७१) रायगडची मुखत्यारी व शिक्कामोर्तब दिले.

शंभुराजे व निवडक किल्ल्यावरील नोकर एवढेच खजिन्यासह रायगडावर रहात.

यावेळीं शंभुराजांचें वय १५-१६ च्या दरम्यान असून त्यांची पत्नी येसूबाई दहा-अकरा वर्षांची होती. अजून वयांत न आल्यामुळें ती आपल्या माहेरींच असावी.

इ. स. १६४६ जानेवारी २८ रोजींचा पुरावा. शिवाजीराजांचे, 'प्रतिपच्चंद्रलेखेव' ही मुद्रा असलेले, रांझे गांवच्या पाटिलकीसंबंधीचें अगदीं पहिलें उपलब्ध खुर्दखत. रांझे गांवचा पाटील बाबाजी बिन भिकाजी गुजर यानें वाईट वर्तन केलें म्हणून–सोळा वर्षांच्या शिवाजीनें त्याची चवकशी केली. गुन्हा शाबीत झाला म्हणून त्याला शिक्षा केली. त्याची वतनी पाटीलकी तर सरकारांत जप्त केलीच; शिवाय त्याचे हातपायहि तोडून त्याला दूर केलें. शिवाजी राजांचें पहिलें शिक्क्याचें पत्र, त्यांची निष्ठा-न्यायप्रियता व त्यांचा करडा अंमल यांवर प्रकाश टाकणारें आहे.

वरील तपशील शोधीत असतांनाच आणखी एका महत्त्वाच्या व्यक्तीचा शोध लागला. ती व्यक्ति म्हणजे शंभुराजांची ओलीदाई "धाराई" गाडे करीन्यांत धाराईचा उल्लेख असा—

"धाराई आवा–तिला जिजाबा आउसाहेबांचा हुकूम झाला आणि दाई करून प्रतापगडास नेली. महाराज शिवाजी राजे यांचे स्त्रीस दूध नव्हते, म्हणून दाई केली; आणि संभाजी राजे यांस दूध लावले. पाजीत असता राजे थोर झाले. असामी दिधली. धाराई आवा तैनात वरसाची होन २६ पावत होती."—गाडे करीना.

अर्थातच मूळ लोककथेंत धाराईचें पात्र नाहीं. किंबहुना इतर पात्रांची गर्दीच तेथें नाहीं; आणि तेंहि स्वाभाविक आहे. परंतु लोककथेंत नसले तरी इतिहासाचा सबळ आधार असलेलें हें पात्र आम्हीं आमच्या कथनाच्या सोयीच्या दृष्टीनें निवडलें आहे. शंभूराजे दोन वर्षांचे असतांनाच त्यांची आई सईबाई वारली. जवळजवळ जन्मल्यापासूनच संभाजी राजे धाराईच्या दुधावर वाढले. दाई व अप्रत्यक्ष आई ह्या दोन्ही नात्यांनीं धाराई, शंभुराजांना इतर कोणाहीपेक्षां अधिक जवळची वाटली असल्यास नवल वाटण्याचें कारण नाहीं. त्याच दृष्टीनें शंभुराजांविषयीं धाराईला वाटत असलेलें प्रेम, जिव्हाळा व अभिमान— त्यांच्याबद्दलची तिची निष्ठा ह्यांचें वर्णनहि आवर्जून विस्तारानें करण्याची जरूरी नाहीं.

मूळ लोककथा-तिच्या ऐतिहासिक तपशिलाच्या मखरांत बसवून–सरळ सांगण्यापेक्षां कथेंतील पात्रांच्या संवादांतून ती सांगितल्यास अधिक नाट्यपूर्ण रीतीनें मांडतां येईल असें वाटलें. खरें म्हणजे मूळ कथेंतील नाट्यानेंच हा विचार सुचविला होता; आणि तोच अधिक सोयीचाहि वाटला. तसें करण्यांत कथेंतील महत्त्वाचीं पात्रें संवादांत आपलें मनोगत अधिक मोकळेपणानें बोलून दाखवूं शकतील अशी शक्यता दिसली. अतएव ही संवादिकाची योजना.

पांच निरनिराळ्या संवादिकांतून मूळ कथा आविष्कारित करण्यांत येईल. पैकीं पहिली संवादिका आज सादर करीत आहोंत.

लोककथा सांगते, "गोदावरीनें शेवटीं अग्निप्रवेश केला. सती जातेवेळीं वृद्ध जिजामातोश्रीपासून साऱ्यांनीं तिच्या पायावर डोकें ठेवून नमस्कार केला; तिनं दिलेल्या वस्तू प्रसाद म्हणून घेतल्या."

शंभूराजांनींहि गोदावरीला तसाच नमस्कार केला, आणि प्रसाद मागितला—"देवी, ज्या धैर्यानें तूं आज मृत्यु कवटाळते आहेस, तें मरण जगण्याचं धैर्य मला दे"

इतिहास सांगतो—"संभाजीराजे मरण जगले."

एका लोककथेचें ठिगळ इतिहासाच्या शालजोडीला लावण्याचा हा प्रयत्न प्रचलित इतिहासाच्या वाचकांना कदाचित् विसंगत दिसेल. लोककथेच्या पाऊलवाटेनं इतिहासाचा मागोवा घेणेंहि अप्रस्तुत वाटेल—तरी त्यांतील चूकभूल देणें घेणें.

अनुक्रमणिका

पाचाड. जिजामातोश्रीची सदर. विसाजी रंगनाथ, मल्हारजी जगताप, पंताजी शिवदेव वगैरे सदरेवरील अधिकारी विमनस्कपणें स्तब्ध —उभे आहेत. कोणती तरी भयंकर बातमी त्यांनीं ऐकली असावी. पडदा उघडल्यानंतर मुहूर्तभर स्तब्ध वातावरण. एवढ्यांत सदरे-मागील दालनाचें दार उघडून, जिजामातोश्री तांतडीनें आंतून बाहेर येतात. त्यांच्या मागोमाग गंगाधरपंत— हिरोजी फर्जंद व धाराई येतात. गंगाधरपंत वयस्क गृहस्थ जखमी अवस्थेंत असल्यामुळें हिरोजी फर्जंदांच्या आधारानें बाहेर येतात.

**जिजाबाई :** (आंतील दालनांतून अगदीं समोर येऊन–विमनस्कपणानें) शंभुराजे— शंभुराजे ! काय केलंत हें ? काय ऐकलं मी हें !!!! (स्वतःला सावरीत) विसाजी रंगनाथ, शंभुराजांकरितां एक तातडीचं पत्र तयार ठेवा. असतील तिथून त्यांना तातडतोब आमच्या भेटीस येण्यास सांगा.

**विसाजी रंगनाथ :** आज्ञा मासाहेबांची (मुजरा करून जातो. एवढ्यांत, जखमी गंगाधरपंतांना घेऊन आंतील दालनांतून हिरोजी फर्जंद व धाराई येतात.)

**जिजाबाई :** गंगाधरपंत, तुम्ही निश्चिंत असा. तुमच्या मुलीचा शोध लावून तिला सुखरूप तुमच्या स्वाधीन करण्याची व्यवस्था तातडतोब होईल ह्याबद्दल खात्री असूं द्या. तुम्हाला विश्रांतीची जरुरी आहे, तुम्ही विश्रांति घ्या. हिरोजी फर्जंद, गंगाधरपंतांना त्यांच्या स्थानीं पोहोंचवण्याची व्यवस्था करा. मल्हारजी जगताप, गडावरून तबीब बोलावून प्रथम त्यांच्या जखमांची बरदास्त राखा. पंताजी शिवदेव, गंगाधरपंतांच्या औषधपाण्याची—शिधापाण्याची व्यवस्था चोख ठेवा. त्यांना आराम वाटेल, कोणतहि त्रास होणार नाहीं याची खबरदारी घ्या. जा, त्यांना नीट इतमामानं पोहोंचवा.

**हिरोजी फर्जंद, मल्हारजी जगताप व पंताजी शिवदेव**—जशी आज्ञा मासाहेबांची !! (मुजरा करतात)

**हिरोजी फर्जंद :** चला गंगाधरपंत.

(गंगाधरपंतांना घेऊन जाऊं लागतात.)

**गंगाधरपंत :** आईसाहेब, जातों मी ! परंतु इथून कुठं आणि आणि कसं जायचं हेंच मला कळत नाहीं. सभोंवतालीं तर गडद अंधःकार पसरला आहे. व्याही–जावई तिकडे वाट पहात असतील त्यांना हे काळं तोंड आतां कसं दाखवूं ? घरीं परत गेलों तर सौभाग्यवती आणि घरची मंडळी कोणत्या शब्दांनीं माझी संभावना करतील ? त्यांना काय सांगूं ? कसं समजावूं ?—कांहीं कांहीं कळत नाहीं. माझी मुलगी गोदा. बापडी गोदावरी, कुठं असेल ती आतां ?– काय तिची अवस्था झाली असेल ! कोणत्या पाशवी अत्याचारांनीं तिचा बळी घेतला असेल !!'—नाहीं नाहीं, त्या भयानक कल्पनांचे महाभुजंग मनाला डंख मारतात–शहाऱ्यांचे काटे सारं अंग ओरखडून काढतात, (म्हातारा दुःखावेगानं अस्वस्थ होतो; खालीं बसतो.)

**हिरोजी फर्जंद :** (गंगाधरपंतांना सांवरीत) शांत व्हा गंगाधरपंत, शांत व्हा. मातोश्रींच्या आशीर्वादानं सर्व कहीं ठीक होईल ह्याबद्दल काळजी करूं नका.

**गंगाधरपंत :** (सावध होऊन—स्वतःला सांवरून) आईसाहेब, तुम्ही गाईब्राह्मणांचें छत्र आहांत. न्यायी आहांत. शिवाजीराजे स्त्रियांचे रक्षणकर्ते आहेत. त्यांचे पाठीराखे आहेत—म्हणूनच दादफिर्याद मागण्यासाठीं अशा जखमी अवस्थेंतहि रांगत खुरडत तुमच्याकडे आलों—आणि माझ्या दुर्दैवी मुलीची कथा तुम्हांला सांगितली. मासाहेब, मला न्याय द्या, राजांना मला न्याय द्यायला सांगा. शत्रूच्या स्त्रियांनासुद्धां राजे अभय देतात. कल्याणच्या सुभेदाराची तरुण सुंदर सून हातीं पडली तर राजांनीं वस्त्रें अलंकार देऊन—खासा स्वारांच्या पहाऱ्यांतून तिला स्वगृहीं रवाना केली. गोळेवाडीच्या धामधुमींत गोळ्यांची सून हस्तगत झाली, तिला चोळी लुगडं नेसवून, तिची ओटी मोहोरांनीं भरून राजांनीं तिला आपल्या घरीं पाठवली; प्रधानगडच्या झुंझींत किल्लेदार केसरीसिंगाची वृद्ध आई सांपडली; तिच्या पायावर डोई ठेवून राजांनीं तिला पालखींतून मोठ्या इतमामानं घरीं पोहोचती केली.—शत्रूच्या स्त्रियांपेक्षांहि माझी मुलगी अभागी आहे का ? आईसाहेब, माझ्या दुर्दैवी मुलीचा शोध लावून मला न्याय द्या, ह्या म्हाताऱ्या बापाला न्यायाची भीक घाला—एवढीच आपल्या पायांजवळ माझी शेवटची अर्जी आहे—जातों मी—मुजरा मासाहेब—जातों मी...

(गंगाधरपंतांसमवेत हिरोजी वगैरे मंडळी जातात.)

**जिजाबाई :** धाराई–मोरोपंत पिंगळ्यांना निरोप पाठवा कशासहि विलंब न लावतां आमच्या भेटीला या असं त्यांना कळवा.

**धाराई :** आज्ञा मासाहेबांची–(जाते)

**जिजाबाई :** (अस्वस्थपणें विचार करीत) मन कसं दगडागत बधिर झालं आहे म्हाताऱ्यानें सांगितलेली हकीगत ऐकून














ऐकली कसली?—उकळत्या शिशाच्या रसाप्रमाणं कानाच्या पाळ्यांतून ओतली गेली. किती भयंकर घटना!! मुहूर्तभर तिच्यावर आमचा विश्वासच बसला नाहीं. कितीहि बेगुमान झालं तरी भोसल्यांचं बीज एवढं नादान कसं निपेल? वाटलं, तें सारं खोटं आहे, शुद्ध कागाळी आहे, कुभांड आहे. परंतु, तो म्हातारा तरी उगाचच खोटं कशाला बोलेल? पोटच्या पोरीच्या अब्रूचे धिंडवडे स्वतःच कसे काढील? स्वतःच्या मुलीच्या संसारावर निखारे कसे ठेवील?—उगाच कोणाबद्दल कागाळी करण्यांत त्याचा तरी काय मतलब? कागाळी आणि तीहि शंभुराजांविरुद्ध? आमच्या नातवाविरुद्ध? शिवाजी राजांच्या मुलाविरुद्ध?—छे छे. ती बातमी सत्य असली पाहिजे. म्हाताऱ्याच्या अंगावरील जखमाच या बातमीच्या खरेपणाची साक्ष देत आहेत.
(विसाजी रंगनाथ प्रवेश करतो)

**विसाजी रंगनाथ :** शंभुराजांना पाठवावयाचें पत्र तयार आहे मासाहेब!

**जिजाबाई :** वाचा.

**विसाजी रंगनाथ :** (वाचतो) चिरंजीव राजश्री संभाजीराजे यांसी, प्रति मातोश्री जिजाऊ मासाहेब; आशिर्वाद उपरी, एका महत्त्वाच्या मामल्याकारणें आपली रुबरू भेट घेणें अगत्य आहे, तरी हें पत्र पावतांच मातोश्रीचे दर्शनास असाल तेथून-घडीचाहि विलंब न लावतां-सिताब स्वार होऊन येणें. ही आज्ञा जाणिजे, मोर्तबसुद.

**जिजाबाई :** ठीक!

(विसाजी रंगनाथ पत्रावर जिजाबाईंचा शिक्कामोरतब करतात व पत्र खलोत्यांत बंद करून मातोश्रीजवळ देतात, व मुजरा करून जातात.)

**जिजाबाई :** म्हाताऱ्यानं धाय मोकलून सांगितलं, मला न्यायाची भीक घाला. खरोखरच ती बातमी सत्य असेल तर म्हातारा मागतो ती न्यायाची भीक किती भयंकर आहे! "त्या ब्राह्मणाची लग्न झालेली मुलगी शंभुराजांनीं........" छे छे! त्या कल्पनेचा पुनरुच्चार सुद्धां करवत नाही. तापलेल्या सांडसानं लावावं त्याप्रमाणं दर शब्दागणिक अंगावर डाग ण्यांचे दाहक वळ उठताहेत. शब्दांचे जहरी जळते बाण शरिराला चौगीर्द विद्ध करून—सारं शरीर अंगार विखारानं आंतून बाहेरून होरपळून काढीत आहेत. स्मरणाच्या गाभाऱ्यांत त्या दुष्टशब्दांचे साद पडसाद एकच कर्कश कोलाहल माजवीत आहेत. (कानावर हात ठेवून) आई भवानी, काय ऐकलं मी हं? ऐकूं येत नाहीं त्या वयांत ऐकूं नये ते नेमकं ऐकलं! हें ऐकण्याकरितां का या जिजाऊला तूं एवढं आयुष्य दिलंस? हें ऐकण्याकरितां का आजीच्या उतार वयापर्यंत जिजाऊ जगली? या कानांनीं आजपर्यंत उदंड ऐकलं!!!—परंतु एवढ्या भयंकर अर्थाचे शब्द उभ्या आयुष्यांत कधीं ऐकले नव्हते! रणभेरींची मंद्रगंभीर गर्जना ऐकली...कर्णे-तुताऱ्यांची गगनभेदी बांग ऐकली. समशेरींचे खणखणाट व भांड्यांचे भडिमार हवे तेवढे ऐकले—श्रवणाच्या अंबरखान्यांत जिजाऊनं नेहमीं युद्धाचेच नगारे झडतांना ऐकले आहेत. कर्दन कराल तोफांचे कडे-कडाड उद्रेक अष्टौप्रहर ऐकूनहि शांतचित्त रहाणारी जिजाऊ आज चारदोन शब्द ऐकून अस्वस्थ झाली. विश्वासघातानं पतीला विजापुरीं अटक झाली त्यावेळीं, आग्र्याच्या मोंगल बादशहाच्या गुहेंत पुत्रानं जाणूनबुजून उडी घेतली त्याहि वेळी—निर्धारानं दगड बनलेल्या मनाला तडे पाडणाऱ्या शेंकडो भल्याबुऱ्या बातम्या ऐकूनहि अस्वस्थ न होणारी जिजाऊ, आज त्या म्हाताऱ्याच्या तोंडच्या चारदोन शब्दांनीं बेचैन झाली—वांकली—म्हातारी झाली. आईनं नेहमीं म्हणावं, माझी नवसाची जिजाऊ मोठी भाग्याची निघणार. माझ्या आईचा—त्या जगदंबेचा—प्रत्यक्ष वरदायिनीचा—आशीर्वाद माझ्या बाबतींत पूर्ण फळाला आला. शब्दाशब्दावर हुकुम जिजाऊ भाग्यशाली ठरली. देवगिरीच्या प्राचीन यादव राजघराण्याचं माहेर; मानी लखुजी जाधवरावांची एकुलती एक लाडकी मुलगी—चार भावांची आवडती एकटी बहीण; मनसबदार मालोजी भोसल्यांची सून, सरलष्कर शहाजी राजांची पत्नी आणि पराक्रमी चिरंजीव शिवाजी राजांची माता! जिजाऊ—जिजाऊ, सौभाग्याच्या केवढ्या दिव्य वाणांनीं तुझी ओटी भरली गेली! स्त्रीजन्माची केवढी भाग्यशाली कहाणी आजपर्यंत तूं मोठ्या दिमाखानं जगलीस!! आज मात्र तूं वांकलीस. वयानं नव्हे तर

# ज्योत तेवत ठेवा



आपणामध्ये तेवत असलेली ज्योत,
हिमालयावरील अभ्रे दूर
करील व तीमुळे अंधःकार कायमचा नाहीसा होईल.
या दिवाळींत आपल्या कर्तव्याशी अविचल राहून
आपण या ज्योतीशी अेकनिष्ठ राहूं या
अधिक काम करू या, खर्च कमी करू या.
आणि आपल्या जवळील सर्वोत्कृष्ट असें
सर्व मातृभूमीस अर्पण करू या.

प्रसिद्धी संचालक, महाराष्ट्र शासन, मुंबई







शरमेनं ! अब्दागिरी मशालींच्या सावली प्रकाशांतून उजळ माथ्यानं मिरवणारी जिजाऊ, आज, नातवाच्या नादानपणामुळं नामुष्कीच्या अंधारांत पायउतार होणार अशी चिन्हं स्पष्ट दिसत आहेत.

**धाराई :** (प्रवेशून) सरकारकून मोरोपंत पिंगळे आले आहेत मासाहेब.

**मोरोपंत पिंगळे :** (प्रवेशून) मुजरा मातोश्रींना !!

**जिजाबाई :** मोरोपंत, शिवाजी राजांची काय बातमी आहे ? राजे गडावर केव्हां परत येणार आहेत ?

**मोरोपंत :** गेला महिनाभर महाराज प्रतापगडावरच आहेत. तेथील कामाचा गुंता अजून नीट उकललेला दिसत नाहीं. कालच जासुदाबरोबर आठ दिवसांचे कपडे राजांनीं प्रतापगडावरच् मागवले आहेत. त्यावरून आणखी आठवडाभर तरी महाराजांचं इकडे येणं होणार नाहीं असा अंदाज आहे, मासाहेब ! परंतु त्याचाहि नेम नाहीं. प्याद्यापासून सरकारकुनापर्यंत महाराजांची नजर साऱ्या राज्याचा शोध घेत फिरत असते. साऱ्या राज्याची खडान् खडा खबर त्यांना बसल्या जागीं मिळते. हातचं काम अपेक्षेपेक्षां लवकर आटोपलं—अथवा अधिक तातडीचं दुसरं एखादं काम इथं निघालं तर राजे आजसुद्धां गडावर परत फिरतील. दिरंग अथवा आजचें उद्यावर घालणं हा राजांचा स्वभाव नाहीं. कोणत्याहि ठिकाणचं महाराजांचं वास्तव्य जितकं अनिश्चित, तितक्याच त्यांच्या हालचाली वाऱ्याच्या वेगानं होतात. जेवण प्रतापगडावर झालं, तर राजे आंचवायला रायगडावर येतात याची जाणीव मासाहेबांना आहेच ! काय आज्ञा आहे मासाहेबांची ?

**जिजाबाई :** मोरोपंत, गडावर खास जासूद पाठवून शंभुराजांना आमचा हा लखोटा तावडतोब पोहोचेल अशी व्यवस्था करा. कसलाहि विलंब होऊं देऊं नका. (मोरोपंतांना लखोटा देतात).

**मोरोपंत :** जशी आज्ञा मासाहेबांची ! लखोटा देऊन गडावर जासूद मी तातडीनेंच रवाना करतों—परंतु शंभुराजांचं गडावरचं वास्तव्य गेले कांहीं दिवस अनिश्चित झालं आहे. बहुधा, शिकारीच्या नादानं, शंभुराजे गडावर नसतातच. महाराजांच्या गैरहजेरींत कारभारी ह्या नात्यानं, शंभुराजांनीं गडावरील चौकीपहाऱ्यांचा बंदोबस्तहि विशेष कडक केला आहे. खासा स्वारीशिवाय इतरांनां गडावर जाणें कठीण झालं आहे. तरीसुद्धां शोध घेऊन आपला लखोटा शंभुराजाना तातडीनें मिळेल याची व्यवस्था करतों.

**जिजाबाई :** शंभुराजे गडावर असोत, अथवा कुठल्याहि रानांत पारध खेळत असोत; आमचा लखोटा पोहोंचवून त्यांना तावडतोब आमच्या भेटीस येण्यास सांगा. काम महत्त्वाचं तसंच तातडीचं आहे. कोणाकडूनहि कोणत्याहि सबबीवर थोडाहि दिरंग होतां कामा नये.

**मोरोपंत :** आज्ञा मातोश्रींची (जातात)

**जिजाबाई :** (मोरोपंतांचे शब्द आठवीत—स्वतःशींच विचार करीत)— शंभुराजांचं गडावरील वास्तव्य गेले कांहीं दिवस अनिश्चित झालं आहे— शिकारीच्या नादानं शंभुराजे गडावर नसतातच-अधिक तांतडीचं दुसरं काम इथं निघालं तर राजे आज सुद्धां गडावर परत फिरतील !!

**धाराई :** ही मात्रा उगाळून आणली आहे ती घ्यावी मासाहेबांनीं. आपण आतां निरोप पाठविला आहेच, शंभुराजे येऊन सारी हकीकत स्वतः सांगेपर्यंत मासाहेबांनीं उगाच कल्पना करून मनाला त्रास करून घेऊं नये. शंभुराजांविरुद्ध तक्रारी आणण्याचं लोकांना आजकाल खूळच लागलेलं दिसतं ! कोणीतरी पराचा कावळा करायचा आणि आपल्याला नसता त्रास द्यायचा. आपण कांहींहि मनांत आणूं नये—घटका दीडघटका विश्रांति घ्यावी. तोंवर केशवभट मुक्तेश्वरी महाभारताची पोथी घेऊन येतील. आपल्याला मुक्तेश्वरांची रचना विशेष आवडते असं केशवभट नेहमीं सांगतात. महाभारतांत मन रमलं तर तेवढंच आपल्याला बरं वाटेल; आणि नसत्या काळजीनं त्रास होणार नाहीं. मातोश्रींना कोणताहि त्रास होणार नाहीं याची काळजी घ्या असं वैद्यराजांनीं कालच बजावून सांगितलं आहे. म्हणून म्हणतें ही मात्रा घ्यावी, मासाहेबांनीं आणि स्वस्थ पडून असावं !

**जिजाबाई :** धाराई, आज कोणतंहि महाभारत मनाला रिझवूं शकणार नाहीं— कोणतीहि मात्रा लागू पडणार नाहीं आणि स्वस्थहि बसवणार नाहीं. मी स्वस्थ कशी बसूं ? रायगडच्या पंचक्रोशींत एका ब्राह्मणाची तरुण विवाहित मुलगी पळवली जाते ही बातमी ऐकून मी स्वस्थ बसूं ? ती मुलगी प्रत्यक्ष शंभुराजांनीं पळवली असा स्पष्ट आरोप ऐकून मी स्वस्थ बसूं ? हा गुन्हा करणारांना महाराजांच्या लेखीं किती कडक शासन आहे हें माहीत असून मी स्वस्थ बसूं ?—आजपर्यंत स्वस्थ बसलें म्हणूनच गोष्टी ह्या थराला गेल्या. शंभुराजे म्हणजे आमची जबाबदारी. चवदा वर्षांचे, कर्ते-जबाबदार झाले म्हणून, आम्हीं निसबत देऊन, गेल्या वर्षी राजांकडून त्यांना रायगडची मुखत्यारी देवविली. शंभुराजांच्या ह्या वागणुकीनं राजांच्या हिशेबीं आमची आज काय किमत राहिली ?

**धाराई :** महाराज प्रतापगडावर आहेत,

लेखकांच्या नाना 'कळा' :

विनोदी लेखक



उदर जयाचे कण्हते हांसुनि
विनोद वाचुनि शिळे अभाविक
रंगवेश त्या नवे देऊनी
माल खपवितो उदरविदारक
नको बुवा हा छंद फुग्याचा
हासहासुनी फुटेल साचा
स्तुति आपुली तोंडा वासुन
पोटस्फोटक न करि नर्तन.

अनुक्रमणिका

आणि अजून आठ दिवस ते इकडे येणार नाहींत असं मोरोपंतांनीं आत्तांच सांगितलं! महाराजांच्या कानावर ही गोष्ट जाण्यापूर्वींच आपण तिचा निवाडा आपल्या अखत्यारांत करून घ्यावा, मासाहेब!

**जिजाबाई :** महाराजांच्या कानावर ही गोष्ट अजून गेली नाहीं हा तुझा गैरसमज आहे, धाराई! "अधिक तांतडीचं दुसरं काम इथं निघालं तर राजे आजसुद्धां परत फिरतील" —असं मोरोपंत म्हणाले, पण त्याचा अर्थ तुला भाबडीला कळला नाहीं. राजांचं हेर-खातं फार मोठं आहे—आणि मोरोपंतांसारखे मातबर अधिकारीहि त्या खात्याच्या चाकरींत आहेत हें तुला ठाऊक नसलं तरी मला निश्चित माहीत आहे.—म्हाताऱ्यानं सांगितलेली घटना सत्य आहे यांत आतां संदेह उरला नाहीं. राजे आज कोणत्याहि क्षणीं रायगडावर परत फिरतील याबद्दलहि मला शंका नाहीं. आम्हीं कोणत्या तोंडानें राजांची भेट घ्यावी हेंच आतां आम्हांला कळत नाहीं.

**धाराई :** महाराजांची मातृनिष्ठा जगजाहीर आहे, मासाहेब! जिजाई हें महाराजांचें दैवत आहे. मातोश्रींच्या चरणाविरहित ते अन्य कांहीं मानीत नाहींत; हें राज्य, ही कीर्ति—हें वैभव हें सारं मातोश्रींच्या चरणांचा प्रसाद, असंच ते नेहमीं मानतात. महाराज आपले केवळ पुत्र नव्हेत तर भक्त आहेत. भक्तासमोर जाण्यास आपल्याला कसला संकोच?

**जिजाबाई :** खरं आहे. राजे निष्ठावान भक्त आहेत; म्हणूनच आज त्यांना तोंड दाखविण्याची आम्हाला लाज वाटते. धाराई, कांहीं भक्तांच्या निष्ठा एवढ्या जाज्वल्य असतात कीं, कधींकधीं प्रत्यक्ष परमेश्वरालाहि त्यांच्यापुढे जाण्यांत संकोच वाटतो. आमच्या चिरंजिवांच्या निष्ठा अशाच जहाल आहेत. परस्त्री, मग ती कोणत्याही धर्माची, जातीची, अथवा वयाची असो, ती माते-समानच पवित्र असते अशी राजांची निष्ठा आहे. आमच्या मराठी राज्याची ती धारणा आहे मराठी मनाची ती उपासना आहे. मराठी मनाला मातेपेक्षां कोणतीच गोष्ट अधिक पवित्र वाटत नाहीं पावित्र्याचा जिथं जिथं साक्षात्कार होतो—तिथं तिथं मराठी मन मातेच्या श्रद्धेनं वांकतं! जें जें थोर व उदात्त असेल तें तें आम्हीं आईच्या पावित्र्यानं मोजलं आहे, आईच्या मंगल रूपांत साकार केलं आहे; माउली म्हणून आईच्याच पवित्र नांवानं संबोधलं आहे. आमचे देव, आमचे गुरु, आमचे ग्रंथ हे सारे आम्हांला माउलीरूप आहेत. चिरंजीव शिवाजीराजे, मातेचं दैवत पूजणाऱ्या मराठी मनाचे राजे आहेत.

**धाराई :** राजांच्या राज्यांत प्रत्येक आई-बहीण आज निर्भय झाली आहे मासाहेब.

**जिजाबाई :** यवनी सत्तेच्या पाशवी दहशतीनं गोषाच्या गडद अंधारांत कोंडली गेलेली आमची सारी स्त्री जात, राजांच्या मराठी निष्ठेनं आणि मराठी पराक्रमानं आज निर्भय झाली आहे—हें अगदीं खरं आहे. शत्रूच्या स्त्रिया सुद्धां आमच्या राज्यांत अधिक निर्भय आहेत—धामधुमींत सुद्धां स्त्रियांच्या अब्रूला आम्हीं जपतो—शत्रूचीं बायकामुलं धरूं नयेत, त्यांना कसलाहि उपद्रव देऊं नये अशी आमच्या सैनिकांना राजांची सक्त ताकीद आहे. हा नियम मोडणाऱ्या गुन्हेगारांची राजे गर्दन मारतात. ब्राह्मण म्हणून, हुद्देदार म्हणून अथवा भाऊबंद म्हणून कोणाचाहि मुलाहिजा करीत नाहींत! हे सारं माहीत असून मी स्तब्ध कशी बसूं? शंभुराजांच्या बेगुमान गैरवागणुकीनें राजांच्या समोर केवढा बांका पेंच पडणार आहे याची कल्पनाच मनाला स्वस्थ बसूं देत नाहीं.

**धाराई :** महाराज आपला शब्द मानणार नाहींत—असं कसं होईल मासाहेब? तुमची आज्ञा पाळून तुमचं चित्त नेहमीं प्रसन्न ठेवाव यापरतं स्वामी दुसरं कर्तव्य जाणत नाहींत.

**जिजाबाई :** चिरंजीव आमची आज्ञा निष्ठेनं मानतात हें आमचं महान भाग्य आहे; म्हणून चिरंजीवांना वाटेल ती आज्ञा आम्हीं करावी हें आम्हांला कदापीहि मान्य होणार नाहीं. दादोजी कोंडदेवांच्या तालमींत, आमच्या नर्यादेनं, चिरंजीव वाढले; मोठे झाले, राजे झाले. शिस्तीचे—न्यायाचे धडे आम्हींच त्यांच्याकडून गिरवून घेतले. राजांच्या करड्या शिस्तीची व न्यायनीतीची आम्हींच वेळोवेळीं तारीफ केली आहे, त्यांना शाबासकी दिली आहे. आज शंभुराजांच्या बेशिस्त वर्तनाचा मुलाहिजा करा अशी तरफदारी आम्हीं त्यांच्याकडे कोणत्या उजागिरीनें करावी?—आणि राजांनीं सुद्धां आमच्या रदबदलीची भीड काय म्हणून ठेवावी?

**धाराई :** राजे आपले चिरंजीव तसे शंभुराजे आपले नातूच आहेत मासाहेब! आपल्या शिस्तीचं वळण त्यांना लगावं—म्हणूनच ना राजांनीं शंभुराजांना आपल्या खास निग्राणीमध्यें ठेवलं होतं?

**जिजाबाई :** माझा मुलगा आणि माझाच नातू!! धाराई, मला मुलगा वाढवितां आला परंतु नातवाला वळण लावतां आलं नाहीं. शंभुराजांच्या संगोपनाची सर्व जबाबदारी राजांनीं आमच्यावर सोपविली, लोक आज म्हणतात आजीच्या लाडानं नातू वाया गेला. स्वतःचा मुलगा संभाळणं सोपं असतं धाराई! आई कितीहि निष्ठुर झाली तरी तिच्या मायेबद्दल कोणी शंका घेत नाहीं. परंतु नातू म्हणजे जाणून बुजून दुसऱ्याचं पोर! शिस्तीचा त्याला धाक घालतां येत नाहीं, प्रेमानं लाड केले तर तो शेफारण्याचा संभव अधिक!!

**धाराई :** नातवाचं कौतुक आजीनं करायचं नाहीं तर कोणी करायचं मासाहेब? आपण जर शंभुराजांचे लाड केले नसते तर त्या पोरक्या पोरानं उभ्या दौलतींत कोणाच्या तोंडाकडे पाहिलं असतं?

(पान ३५ वरून)

**जिजाई :** पोरकं पोर! पोर दुर्दैवी हेंच खरें! शंभुराजे कोणत्या नक्षत्रावर जन्माला आले कळत नाहीं. दुर्दैव जणुं त्यांच्या सटवीला पूजल्यासारखं दिसतं! दोन वर्षांचे असतांनाच आई वारली. आईच्या—हक्काच्या—दुधाचे दोन थेंबसुद्धां ह्या पोराच्या तोंडांत पडले नाहींत. आजारपणामुळं सईबाईच्या अंगावर दूध नव्हतं याकरितां धाराई, शंभुराजांची ओली दाई म्हणून तुझी नेमणूक केली --आणि पोराची उपासमार वांचवली. मातेचं प्रेम नाहीं, पान्हा नाहीं. आईची कोणतीच माया शंभुराजांच्या अंगीं लागली नाहीं. त्यांतच राजपुत्र एकुलते एक—सात नवसांचे—तीन बहिणींच्या पाठीवर आलेले. नाकींडोळीं नक्षत्रासारखे देखणे, परंतु पोरके; थोरल्या आईच्या व दाईच्या उसन्या प्रेमापान्ह्यावर वाढलेले. वेलीवेगळ्या ह्या पोरक्या फुलाला कोण दुखवणार? जाईच्या फुलागत साऱ्यांनींच त्यांना वरच्यावर अलगद झेलून धरलं. बालमनानं वाटेल ते हट्ट करावेत, वडिलधाऱ्यांनीं ते सारे कौतुकानं पुरवावेत. बालवयांत हट्टाचं कौतुक झालं कीं मोठेपणी मुलं हक्कानं हट्टी होतात, बेगुमान होतात, बेलगाम होतात, शंभुराजांसारखीं. धाराई, मराठ्यांचा राजा मी घडविला हा माझा अभिमान आहे परंतु राजपुत्र मला संभाळतां आला नाहीं हें माझं शल्य आहे. शंभुराजांचं आजचं गैरवर्तन हें माझं लांछन आहे.

**धाराई :** मासाहेब, तुम्ही वडील आहांत, थोर आहांत, जाणत्या आहांत!! मी अडाणी—आपल्यासमोर काय बोलणार? माझी भाबडीची तुम्हाला एवढीच विनंती आहे कीं शंभुराजांना यावेळीं तुम्ही पाठीशीं घाला! त्यांच्या हातून कांहीं वेडंवांकडं घडलं असेल—तरुण वयानं एखादी आगळीकहि केली असेल, तर अजाण पोर समजून त्यांना क्षमा करा—राजांना क्षमा करायला सांगा! शंभुराजे हट्टी आहेत, हूड आहेत, गरम उसळत्या जवान रक्ताचे आहेत—परंतु मनानं तेवढेच निर्मळ व दिलदार आहेत. जेवढे लहरी व जिद्दी आहेत तेवढेच भोळेभाबडे आहेत. एकदां विश्वास टाकला कीं तुम्ही गळा कापला तरी तुमच्याबद्दल शंका घेणार नाहींत कीं तुम्हांला अंतर देणार नाहींत. उगाच कोणावर जुलूमजबरदस्ती करणं हा शंभुराजांचा स्वभाव नाहीं मासाहेब! थोरली आई म्हणून शंभुराजांना तुम्ही धाकटेपणापासून ओळखतां, तुमच्या आशीर्वादानंच ते लहानाचे मोठे झाले. आज रायगडाचे मुखत्यार झाले. त्यांची दाई म्हणून मीहि, माझ्या अडाणी परीनं, राजांना त्यांच्या तान्हेपणापासून पाहिलं आहे. पूर्वजन्मींचं माझं पुण्य थोर, म्हणून, मला, राजांच्या दाईपणाचा मान तुमच्या कृपेनं मिळाला. दीड वितेचा मांसाचा गोळा सईबाईसाहेबांनीं विश्वासानं माझ्या स्वाधीन केला आणि त्या निघून गेल्या. माझ्या दुधानं त्या गोळ्याला आज राजपुत्राच्या नांवारूपाला आणलं-याचा मला अभिमान आहे. तें माझं थोर भाग्य आहे. राजांच्या सेवेसाठींच देवानं मी त्यांची दाई असलें तरी मनानं मी त्यांची आई आहें, मासाहेब!! दाईचं मन हें आईचंच मन असतं! सुताडच्या जाड्याभरड्या पदराखालीं आर्जव कर करून बाळराजांना मी दुधाचे घास, आईच्या पान्ह्यानं भरवले आहेत. दोन हातांच्या ह्या झोपाळ्यांत माझ्या रांगडी गीतांची संजी ऐकत राजे सुखानं माझ्या, त्यांच्या आईच्याच कुशींत विसावले आहेत. पोटच्या पोराला बाजूला सारून, मराठ्यांच्या ह्या बाळराजाला मीं पाजलं आहे मासाहेब! अजूनहि शंभुराजांचे ओठ दाबले तर माझ्या दुधाच्या थेंबांचे दाणे टचटचून बाहेर येऊन ओघळतील, एवढ्या इमानानं मीं माझी चाकरी बजावली आहे. जिजाऊ मासाहेब! माझ्या दुधाच्या अन्नपूर्णेनं वाढविलेला हा राजपुत्र पदरांत घ्या—आपल्या पाठीशीं घाला, त्याला अभय द्या. मी धाराई, त्यांची दाई—त्यांची मानलेली आई—तुम्हाला आर्जवून सांगतें—नव्हे नव्हे—शंभुराजांची प्रत्यक्ष आई—सईबाई साहेब माझ्या तोंडून तुम्हांला विनवताहेत—पदर पसरताहेत—त्यांना एवढी मायेची भीक घाला.

**जिजाबाई :** भोसल्यांच्या कुळानंच नव्हे तर उभ्या मराठी दौलतीनं तुझ्या इमानी चाकरीचं ऋण मान्य केलं आहे धाराई. आज तुझ्या इमानी दुधापेक्षांहि माझ्या रक्ताचं इमान अधिक दुखावलं गेलं आहे हें विसरू नकोस! **शंभुराजांकरितां माझंहि मन—आज रक्ताची आसवं ढाळून रडत आहे.** एरवीं शंभुराजांच्या रक्षणासाटीं दौलतींतल्या साऱ्या गडांचा कोट मी त्यांच्या भोंवतीं उभा केला असता. परंतु न्यायाच्या बाबतींत राजे कुणाचाहि मुलाहिजा ठेवणार नाहींत याची मला खात्री आहे. राजांची न्यायदेवता तुझं दूध जसं पारखणार नाहीं—तसं माझं रक्तहि ओळखणार नाहीं. राजे नातीं जाणत नाहींत. राजांच्या लेखीं जो न्याय इतरांना तोच शंभुराजांना! शंभुराजांनीं गुन्हा केला असेल तर शंभुराजांना शिक्षा झालीच पाहिजे.

**धाराई :** शंभुराजांना शिक्षा होणार! धांवा धांवा! तुळजापुरची तुळजाई—सातारची मंगळाई—प्रतापगडची भवानी आई—धांवा. या तुमच्या नवसाच्या लेकराला वांचवा. शंभुराजांना शिक्षा! आई अंबाबाई, शंभुराजांना शिक्षा झाली तर माझ्या अजागळ जिण्याला काय अर्थ आहे!— मासाहेब, शंभुराजांना जर तुम्ही शिक्षा करणार असाल तर ती मला करा. शंभुराजांची दाई म्हणून तुम्ही करून दिलं वर्षासन मी आजपर्यंत सुखानं खाल्लं आहे. शंभुराजांच्या अन्नावरच पोसला गेलेला हा देह त्यांच्या कारणींच लागला तर माझ्या चाकरीचं सार्थक होईल. मला शिक्षा द्या. त्यांना मिळेल त्यापेक्षां दसपट शिक्षा भोगण्यास मी आनंदानं तयार आहें. माझे हातपाय कापा—जीभ छाटा—तापलेल्या सळ्या फिरवून माझे डोळे काढा, सांडसीनं माझ्या शरिराचे लचके लचके तोडा. माझं शिर धडावेगळं करून भाल्यांच्या टोंकावरून गल्लोगल्लीं फिरवा; मी रेसभरहि कचरणार नाहीं कीं दुःखाचा अस्पष्ट हुंकारसुद्धां माझ्या तोंडून निघणार नाहीं. माझ्या चाकरीचं इमान रायगडाच्या कातळाप्रमाणं पोलादी आहे मासाहेब! तें कसल्याहि मरणाला भिणार नाहीं. राजांच्या अन्नावर जगून आजपर्यंत मी त्यांची चाकरी केली—यापुढची त्यांची सेवा जर माझ्या मरणानं होणार असेल तर, ही धाराई, तें मानाचं मरणहि मोठ्या आनंदानं पत्करील, याचा भरंवसा ठेवा. मासाहेब, मी तुमच्यापुढं पदर पसरतें, तुमच्या विनवण्या करतें, शंभुराजांना होणारी शिक्षा मला द्या. ही भीक मला घाला. ती शिक्षा मला भोगूं द्या. हा पहा, हा देह तुमच्या पायापाशीं आणून ठेवला आहे—त्याला तरवारीनं तोडा—अग्नीनं जाळा—पाण्यांत बुडवा – काय वाटेल ती त्याची वासलात लावा!!!

*कुठलीहि बाई आपल्या नवऱ्याला करणार नाहीं अशी सूचना तिने केली.*
*मोकळ्या मनानें मी तिच्या सूचनेचा स्वीकार करावा असें तिनें सांगितलें.*
*मला तरी आणखी काय हवें होतें. मी मोकळा होतों. अगदीं मोकळा .... हलका ....*

गेले कित्येक दिवस मी एकाच गोष्टीचा विचार करतों आहें. माझ्यापुरता मी निर्णय घेतला आहे. काय सांगायचें तें सगळें ठरलें आहे. अनेक वेळां मी त्याची स्वतःशीं उजळणी केली आहे. पण तें केव्हां सांगावें आणि कोणत्या शब्दांत सांगावें तें मात्र अजूनहि उलगडत नाहीं. माझें बोलणें ऐकून तिची काय प्रतिक्रिया होईल तें सांगणें मोठें कठीण आहे. कडाडत येणारी वीज वृक्षावर कोसळते तेव्हां वृक्षाला काय वाटतें हें कुठें कुणाला ठाऊक आहे! माझें बोलणें ऐकून ती एखाद् वेळेला प्रतिकाराचें आव्हान देईल किंवा मी सगळें समंजसपणें मिटवून टाकावें म्हणून आवाहनहि करील. कदाचित् त्रागा करील... लोकापवादाचा बाऊ दाखवील...कदाचित् रडेलहि. तिची काय प्रतिक्रिया होईल तें कुणी सांगावें! पण माझा निर्णय मी घेतला आहे. आतां लौकरांत लौकर तो तिच्या कानावर घालणें आवश्यक आहे. तिच्या हितचिंतकाचा आव आणीत पण माझ्याशीं असलेलें छुपें वैर उगवून घ्यायच्या इराद्यानें एखादा तिच्यापर्यंत जाऊन पोंचण्यापूर्वींच मी हें सारें संपवणें जरूर आहे. संभाव्य परिणामाच्या भीतीनें आतां चालढकल करण्यांत अर्थ नाहीं. झाला एवढा कालापव्यय पुष्कळ झाला. आतां थांबण्यांत हशील नाहीं. आतां सोक्षमोक्ष लावलाच पाहिजे...

तिची चाहूल लागली तेव्हां मी हांक मारली, "सुशील—"

"मला बोलावलंत?"

"हो. बैस इथं. तुझ्याशीं मला कांहीं बोलायचं आहे. बोलूं?"

"माझ्याशीं बोलायला परवानगी केव्हांपासून लागूं लागली?"

"नेहमींपेक्षां निराळं बोलायचं आहे." तिची नजर टाळून म्हटलें, "तुझ्यामाझ्यासंबंधी बोलायचं आहे. आपल्या वैवाहिक जीवनाविषयीं—बंधनासंबंधीं."

"लग्नानंतर दहा वर्षांनीं?"

"खरं आहे. पण नाइलाजानं—"

"ठीक आहे. सांगा."

"तूं सारं शांतपणं ऐकून घ्यावंस अशी माझी इच्छा आहे. नव्हे—तशी विनंति आहे. माझं बोलणं तुला कटु वाटेल. आवडणार नाहीं."

"मग बोलूं नका."

"नाहीं. कधींतरी हें बोललं पाहिजेच."

"एवढे निकरावर आलां असाल तर बोलणं हें चांगलं."

"म्हणून म्हणतों—" योग्य शब्दांसाठीं धडपडत ती सांगूं लागलों, "आपण दोघंहि सुसंस्कृत आहों, सुशिक्षित आहों, समंजस आहों..."



—अ च्यु त ब र्वे

मला मध्येंच थांबवीत ती म्हणाली, "समंजसपणा कधीं कधीं लोप पावतो एवढंच."

"पण माझं बोलणं ऐकून तसं होऊं नये अशी माझी अपेक्षा आहे."

"तें तुमच्या बोलण्यावर अवलंबून आहे." माझ्याकडे रोखून पहात ती म्हणाली, "सांगायचं आहे तें लौकर सांगून मोकळे व्हा."

"तेंच करतों आहें." आणि निर्धारपूर्वक म्हटलं, "आपल्या संसारांतले प्रीतीचे रंग आतां विटले आहेत. ह्यापुढें आपण वेगळे व्हावं हें चांगलं" माझी कल्पना होती कीं हा घाव तिला सहन होणार नाहीं. ती कोसळून खालीं पडेल. पण तसें कांहीं झालें नाहीं. ती होती तशीच बसून राहिली. जणुं कांहीं मी काय बोलणार होतों हें तिला अंतर्ज्ञानानें आधींच समजलें होतें. आणि हा घाव झेलायची तिनें मानसिक तयारी केली होती. किंवा माझें बोलणें ऐकून संवेदना बधिर झाल्यामुळें तर ती अशी स्वस्थ बसून राहिली नव्हती! तिला कळणार नाहीं अशा बेतानें मी तिच्याकडे पाहूं लागलों तोंच तिनें म्हटलें; "एक विचारूं?"

"काय विचारणार आहेस?"

"दुसरं काय विचारणार! तुमच्या ह्या निर्णयाचें कारण—"

मोठा अवघड प्रश्न तिनें विचारला होता. अशा प्रश्नाचें सहजासहजीं उत्तर देणें कसं शक्य होतें! शिवाय सगळ्याच गोष्टी स्पष्टपणें तोंडावर थोड्याच सांगतां येतात! त्यामुळें तिचा प्रश्न उडवून लावल्यासारखें करीत मी म्हटलें, "तें विचारूं नयेस नी सांगूं नये."

"आणि मी तसा आग्रहच धरला तर—"

"तर तें मला सांगावं लागेल. पण तुला आवडणार नाहीं."

"आता तुमच्या दृष्टीनें माझ्या सुखदुःखाचा प्रश्न येतोच कुठें! तुमचा निर्णय तुम्ही घेतलाच आहे. कारण कळलं तर तेवढंच मला मोकळं वाटेल."

"मोठ्या पेचांत टाकतेस मला—"

"जें मी बोलायला हवं तें तुम्ही बोलत आहां."

"मतलब?"

"तें आतां तुम्हांला समजणार नाहीं. माझं कुठचंच बोलणं तुम्ही आतां समजून घेऊं शकणार नाहीं. मीं फार बोलणारहि नाहीं पण माझ्या प्रश्नाचं मला उत्तर हवं आहे"

"तूं मला आवडत नाहींस एवढं सांगितलं तर तें पुरेसं नाहीं काय?

"तुमचा निर्णय सांगितलात तेव्हांच तें मला कळलं.

पण आवडत नाहीं म्हणजे काय?"

"तपशीलांत शिरण्यांत काय अर्थ आहे?"

"तुमच्या दृष्टीनें नसेल. पण माझ्या आहे. मला कळलंच पाहिजे."

"ही बळजोरी होते आहे. हाच तुझा स्वभाव मला आवडत नाहीं."

"म्हणजे माझा स्वभाव तुम्हांला आवडत नाहीं?"

"हो—तुझा स्वभाव, तुझं वागणं-बोलणं, तुझं मुलांवर कातावणं, तुझा शिष्टपणा ह्या सगळ्यांची चीड येते मला. तुझ्या राहण्याचीसुद्धां—"

"केव्हांपासून?"

नेमका नको तो प्रश्न तिनें विचारला होता. तिचा प्रश्न ऐकून माझ्या वृत्तींत एकदम बदल पडला असावा कारण तिनें म्हटलें,

"किती दचकलांत?" आणि माझ्यावर नजर रोखून विचारलें "एवढं दचकायला काय झालं?"

"कुठें काय?"

"उगाच कशाला लपवतां?"

"मी कशाला काय लपवूं?"

"इतके दिवस ठीक होतं. आतां तर मुळींच आवश्यकता नाहीं."

"तुझा बोलण्याचा रोख?"

"तुमच्या मनांत आहे तोच–"

"तुला कसं कळलं?"

"तुम्हीच सांगितलंत."

"मी?"

"हो-तुम्ही. तुमच्या बदललेल्या वृत्तींनीं. कालपरवांपर्यंत मी तुम्हाला आवडत होतें. माझ्या गुणांचं कौतुक करीत असा तुम्ही. तुलना सुरूं झाली आणि पारडं फिरलं. अचानक मी आवडेनाशी झालें. माझे दोष तेवढेच तुम्हाला दिसूं लागले. मला मेकअप् करतां येत नाहीं, सोसायटींत मिसळतां येत नाहीं, इंग्रजी बोलतां येत नाहीं...मला हें कळत नाहीं आणि तें कळत नाहीं. तेव्हांच मी ओळखलं—"

"फार बोललीस सुशील. फार बोललीस. पण कितीहि बोललीस तरी माझा निर्णय आतां बदलणार नाहीं."

"बदललांत तर मलाच आवडणार नाहीं. तुमच्याआड मी जरासुद्धां येणार नाहीं. उलट तुम्हाला मदत करीन."

"सुशील!"

"होय, मदत करीत. मला विश्वासांत घ्या आणि पहाच तुम्ही." तिच्याकडे मी साशंकतेनें पाहूं लागलों तोंच तिनें विचारलें, "किती दिवस ओळखतां ह्या बाईला तुम्ही?"

"चारसहा महिने—"

"रोज गांठीभेटी होतात?"

"अधूनमधून."

"कुठें भेटतां?"

"'रांदव्हू'त नाहींतर तिच्या घरीं."

"तिच्या घरच्या माणसांना चालतं?"

"फार मॉडर्न आहेत तिच्या घरचीं माणसं."

"मग तर उत्तमच!" माझ्याकडे पहात ती म्हणाली, "मी तुम्हाला एक सुचवणार आहें."

पुन्हा एकदां मी साशंक झालों. ती मला काय सुचवणार होती? हरलेलीं आणि दुखावलेलीं माणसें एकतर फार आगाऊ वागतात किंवा पड खाऊन तरी वागतात. पण ही प्रतिक्रिया मूळ स्वभावावर अवलंबून असते. माझें बोलणें ऐकून ती उद्दामपणें वागेल अशी माझी अपेक्षा होती. पण ती एकदम मवाळपणें वागूं लागली. मी तिला विश्वासांत घ्यावें असें सांगूं लागली. तिच्याविषयीं तपशीलवार चौकशी करूं लागली. ह्या पाठीमागें एखादा डाव तर नव्हता? साळसूदपणाचा आव हा पवित्रा तर नव्हता? तसेंच असलें पाहिजे. कारण कांहींहि झालें तरी पड खाऊन वागणें तिच्या रक्तांत नव्हतें. तिच्या स्वभावाशीं तें विसंगत होतें. त्यामुळें मी सावध झालों आणि विचारलें, "काय सुचवणार आहेस?"

"तुम्ही तिला 'रांदव्हू'त नाहींतर तिच्या घरीं भेटतां म्हणजे तुम्हाला पुरेसा एकांत मिळत नसेल—"

"तुला काय सुचवायचें आहे?"

"मी अगदीं साधेपणानें बोलतें आहें. तुमच्या हिताचं—फायद्याचं."

"काय तें लौकर सांगितलंस तर बरं होईल."

"सांगतें. असे अधीर होऊं नका. बाकी तुम्ही अधीर व्हावं असंच मी सुचवणार आहें." ती असं बोलत होती पण काय तें सांगत नव्हती. उगाच मला टांगणीला लावीत होती. मी तिच्याकडे पाहूं लागलों तोंच ती म्हणाली,

"तिच्या घरचीं माणसं फार मॉडर्न आहेत असं तुम्ही म्हणालांत."

"खरं आहे."

"मॉडर्न म्हणजे किती मॉडर्न आहेत?"

"म्हणजे?"

"कांहीं माणसं खरोखरीचीं मॉडर्न असतात; कांहीं मॉडर्न राहतात.

"मी त्यांच्या आचारा-विचाराविषयीं विचारतें आहें."

"अंतर्बाह्य मॉडर्न आहेत तिच्या घरचीं माणसं. पण तूं हें कशाकरतां विचारीत आहेस?"

"कारण मी जें सुचवणार आहें त्याच्याशीं त्याचा फार संबंध आहे—" आणि माझ्याकडे रोखून पहात तिनें विचारलें, "ह्या बाईचं तुमच्यावर किती प्रेम आहे?"

"फार गैरलागू प्रश्न विचारते आहेस तूं."

"खरं आहे" थांबल्यासारखं करीत तिनें विचारलें, "तुम्ही सांगाल तें ती ऐकेल?"

"अर्थात्."

"तशी वागेल?"

"निःसंशय."

"मग तिला घेऊन आठपंधरा दिवस कुठंतरी बाहेरगांवीं जा एखाद्या थंड हवेच्या ठिकाणीं." तिचें बोलणें ऐकून मी एकदम चमकलों. तिच्याहि तें लक्षांत आलें असावें. कारण ती म्हणाली, "माझ्यामुळें इतके दिवस फार कोंडमारा झाला असेल तुमचा. आतां कुणाला भ्यायची आवश्यकता नाहीं. तिला घ्या आणि खुशाल बाहेरगांवीं जा. तेवढंच तुम्हाला बरं वाटेल. मोकळं वाटेल" ती बोलत होती आणि माझा माझ्या कानावर विश्वास बसत नव्हता. तिनें असें बोलावें आणि अशी सूचना करावी त्याचें मला आश्चर्य वाटूं लागलें. वास्तविक, रूपाला

## तात्पर्याची कविता



••••••••••••••••

मंगेश पाडगांवकर

नांव जगन्नाथ : आठव्या वर्षीं हातीं आली झोळी
वणवण मागे माधुकरी : मऊ पुरणपोळी
वर्षाकाठीं एकदांच त्याला कधींतरी मिळे
रुखासुखा घास एरव्ही कसाबसा गिळे

त्वेषानें त्वेषानें त्वेषानें तो शिकला
रस्त्यानें जातांना अनेकदां थुंकला
थुंकला सगळ्या जगावर स्वतःवरच चिडून
पुस्तकांत अधिकच अधिकच गेला बुडून

बक्षिसें घेत घेत जेव्हां आला वयांत
सुख देण्यासाठीं त्याचें कोणीच नव्हते हयात
मोठाल्या पगाराची त्याला नोकरी लागली
काळोखांत खरकटीं ढकलं लागला मागलीं

श्रीमंताचें एक स्थळ त्याला सांगून आलें
तत्वनिष्ठा : हुंडा नको : तिच्याशींच लग्न केलें
तरीही सासऱ्यानें एक मोटार दिलीच घेऊन
चाळीस हजार दागिन्यांचे; बंगलाही दिला बांधून

मघई पानासारखें मऊ मऊ सुख आलें
जगन्नाथाला टक्कल पडलें; त्याला एक मूल झालें;
तीन बढत्या मिळाल्या; एकूण चार मुलें झालीं;
जगन्नाथाचें पोट सुटलें : आणखी एक बढती आली

जगन्नाथ डॅडो झाला, आणि त्याची बायको मम्मी
न चुकतां नेमानें क्लबांत खेळूं लागली रमी
जगन्नाथ सकाळींच ऑफिसांत निघून जाई
आणि रात्रीं दहा वाजतां फायली घेऊन घरीं येई

नटून थटून सवयीनें ती त्याच्या जवळ येई
आणि तुपाळ जिलबीसारखें थुलथुलीत सुख देई
ती दिवसा रमी खेळे; तो दिवसा काम करी—
त्याचें दोंद अधिकच सुटलें; बँकेंत खूप पैसे भरी...

काम करतां करतां त्याला एक दिवस शिंक आली
आणि हालचाल हृदयाची अचानक बंद झाली
तात्पर्य : जगन्नाथ टेबलापाशीं तसाच मेला...
झोळी घेऊन आलेला माणूस कुठें गेला?

घेऊन कुठेंतरी जावें आणि दोनचार दिवस एकत्र घालवावे असें किती वेळां माझ्या मनांत आलें होतें. पण प्रत्येक वेळीं सुशीलच्या भीतीनें तें दावून टाकावें लागलें होतें. आणि आतां तीच मला ही सूचना करीत होती. माझ्या मनांत अनेकवेळां आलेला विचार बोलून दाखवीत होती. तिची सूचना मला सुखवणारी असली तरी ती सरळ-पणानें केलेली होती कीं त्यामागें कांहीं काळेंबेरें होतें कांहीं लक्षांत येईना. माझ्या मनाचा गोंधळ उडाला आहे आणि तिचें बोलणें मला अविश्वासाचें वाटत आहे हें तिनें ताडलें आणि म्हटलें, "आपण दोघंहि समंजस आहों असं मघाशींच तुम्ही म्हटलंत—"

"हो."

"म्हणूनच ही सूचना केली. आपलं नवराबायकोचं नातं संपलं म्हणून कांहीं आपण एकमेकाचे शत्रू होत नाहीं. तुमची मैत्रीण तुम्हाला हें सांगत आहे असं समजा आणि मोकळ्या मनानें त्याचा स्वीकार करा." तिचं बोलणं ऐकून मी एकदम भावनाविवश झालों. म्हटलं, "सुशील, मला तुला आणखी कांहीं सांगायचं आहे."

"सांगा."

"आपण वेगळीं झालों तरी सांपत्तिक दृष्ट्या तुला कांहीं कमी पडणार नाहीं अशी मी तजवीज करीन."

"ती पुढची गोष्ट आहे."

"पण मुद्दाम सांगून ठेवली. तसंच मुलांवर तुझा हक्क राहील—" मला मध्येंच थांबवीत तिनें विचारलें, "ह्या निरवानिरवीच्या गोष्टी आजच करण्याची आवश्यकता आहे काय ?" माझी समजूत घातल्या-प्रमाणें ती म्हणाली, "तुम्ही परत आल्यावर हे सारे तपशील आपल्याला शांतपणें ठरवतां येतील. आजच काय घाई आहे ? आतां उगाच माझा आणि मुलांचा विचार करूं नका. सगळं विसरून जा आणि तिच्याबरोबर नव्यानें सुरुवात करा—जशी आपण आपल्या संसाराला दहा वर्षांपूर्वी केली..." आणि पाठ फिरवून ती आंतल्या खोलींत निघून गेली.

मी कल्पना केली होती त्यापेक्षां प्रत्यक्षांत ती अगदीं निराळी वागली होती. माझा निर्णय ऐकून ती रुद्रावतार धारण करील असें मला वाटलें होतें पण ती कमालिची समजूतदारपणें वागली होती. किंबहुना कुठलीहि बाई आपल्या नवऱ्याला करणार नाहीं अशी सूचना तिनें केली होती. मोकळ्या मनानें मीं तिच्या सूचनेचा स्वीकार करावा असें तिनें सांगितलें होतें. मला तरी आणखी काय हवें होतें ? आतां मी मोकळा होतों. अगदीं मोकळा होतों. कसें हलकें हलकें वाटत होतें. इतके दिवस उगाच मी ह्या गोष्टीचा बाऊ करीत होतों. उगाच विचार करीत होतों. रूपा म्हणत होती तें खरं होतं. मी धैर्य दाखवावं आणि सगळं स्पष्टपणें बोलून टाकावं म्हणून ती वारंवार सांगत होती तें अगदीं बरोबर होतं. आता ती भेटली कीं तिला म्हटलं पाहिजे—

रूपा भेटली तेव्हां मी म्हटलं, "एक चांगली बातमी आहे. तुला आनंद होईल."

"तूं भेटलास कीं मला नेहमींच आनंद होतो."

"पण मी सांगणार आहे तें ऐकून तर तूं मला एकदम मिठीच मारशील"

"मग सांग कीं लौकर"

सुशीलचें आणि माझें झालेलें बोलणें आणि तिनें केलेली सूचना मी सांगितली तेव्हां ती आश्चर्यानें उद्गारली, "खरं म्हणतोस ?"

"मग सांगतों काय !"

"मग आतां विलंब कशाला ? उद्यांच निघूं."

"कुठं जाऊं या ?"

"कुठं म्हणजे ! महाबळेश्वरला. ऑन्टीचा तिथं एवढा मोठा बंगला आहे तो मग कशाकरतां ?"

"ठीक आहे. तूं म्हणशील तसं."

"आतां ह्यापुढें मी म्हणेन तसंच वागायला हवं. आणि हें बघ—" माझा टाय् हलवीत ती म्हणाली, "तिकडे येतांना उगाच सूट आणि टाय् बरोबर घेऊं नको."

"कां ग ?"

"सुटांत तूं फार मोठा दिसतोस. गंभीर दिसतोस. मला नाहीं आवडत."

हंसल्यासारखें करीत मी म्हटलें, "अग मी मोठाच आहें."

"असलास तरी तसा दिसतां कामा नयेस. ह्यापुढें तूं कुठचे कपडे वापरायचे तें मी ठरवीन. माझ्या बरोबरीचा दिसला पाहिजेस तूं. माझ्यासारखं अल्लडपणानं वागलं पाहिजेस. हंसत खेळत—"

"ठीक ठीक—"

"असं नुसतं ठीक ठीक नको—".

"मग काय म्हणूं ?"

"सांगूं ? असं कमरेंत वांकायचं यस् हनी—यस् हनी—" आणि ती हंसूं लागली. तिच्याबरोबर हंसत हंसत मी म्हटलं, "यस् डार्लिंग–यस डार्लिंग—"

यस् डार्लिंग आणि यस् हनी करताकरतां महाबळेश्वरला दोन

दिवस कसे गेले तें कळलं सुद्धां नाहीं. खावं, प्यावं आणि मजा करावी. एकमेकांला चिकटून बसावं. हितगूज करावं. दोन दिवस आमची आम्हाला शुद्ध नव्हती कीं बाहेरच्या जगाची. दिवस केव्हां संपत होता आणि रात्र केव्हां सुरू होत होती; जाग केव्हां येत होती आणि एकमेकाच्या मिठींत पुन्हा झोंप केव्हां लागत होती त्याचा कांहीं पत्ता नव्हता. दोन दिवसांत बंगल्याच्या बाहेरसुद्धां आम्ही पडलों नाहीं. सुख अंगावर आलें तेव्हां मी म्हटलं, "आज कुठेंतरी बाहेर भटकून येऊं."

"कशाकरतां?"

आळस दिल्यासारखें करीत मी म्हटलें "तेवढंच मोकळं वाटेल." पण माझ्या बोलण्याकडे लक्ष न देतां ती म्हणाली. "असा आळस देत जाऊं नकोस."

"कां?"

"अरे समोरच्या माणसाचा अपमान होतो."

"सॉरी. पण जन्माच्या संवयी आहेत ह्या—"

"तरी बदलल्या पाहिजेत."

"खरं आहे. एकमेकांसाठीं कांहीं गोष्टी आतां आपण बदलल्याच पाहिजेत."

"आपण म्हणजे?"

"म्हणजे तूं आणि मी—"

"पण माझं तर सगळं तुला आवडतं."

"तें खरं ग" तिच्या हातांतल्या सिगरेटकडे पहात मी म्हटलें, "आता हें तुझं सिगारेट ओढणं-"

"तूंच तर लाईट करून देतोस माझी सिगरेट—"

"तरीसुद्धां—"

"मग इतके दिवस कधीं बोल्ला नाहींस?"

"मला वाटलं होतं कीं एखादवेळेलाच तूं ओढत असशील. पण पाहतों तों—"

"म्हणून काय झालं?"

"वाईट दिसतं."

"वंडरफुलच बोलतोस. सिगरेट ओढण्यांत रे काय वाईट दिसतं?" शब्दानें शब्द वाढून कटुता निर्माण होऊं नये म्हणून मी गप्प राहिलों. पड खाल्ली आणि विषय बदलीत विचारलं, "मग जायचं ना बाहेर?"

"बसूं इथंच."

"असं काय? चल कीं—"

"मी यायलाच हवं काय?"

"कंटाळली असलीस तर नको—" आणि घाईघाईत म्हटलं, "तुझी हरकत नसेल तर मी येतों जरा पाय मोकळे करून."

"थँक यू" आणि खुर्चीतल्या खुर्चीत ती झुलूं लागली. तिच्याकडे पहात मीं म्हटलं, "मी जाऊन येतों तोंपर्यंत तूं स्नान उरकून घे."

"इथं रे कशाला हवा रोज रोज बाथ घ्यायला? हवा तर इतकी थंड आहे--"

"घेऊन तर पहा-ताजंतवानं वाटेल"

"तूं आल्यावर पॉवडर पफ् करून दे म्हणजे बघ पुन्हा कशी ताजी-तवानी होईन." मी नुसता हंसलों आणि वॉकिंग स्टिक घेऊन बाहेर पडलों. माझी कल्पना होती कीं पोर्चपर्यंत ती माझ्याबरोबर येईल आणि टाटा करील. पण खुर्चीतल्या खुर्चीत ती झुलत राहिली.

बसल्या बसल्याच म्हणाली, "लौकर ये रे."

चालतांचालतां सहज विचार आला कीं माणसाचें मन किती मजेशीर आहे! सुखाच्या नानापरी त्याला हव्या असतात. जसा स्त्री सहवास हवा असतो तसेंच एकटेपणहि हवें असतें. जसा सहवासांतला कैफ हवा असतो तसेंच एकटेपणांतलें चिंतनहि हवें असतें. बडबड हवी असते आणि मौनही हवें असतें. सतत सहवासानंतरच्या एकटेपणांतलें सुख भोगायला मन आतां उत्सुक झालेलें दिसत होतें. आजूबाजूला किती पाहूं आणि किती नको असें होत होतें. मनांत येईल तिकडे जावें आणि तितकें भटकावें. पायाखालीं तांबडमातीचा सुरेख गालिचा अंथरलेला होता आणि डोक्यावर वृक्षवेलींचें हिरवेंगार छत्र होतें. पाय घसरण्याची भीति नव्हती कीं उन्हाची तिरीप लागण्याची शक्यता नव्हती. जोडीदार बरोबर नसल्यामुळें औपचारिकपणें वागण्याची आवश्यकता नव्हती. कुणाचें मन दुखवेल म्हणून दबून वागण्याची जरुरी नव्हती. कां कुणास ठाऊक, पण त्यामुळेंच फार मोकळं मोकळें वाटत होतें. जिकडे पहावें तिकडे हिरवेंगार दिसत होतें. दूरवर उंचा-वरुन खालीं फेंसाळत पडणारें पाणी, झाडाझुडुपांत लपलेलीं कौलारू घरें, घरांच्या अनुरोधानें वेडेवांकडे जाणारे रस्ते आणि रस्त्यावरुन हंसतखेळत जाणारीं माणसें-सगळें अगदीं स्वप्नांतल्यासारखें वाटत होतें. फार काय! मी ज्या रस्त्यावरुन चाललों होतों तोहि स्वप्नसृष्टीकडेच धांवत होता. थोड्या अंतरावर वळणापाशी दिसेनासा होत होता. तिथेंच संपल्यासारखा दिसणारा पण न संपलेला हा रस्ता तिथून पुढें कुठें जात होता? झाडाझुडुपांत शांतपणें उभ्या असलेल्या एखाद्या घराकडे कीं कांऱ्याकुऱ्यांनीं भरलेल्या एखाद्या दरीखोऱ्याकडे? कुणी सांगावें! कुणी सांगावें!





अनुक्रमणिका

मी बंगल्यावर परत आलों तोंच तिनें विचारलें, "हें काय? इतका वेळ कुठें होतास?"

"भटकत होतों."

"किती उशीर वाट पाहून थकलें."

"आणि चालून चालून मी दमानें" हंसल्यासारखें करीत म्हटलें, "भूक अशी सपाटून लागली आहे. खाना तयार आहे ना?"

"केव्हांची वाट पाहतें आहे."

"मग चल."

"मला भूक लागली, मी जेवून घेतलं."

"ठीक आहे. मी जेवून येतों."

"रागावलास?"

कांहीं प्रश्न फार निरर्थक असतात. विचारायचे म्हणून विचारलेलें असतात. अशा प्रश्नांवर माणसानें गुळमुळीत किंवा खोटें बोलावें अशीच अपेक्षा असते. रागावलेला माणूस, 'होय, मी रागावलों आहें' असं थोडंच सांगतो! माझ्या आधीं तिनें जेवून घेतलें ह्यांत मला राग येण्यासारखें कांहींच नव्हतें. बाहेरून यायला मला कितीहि उशीर झाला तरी सुशील माझ्यासाठीं थांबून रहात असे त्याची आठवण झाली आणि मी खट्टू झालों एवढेंच. वाईट वाटल्यामुळें आवाजांत बदल पडला आणि तेवढ्यावरून तिनें विचारलें, 'रागावलास?'

"कशाकरतां?" आणि मी जेवणघराकडे वळलों.

पुढे दोनचार दिवसांत मी खट्टू व्हावें असें अनेक वेळां घडलें.

दोनचार वेळां वाईट वाटावें असेहि प्रसंग घडले. कदाचित् नित्याच्या गोष्टींतून मी अर्थ काढण्याचा प्रयत्न केल्यामुळेंहि असें घडलें असेल. हा सगळा माझ्या मनाचाहि खेळ असेल. तसा चाळा करीत बसण्याची माझ्या मनाला संवयच आहे. रूपाच्या चोरून गांठीभेटी घेत होतों त्यावेळीं माझें मन सुशीलची तिच्याशीं तुलना करीत असे आणि आतां रूपा माझ्या शेजारीं असतांना तिची सुशीलशीं तुलना करण्याचा मनाला मोह पडत होता. हें चांगलें नाहीं हें मला कळत होतें. तसें मी मनाला बजावीतहि होतों. पण अवखळ मन माझें ऐकायला तयार नव्हतें. रूपावर माझें प्रेम होतें, माझें सर्वस्व असल्या इतकी ती मला आवडत होती; मग असें कां व्हावें? तुलनेचा मोह मनाला कां व्हावा? रूपा दूर होती तोंपर्यंत तिच्याविषयीं ओढ वाटत होती, तिचें सगळें कांहीं मला आवडत होतें सगळें रूपामय झालें होतें आणि आतां ती जवळ आल्यावर मनानें असा चाळा कां करावा? निकटच्या सहवासामुळें तर असें घडत नसेल? 'रांदव्हूं' तिची माझी भेट होत असे त्यावेळीं ती किती चांगली, ताजीतवानी दिसत असे! किती आकर्षक भासे! किती हवीहवीशी वाटे! त्यावेळीं भेटणारी रूपा आणि आतां माझ्या शेजारीं असलेली रूपा ह्या किती वेगवेगळ्या होत्या! सुशील सारखीच तीहि अव्यवस्थित राहात होती, तिच्यासारखेंच अंग खाजवीत होती, मी बोलत असतांना तशाच जांभया देत होती. केवळ बहिरंगावर भुलल्यामुळें आणि आतां त्यावरचें आवरण दूर झाल्यामुळें तर ह्या गोष्टी लक्षांत येत नव्हत्या? पण तसें कसें असेल? रूपाचें बोलणें आणि चालणें मला किती आवडत होतें! ती किती सहजपणें सोसायटींत मिसळत असे, चतुरपणें संभाषण करीत असे, माझें मन मोडूं नये म्हणून किती जपत असे, येतांजातां माझें किती कौतुक करीत असे! तीच रूपा आतां मला आपल्या हुकमतींत ठेवूं पहात होती, तिच्या मनांत येईल त्याप्रमाणें वागवीत होती आणि कटुता निर्माण होऊं नये म्हणून मी प्रत्येक वेळीं पड खात होतों. ह्याच्या शतांश नरमाईनें जरी मी सुशीलशीं वागलों असतों तरी केवढा फरक पडला असता? पण आतां त्या गोष्टीवर विचार करण्यांत काय अर्थ होता? मागें वळून पाहण्यांत काय हंशील होतें?

संध्याकाळच्या वेळीं आम्ही हातांत हात घालून फिरायला बाहेर पडलों तेव्हां मी म्हटलें, "आज मला दमल्यासारखें वाटतें."

"सकाळपासूनच तूं अस्वस्थ आहेस."

"आहे खरा. कां कुणास ठाऊक!"

"मी सांगूं?" ती म्हणाली, "तूं थोडें कमी खात जा."

माझ्या दमण्याशीं खाण्याचा काय संबंध होता तें लक्षांत येईना. मी तसें विचारलें तेव्हां ती हंसली आणि म्हणाली, "शरीर ताब्यांत असलें कीं दमायला होत नाहीं. आणि कमी खाल्लें कीं शरीर ताब्यांत राहतें." तिचें बोलणें माझ्या लक्षांत आलें होतें. पण त्यांतून वाईट अर्थ न घेतां मी म्हटलें, "वाढत्या वयाबरोबर दमायला होणें साहजिक आहे."

"म्हणूनच कमी खावें."

"मग त्या न्यायानें तूं जास्त खाल्लें पाहिजेस."

"कां?"

"लहान वयांत भरपूर खाल्लें पाहिजे. शरीर सुदृढ होतें." हंसल्यासारखें करीत म्हटलें, "शरीर भरलें कीं उगाच पेटीकोटवर पेटीकोट चढवायला नको." माझें बोलणें वर्मी लागलें असावें. डोळे मोठे करीत ती म्हणाली, "पहातें आहे, तूं फार उणें दुणें काढतोस."

"छे ग! सहज चेष्टा केली. उलट हें तुझें सडपातळ शरीरच मला फार आवडतें—" मी सावरून घ्यायचा प्रयत्न केला पण तिचें समाधान झालें नाहीं. तिच्या कमरेभोंवतीं मी हात टाकूं लागलों तों तिनें झटकून टाकला आणि म्हटलें, "आतां उगाच लगट करूं नको. मला ठाऊक आहे मी तुला आवडत नाहीं."

"आणि मी तरी तुला कुठें आवडतों?"

दीपावलीचा पुढील अंक
१ नोव्हेंबरला प्रसिद्ध होईल

"उगाच बोलूं नको" आणि न बोलतांच आम्ही चालत राहिलों. ध्येंच मी विचारलें, "कुठें जाऊं या ?"

"तूं म्हणशील तिकडे."

"ठीक आहे. असंच चालत राहूं. चालतांचालतां कुठच्या तरी ईटवर पोंचूं."

"नको."

"मग ?"

लेक साईडला जाऊं" आणि आमचीं पावलें त्या दिशेनें पडूं लागलीं. ालकम् पेठेशीं आम्ही आलों आणि माणसें भेटूं लागलीं. समोरून णाऱ्या घोळक्यांतल्या कुणीतरी पुन्हापुन्हा हात वरती करून ओळख वूं लागले. इतक्या दुरून ओळख पटली नव्हती तरी मी हात वरती ला. माझें लक्ष गेलें आहे असें पाहिल्याबरोबर बाई घोळक्यापासून जूस झाल्या आणि झपाझप चालत आमच्यापर्यंत आल्या. हंसल्या- ारखें करीत विचारू लागल्या, "ओळखलंत कीं नाही ?"

"ओळखलं नाहीं म्हणजे, कमालच झाली."

"इकडे कुठें ?"

"तुमच्यासारखाच. भटकायला"

"तुम्हाला वेळ मिळाला हें विशेष. नाहींतर नेहमीं कामांत."

"खरं आहे. पण वेळ काढला कीं मिळतो—"

"एकटेच आहांत ?"

"विसरलोंच कीं—ओळख करून देतों हं."

"त्या मघाशींच पुढें गेल्या."

"म्हणजे ?" आणि खजील होऊन मी बाजारपेठेकडे जाणाऱ्या पाकडे पाहूं लागलों. तिच्याकडे थोडेंफार दुर्लक्ष झाल्यामुळें ती पुढें ाघून गेली होती कीं ओळख करून देतांना मी अडचणींत पडूं नये ा भावनेनें ती बाजूला झाली होती कांहीं लक्षांत येईना. माझी चल- चल लक्षांत घेऊन मिसेस कारखानीस म्हणाल्या, "बरं आहे. येतें."

"भेटूं पुन्हा" आणि बाजारपेठेच्या दिशेनें मी भराभर चालूं लागलों. पाला गांठीत म्हटलें, "हें काय ! तूं थांबली कां नाहींस ?"

"मी कशाला थांबूं !"

"म्हणजे ?"

"तुमच्या दोघांच्या गुलगुल गोष्टी चालल्या होत्या. उगाच माझी डचण नको."

"रूपा !"

"उगाच ओरडूं नको."

"ओरडत नाहीं. पण तुझ्या बोलण्याचा अर्थ ?"

"तुला कळला आहे तोच."

"उगाच मूर्खासारखं बोलूं नकोस. माझ्यापेक्षां त्या वयानें किती ठ्या आहेत—"

"पण चांगल्या टसटशीत आहेत. देखण्या आहेत. आणि शिवाय ग्रावर काय आहे ? तुझ्यापेक्षां मी तर कितीतरी लहान आहें."

"उगाच अर्थाचा अनर्थ करते आहेस."

"तुझा स्वभाव ठाऊक आहे म्हणून करतें."

"मतलब ?"

"तुझा विश्वास कुणी धरावा ? दहा वर्षांनंतर सुद्धां तूं बायकोला कूं शकतोस. उद्यां दुसरी कुणी भेटली तर मलाहि टाकशील—"

हें फार झालें होतें. फार झालें होतें. कुठें दोनचार मिनिटें ओळखीच्या बाईबरोबर बोलत उभा राहिलों तर ती मला ताडताड बोलत होती. माझ्या वर्मावर बोट ठेवीत होती. विश्वास धरण्याच्या मी लायकीचा नसल्याचें सांगत होती. जिच्याबरोबर इतकीं वर्षे संसार केला तिला तोडून टाकतांना तिनेंसुद्धां इतका कांगावा केला नाहीं. उणेंदुणें बोलली नाहीं. उलट जिच्यावर माझें मन जडलें आहे तिला घेऊन मी निवांत ठिकाणीं जावें, अशी कधींहि कुणी करणार नाहीं अशी तिनें सूचना केली. कुठें तिच्या मनाचा थोरपणा आणि कुठें ही ! दोन मिनिटें बाईबरोबर बोलत उभा राहिलों तर कोण आकांडतांडव करते ! किती टाकून बोलते ! किती अविश्वास दाखवते !

विचार करून मी म्हटलें, "आपण इथूनच माघारी फिरूं."

"कां ?"

"तें तूं विचारूं नयेस. मी सांगूं नये"

"मला कळलंच पाहिजे."

"आतां पुढें जाण्यांत स्वारस्य नाहीं. गंमत नाहीं. आपला सहप्रवास इथेंच संपलेला चांगला."

"पण मला तसें वाटत नाहीं."

"त्याचा आतां कांहीं उपयोग नाहीं. अवेळ झाली, माघारी फिरूं."

परत फिरतांना एकसारखें मनांत येत होतें कीं आतां कुठच्या तोंडानें सुशीलपुढें जाऊन उभा राहूं ? तिला काय सांगूं ? मी परत आलों आहें हें कसें सांगूं ? कीं कांहीं न सांगतांच तिला सारें समजेल ?



*...अन्नूच्या पैशानं कुंकवाचा करंडा नाहीं मिळत! एवढं कळलं नसतं तर मी तुझीच झालें असतें. मी कुंवार आहे म्हणून धरणी दुभंग होत नाहीं जया...! बोलतां बोलतां तिच्या नितळ देहाचं तप्त सुवर्ण तळपूं लागलं...*

—वामन चोरघडे

# उधार

लिहायला शक्ति लागत नाही, न लिहायला लागते! शक्ती असती तर हें सारें घडूंच शकलें नसतें. कालच मीं निश्चय केला होता कीं, कांहीं बोलूं नये, कांहीं लिहूं नये; जायचें ते निमूट जावें! आज तो निर्धार टिकला नाहीं, आणि उद्यां...?

उद्यां टिकेल न टिकेल! मला त्याचें काय? माझ्या जीविताचा कालचा दिवस संपला, आजचा संपत आहे अन् 'उद्यां' माझ्यासाठीं उगवणारच नाहीं. त्याआधींच मी जाणार, माझा मीच निरोप घेणार!

निरोप घ्यावा असें दुसरें कोणी मला राहिलें नाहीं. निरोप देण्याची संवय असली की निरोप घेताहि येतो. मीं कुणाला आजवर निरोप दिला नाहीं, स्वतःला तर नाहींच नाहीं. कसलें जमणार मला तें आतां?

उद्यांच्या आंतच हे लिहिणारे माझे हात काष्ठवत् होतील; प्रलय बघतांना अंधारून येणारे हे माझे डोळे थिजून जातील; हत्या घडवून आणणारें हें माझें मन–तें कुठें जाईल तें मला नाही ठाऊक! कुठें का जाईना! त्याचा मला आतां कांहीं उपयोग नाहीं. असलें राहिलें काय, अन् नसलें गेलें काय, मी कशाला फिकिर करूं त्याची?

हा 'आज' संपायला अवघे सहा तास उरले आहेत! मी मरायला देखील तेवढाच अवधि आहे. माझ्या हातीं मी मरणार! दुसऱ्यासाठीं मरण्याची तयारी नसली की, मरण किती अवघड, असह्य असतें, हें मी गेल्या पांचसहा दिवसांत अनुभविलें आहें. फार फार कडू आहे तो अनुभव! पितां पिववत नाहीं!

मी मरणार तो कृतकृत्य होऊन नाहीं. आपण कशासठी मरतों तें तरी माणसाला जगतेपणीं कळलें पाहिजे! निरुद्देश, निष्काम मरण त्याच्याच नशिबीं येतें, जो माझ्यासारखा अभागी असतो, ज्याच्या ललाटींचा' लेख क्लेशाच्या रेघोट्यांनीं खोडला जातो! मरतांनी मला दुःख होत आहे. मरावेंसें वाटतें म्हणून मी मरत नाहीं. टळलें असतें तर मला हवेंच होतें. हीच ती जगण्याची आस, लाचारी,



अनुक्रमणिका

नादानी! पण जें होणार तें अटळ आहे, अनिवार्य आहे!

कां मरणार मी? हेंच तर कळत नाहीं! स्वतःसाठीं नव्हे तर दुसऱ्या कुणासाठीं, दुसऱ्या कुणावर मरण्यांत सुख असावें, असायला हवें; पण पण या असल्या, माझ्यासारख्या, मृत्यूचें दुःख! तें टाळायलाहि मृत्यूच हवा!

येसू! या माझ्या येसूसाठीं मी मरतों आहें का? मी निक्षून 'नाहीं' असें बजावलें तर मला जगतां, जगून दाखवितां येईल का? किंवा—

ती मेली म्हणून मला मरावेंसें वाटतें का? छे! तसें असतें तर येसू कशाला मेली असती मग? सारखा विचार करतों आहें मी गेले चारसहा दिवस—न झोपतां, न जेवतां, कुणाला न सांगतां! एकासुद्धा प्रश्नाचें उत्तर मिळत नाहीं. हेंच तर माझ्या मृत्यूचें प्रयोजन!

येसू मेली म्हणून मला जगणें असह्य होत आहे, हें खोटें आहे. कारण, जेव्हां ती मला दिसली नव्हती, भेटली नव्हती, माझ्यांत सामावली नव्हती तेव्हां मी जगतच होतों ना? छान, उत्तम जगत होतों—स्वतःचें कौतुक करीत, सुखासाठीं हवें नकोची आस करीत, जिवाचें कोड पुरवीत, शरीराचे चोज संभाळीत! उद्यांच्या आंत निष्प्राण होणारें हें माझें शरीर,—सुडौल सुदृढ शरीर; कितीतरी वेळ मी आरशांत बघत होतों, त्यांतल्या गरम रक्ताची खुमारी चाखीत होतों!

येसूसाठीं नसेल कदाचित् पण येसूमुळें मी मरतों आहें काय? नाहीं, मुळींच नाहीं! ती जगली असती तरी मला मरायलाच हवें होतें! अटळ आहे तें! कुणासाठीं नव्हे, कुणामुळें नव्हे—हो, आठवलें, सुचलें!—आतां लिहितां लिहितां उकललें—मी मरणार तो मला जगावेंसें वाटतें म्हणून!

सहा दिवसांपूर्वीं, परवांच्या शरदांतल्या अष्टमीला सोमवारी येसू मेली! ती नाहीं आतां! उद्यां मीहि रहायचा नाहीं! गेल्या अष्टमीला येसू होती! मी होतों! ढगांतून बाहेर पडून नितळांत पोहत असलेला चंद्र होता. माझ्या या समोरच्या खिडकींतून मीं तो पाहिला होता. येसूलाहि दाखविला होता. ती बघायला तयार नव्हती. तिला चंद्राचें अप्रूप नव्हतें. तिला असें जवळ बोलावून खिडकीजवळ मीं उभें केलें होतें. जमीन बघणारे तिचे डोळे मी चंद्राकडे वळविले होते. चंद्रा अगोदर तिची माझी दृष्टादृष्ट झाली. डोळे भरले होते. खाऱ्या पाण्याचें सावट पुसून टाकावें म्हणून जवळ गेलों, तशी ती दूर झाली.

त्यानंतर ती जवळ आलीच नाहीं. दूर गेली. पार पल्याड निघून गेली; मला ये न म्हणतां, न सांगतां, न विचारतां निघून गेली!

पण असें तरी कसें म्हणूं? तिनें माझा निरोप घेतला होता. 'सनई चौघड्याचा आवाज ऐक.' असें ती म्हणाली होती. माझ्या कैफांत मला तें कळलें नाहीं, त्याला ती काय करणार? न कळल्यामुळेंच हें सगळें झालें. मी तिला जवळ बोलावीत होते चंद्रासाठीं, म्हणून ती दूर गेली!

तो अंतिम दिवस. त्या दिवशीं जें बघितलें तें उघड्या डोळ्यांनीं नाहीं बघतां येत; जें ऐकलें तें उघड्या कानांनीं नाहीं ऐकतां येत. तें ऐकाय—बघायला हवेंच होतें काय? कांहीं गोष्टी अशा असतात म्हणे की ज्या पहिल्या ऐकल्या की मरण येतें! मला मरण नाहीं आलें. मीच राजी खुशीनें, नशापाणी न करतां मरणार आहें. माझा बोलबालंट कुणावर नाहीं. हा आज संपायच्या आंत अन् तो उद्यां सुरू व्हायच्या अगोदर सगळें संपणार आहे. मृत्यु येतो; तेव्हां तो जीवनाला क्षणाची उसंत घेऊं देत नाहीं; जीवन मात्र आपलें सर्वस्व, पळाचाहि विलंब न लावता स्वतःला मृत्यूच्या स्वाधीन करतें. असें कां व्हावें कुणास ठाऊक!

येसू! तुला ऐकणे शक्य असेल तर ऐकून घे. तुझ्या मरणाचा आनंद मी तुला लाभूं देणार नाहीं. इथून जातां येतें म्हणून तूं पल्याड गेलीस. तिथून तर कोठें जातां येत नाहीं ना? मग मी येतोंच आहें, आलोंच बघ! जाशील कुठें!

गेल्या अष्टमीच्या चार दिवस अगोदर खिडकींतून चतुर्थीचे कोवळे चंद्रकिरण आंत आले होते. येसू या याच खोलींत दारांतून आली. येतांच तिनें दार लोटून घेतलें. आंतून कडी घालायला ती पाठमोरी झाली. क्षणभर तशीच उभी राहिली. जें नेहमीं घडायचें तें घडलें नाहीं म्हणून कडी न घाल्तांच टेकून उभी राहिली.

"नको असलेलं कुणी येणार आहे का?"

"नाहीं रे!"

"मग दार लावलंस तें?"

"हो खरंच की! पण येऊं नये म्हणून लावतात तसं, जाऊं नये म्हणूनहि दार लावतात ना?"

मनांतले किंतु स्पष्ट बोलणें बारगळलें माझें आणि...मीं हाक मारली 'येसूऽऽ'! अंतर्वांच्छेनें भारावलेला हा माझा हाकार, अस्फुट, अबोध! येसू नेहमी म्हणायची कीं, 'तूं काय हवें तें कर पण अशी हाक मारूं नकोस. मी स्वतःला विसरतें, हरतें मी. सावर सुटतो माझा.' दाराला टेकून उभी असलेल्या येसूला आजहि मी तशी हाक दिली. आतां येईल ती; अगतिक होईल ती; ठाय सुटेल तिचा; ती माझ्या कुशींत शिरेल; तिचा ऊन ऊन तृप्त उच्छ्वास आणि माझा निःशब्द कुरवाळ; पुनः मी हाक देईन—येसू! माझी येसू ..!

पण त्या दिवशीं ती तशीच उभी राहिली दाराला टेकून, नुसती बघत, मजकडे, मी कोण आहें याचें भान सावरीत. आदल्या चतुर्थीची तिची माझी भेट...!

सायंकाळच्या सावल्या खोलींत शिरून फुगडी खेळत होत्या. त्यांचा धांगडधिंगा ऐकवेना मला. गेल्या चार दिवसांत मला बधिरपण आलें होतें. येसू भेटली नव्हती ती भेटावी असें तीव्रतेनें वाटत होतें पण मीहून तिची भेट घ्यायची इच्छा नव्हती. माझें मन मला डिवचत होतें.

### लेखकांच्या नाना 'कळा':

### स्पुटनिक लेखक



शिळ्या कढीला ऊत आणुनी
तिखट मसाला मिर्ची मिसळुनी
जिभा जयांच्या झाल्या अळणी
वल्लव वाढी माल शिजवुनी
जिथे नासले अन्न कुजोनी
हुंगत जाई वस्त्रा फेडुनी
किती घाण जमवुनी विनाशक
दारू भरतो 'स्पुटनिक' दैनिक





मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास



ती कां आली नाहीं या चार दिवसांत? सर्वस्व देण्याची हमी देऊन माणूस इतकी प्रतारणा करूं शकतो? येसूदेखील? तिनें स्वच्छ सांगितलें असतें तर मला कांहीं वाटलें नसतें, खरेंच कांहीं वाटलें नसतें. कां लपविलें तिनें? येसूनें, जिला मीं माझेपण देऊन टाकलें तिनें मजजवळ लपविलें! म्हणून ती आली नाहीं. मला कळल्याचें तिला कळलें असेल. नाहीं तर ती आली असती, आल्यावाचून राहूंच शकली नसती.

आणि या सावल्या आतां मला भिववीत आहेत. ज्यानें आपलें सर्वस्व न मागतां, न विचारतां देऊन टाकलें असतें, त्याच्यासारखा अगतिक तोच.

येसू! ये, ये! पण ती आली तर काय बोलूं तिच्याशीं? ती येईलहि. जिला माझ्याशीं प्रतारणा करतां आली तिला यायला खंत कसली!

जिन्यावर पावलें वाजलीं. परिचित पदरव. त्यांच्या ओल्या वासानें हरिणागत मी दाराकडे वळायचा. संवय झाली होती मला, माझ्या मनाला, तनाला! एकेका पायरीनें माझी शीग भरायची! आज पावलें वाजलीं. तरी मी जिथला तिथें, आंतल्या खोलींत, निपचित, बधिर!

"जयवंता, जया! मी आलें रे! अय्या! तूं रे कशाला आलास? बघ की रे जया, हा चंद्र कसा बघतो आहे मला. थांब, खिडकी पण लोटून घेते. अरे, पण तूं—तूं कुठं आहेस? जयू—ए जयवंता...!"

"हा इकडे आहें मी."

"आज हें इकडे तिकडे काय चालवलं आहेस?"

"तुला ठाऊक आहे तें."

"अजून राग गेला नाहीं वाटतं माझ्या वेड्याचा! छकुलं बाळच की नाहीं तें! आतां जातो बघ राग तुझा. एक—दोन..."

"मी म्हणजे छकुलं बाळच! एवढासा खाऊ दिला की—"

"येवढासा नाही. मागशील तो, हवा तेवढा! मी आज—! नाहीं रे, त्या दिवशीं तुझं कांहींच चुकल नव्हतं. तुला धीर निघत नव्हता हें मला कळायला नको का? मला पण नाहीं निघत. पण मी मेली भित्री! जया, तुझं अधीरपण, तुझी हांक—माझंहि काळीज फत्तराचं नाहीं रे! अर्पणानं स्त्री अधिक निश्चित होते पण मला उगीच भीति वाटली रे! वाटलं, नैवेद्याच्या ताटाला आंघोळ केल्यावाचून हात लावूं द्यायचा! पाप नाहीं का होणार! तूं हिरमुसलास, रागावलास, डोळे पाणावले तुझे. मी परत गेलें खरें, पण गेल्यावर माझा क्षण क्षण युगासारखा गेला रे! कसला संयम! मला वाटलं तूं येशील. आला असतास तर..."

"बरंच झालं आलों नाहीं—"

"कां रे?"

"पार झालं असतं तें."

"अजून राग गेला नाहीं तुझा? काय करूं मी? तूंच सांग. तो बघ चंद्र, काचेतून देखील बघतो आहे. आठवतं तुला? तें तळ्याच्या काठचं चांदणं? आपण दोघेच पायरीवर, पाण्यांत पाय सोडून...तूं किनई जयू, फार फार वाईट आहेस; अगदीं ऐकत नाहींस बघ, माझ्या पायला चिमटा काढलास त्या दिवशीं. जा, आम्ही नाहीं अशानं...अन ती रे, ती आमराईतली दुपार? भोवऱ्या घू घू करीत होत्या; बगळ्यांचा थवा वर उडत गेला...बघ बघ म्हणत मी हात उंचावले... अन् तूं...फार फार चावट आहेस तूं! असा कसा रे धीर निघत नाहीं तुम्हा पुरुषांना? वेडा राजा कुठला! आता गेली ना रागूबाई तुझ्या मनांतली...?"

"गेली काय अन् न गेली काय!"

"अगोबया! अगदीं घोर घोर अंधःकार पसरला आहे एकाच्या मनीं. बरं बाई, आपलं काय, जें ज्याचं आहे, ज्याच्यासाठीं आहे त्यानं तें अगोदर काय अन् नंतर काय...आपण कशाला मांडता घालावा? बघ कीरे जरा इकडे, ये कीं जवळ! मग काय, क्षमा मागूं? पदर पसरूं नाक घासून? गाणं म्हणूं? नाचून..."

"सगळंच बेताल झालं आहे...

"कांहीं झालं नाहीं. माझ्यांत बघ! तुझ्यांत मी आहें, माझ्यांत तूं! जया, आतां मी रागावेन बरं! फारच आर्जवं करायला लावतो आहेस तूं आज."

"येसू, माझ्या वेदना तुला नाहीं कळायच्या. तूं हात राखून माझ्याशी वागलीस. पण माझं होतं नव्हतं ते गमावून बसलों."

"मी हात राखून वागलें? तुला आज बरं नाहीं का राजा?"

"तू कां लपवलंस, कां फसवलंस मला?"

"जया, जयवंता,...राजा...?"

"परवां तुझे काका आले होते इथं .."

"मग येऊं दे की! मला काय भीति आहे त्यांची? तूं आहेस तोंवर मला कुणाकुणाची भीति नाहीं. कोणते काका? नानाकाका कीं रघूकाका?"

"तुझ्या सर्व काकांची नामावळी नाहीं मजजवळ. तूं जिथं राहातेस ते काका आले होते."

"अन् म्हणत होते कीं येसू अनाथ आहे; देण्याघेण्याची अपेक्षा करूं नका. हेंच ना?"

"नाहीं."

"मग काय? त्यांच्या सुनंदाबद्दल बोलले?"

"होय."

"म्हणाले असतील कीं, येसू हवी असेल तर काचबांगड्या मिळतील; सुनंदा हवी तर गोटपाटल्यांनीं..."

"ते म्हणाले, माझ्या मुलीचं लग्न जिथं तिथं फिसकतं. असं वाटतं की जीव द्यावा .."

"कांऽऽही जीव देत नाहींत ते? मुलखाचे कंजूष आहेत! पोटच्या पोरीसाठीं कडोसरी सैल करतांना जीव जातो त्यांचा! पैशासाठीं..."

"पैशामुळें नव्हे"

"मग कशामुळे?"

"तुझ्यामुळें—"

"माझ्यामुळे? मी...?"

"हो. एक मी सोडलों तर सगळयांना माहीत आहे. मी तुझ्यांत नादावलों म्हणून नेमका अजाण राहिलों..."

"काय, बोलतोस काय तूं?"

"आतां स्पष्टच बोलतो येसू! त्या दिवशीं



—शिरीष पै

अकरावं संपून मला बारावं वर्ष नुकतंच लागून गेलं होतं, तेव्हांची गोष्ट. "वयाच्या मानानं अक्कल फार वाढलीय्", असं मला उद्देशून बोलल्याखेरीज आईचा एकहि दिवस उजाडत नव्हता. 'नुसतीच घोडी वाढत चालली आहे नि अकलेच्या नांवानं शून्य!" मला पाहिलं कीं आई तोंडांत पुटपुटत रहायची. पोटांत माया असली तरी तोंडानं ती माझ्याबद्दल फार कठोर बोलायची. मी चांगलं वागावं, चांगलं बोलावं, उठतांबसतांना मुलीच्या जातीला शोभेल असं उठाबसावं, घोड्यासारखं खिंकाळत हसूं नये, मोठमोठ्यानं गाणीं म्हणूं नयेत—अशा माझ्याबद्दल असंख्य अपेक्षा होत्या तिच्या मनांत. थोडक्यांत म्हणजे बाईच्या जातीला शोभेल असं तिच्या मतें मी वागायला हवं होतं. दिवाणखान्यांत पुरुषमाणसं असलीं म्हणजे मी दडादडा धावत जाऊं नये असं तिला वाटायचं. अंगांतला झगा गुडघ्यावरून मांडीवर जरा सरकला कीं ती माझ्या पाठींत दाणदिशी हाणायची. शेवटीं एके दिवशीं तर माझ्या झग्यांची तिनं इतकी भीति घेतली कीं होते नव्हते तेवढे माझे सगळे झगे तिनें गाठोड्यांत बांधून टाकले आणि माझ्या अंगावर परकर पोलकं चढवलं. एके दिवशीं तर तिनं कमालच केली. घोट्यावरचा परकर पोटरीपर्यंत वर धरून मी दिवाणखान्यांतून गेलें म्हणून तिनं मला तिचा ऊर फुटेपर्यंत नि माझी पाठ फुटेपर्यंत सपाटून बडवलं. तेव्हांपासून माझं नि आईचं भांडण सुरू झालं. मी सभ्य व्हावं म्हणून ती जों जों प्रयत्न करायची तों तों मी अधिकच चेकाळल्यासारखी करूं लागलें. मुद्दामहून तिच्या वाटेला जाऊं लागलें नि तिला चिडवूं लागलें.

तेव्हांची ही हकीगत:

आमच्या बंगल्याच्या डाव्या अंगाला रावबहादुर परांजप्यांचा बंगला होता, पिछाडीला इंजिनियर वैद्यांचा बंगला होता नि उजव्या अंगाला डॉक्टर भडभड्यांची चाळवजा लंबोडकी बिल्डिंग होती. संध्याकाळीं घरावरच्या गच्चीमध्यें जाऊन उभं राहिलं म्हणजे सगळ्या बंगल्यांतल्या हालचाली स्पष्टपणें दिसून येत.

संध्याकाळ झाली कीं परांजप्यांची नलू आपल्या बंगल्याच्या गच्चीवर येऊन उभी रहायची. संध्याकाळीं पश्चिमेकडून वाऱ्याच्या थंडगार झुळकांचा सारखा वर्षाव होत रहायचा. नलूचे केस वाऱ्यावर भुरभुरत रहायचे नि पदर फडफडत असयाचा. सतराअठरा वर्षांची होती ती. मॅट्रिक झाली होती आणि आईवडील तिच्या लग्नाच्या खटपटींत होते. कुणाची तरी वाट पहात असल्यासारखी ती रोज संध्याकाळीं गच्चींत येऊन उभी रहायची. किल्ल्याच्या तटावर येऊन राजपुत्राची वाट पहात असलेल्या राजकन्येसारखी ती मला भासायची. दूर दूर कुठंतरी घोड्याच्या टापा वाजताहेत, आणि थाड थाड करीत वेगानं धावणाऱ्या घोड्यावर स्वार होऊन एक उमदा आणि देखणा राजपुत्र जवळ जवळ येतो आहे असं वाटायचं. नलूचे निळसर स्वप्नाळू डोळे दूर कुठंतरी खिळल्यासारखे दिसायचे.

मी नलूकडे सारखी टक लावून पहायची. तिच्याकडेच माझं सगळं लक्ष लागलेलं असायचं. हळु हळु माझ्या लक्षांत आलं कीं नलू दुसरी तिसरीकडे कुठं बघत नसून इंजीनीयर वैद्यांच्या बंगल्याकडेच टक लावून बघत असे. वैद्यांचा भाचा त्यांच्याकडेच शिकायला म्हणून राहिला होता. बंगल्यांतली एक बाजूची खोली त्याला अभ्यासासाठीं म्हणून





अनुक्रमणिका

*...मग मी काय केली गंमत माहीत आहे? झोप आल्याचं सोंग केलं, एकसारखी पेंगून दाखवूं लागलें आणि पेंगतांपेंगतां अलगद अभ्यंकरांच्या खांद्यावर डोकं ठेवलं. आणि तेवढ्यांत एक आवाज कडाडला......*

---

दिलेली होती. तो कॉलेजांत शिकत होता. परीक्षा जवळ आली होती आणि त्याच्या खोलींत रात्रभर सारखा दिवा जळत असे. हें मला कसं कळलं, कारण आमची स्वयंपाकीण आईकडे रोज कुरकुर करायची 'तो मेला वैद्य बिंजिनेरांचा भाचा रात्रभर दिवा जाळतो नि माझ्या अंथरुणावर नेमका त्याच्या दिव्याचा उजेड पडतो. मला झोप येत नाहीं रात्रभर."

हळुहळु माझ्या लक्षांत आलं कीं नलू वैद्यांच्या भाच्याकडे टक लावून बघत असते, म्हणून. कधीं कधीं तर संध्याकाळची गच्चींत बसून ती मोठमोठ्यानं गाणींहि म्हणायची, 'बारा फोफावला' किंवा 'नाखवा वल्हव, वल्हव' वैद्यांच्या भाच्याच्याहि तें लक्षांत आलं असावं. कारण आपला अभ्यास सोडून तो खोलीच्या खिडकीशीं वरचेवर येऊन उभा राहूं लागला आणि खिडकीचे गज दोन्ही हातांनीं गच धरून नलूच्या नजरेंत नजर मिळविण्याचा प्रयत्न करूं लागला. मात्र मी हें दुरून पहात होतें हें त्या दोघांच्याहि लक्षांत मुळींच आलं नाहीं. त्यांचा तो नजरेचा खेळ मी वेड लागल्यासारखी टक लावून पहात बसूं लागलें. अंधार पडला तरी खालीं जायची माझी तयारी नसे. 'जेवायला वाढलंय, चल ग', आई खालून हांका मारीत सुटायची. पण इकडे नलूच्या ताना भिंगरीसारख्या फिरत असायच्या, वैद्यांचा भाचा खिडकीच्या गजांतून नाक खुपसून परांजप्यांच्या बंगल्याचा वेध घेत उभा असायचा.

पुढं काय झालं कीं नलूचं लग्न प्रोफेसर सान्यांशीं झालं. वैद्यांचा भाचा नापास झाल्यामुळें गांवाला निघून गेला आणि मी...ह्या सर्व खेळाची साक्ष झालेली मी मात्र एक नवं खूळ शिकून मागं एकटी उरलें. पण नलूवांचून, वैद्यांच्या भाच्यावांचून मला ती पूर्वी ओढून बोलावणारी गच्ची आतां सुनी सुनी भासूं लागली. पूर्वीच्या जागीं तर मला उभं राहवेना. अखेरीस मीं पूर्वीची जागा बदलली आणि 'भडभड्यां'च्या भिकार चाळीकडे तोंड करून उभी राहूं लागलें. पण भडभड्यांच्या चाळींत बघण्यासारखं कांहींच नव्हतं. ज्याचं खूळ मला लागलं होतं तें तिथं मुळीच नव्हतं. न कळणारी, सारखी अस्वस्थ करणारी जी एक दुर्दम्य ओढ आंतून शोषून घेऊं लागली होती त्या ओढीला निववणारें असें तिथं कांहींच दिसण्यासारखें नव्हतें. म्हणून मग मी शेवटी गच्चींत उभं रहायचंच सोडून दिलं. संध्याकाळ झाली, अंधार पडला तरी आपल्या खोलींत पिसाळल्यासारखी पुस्तकं वाचीत पडूं लागले. अंधार पडला तरी दिवा लावायचं भान उरत नसे. अंधारांतच अक्षरं वेंधीत बसायची. कधीं कधीं आई न राहवून खेकसायची,

"अंधारांत काय वाचतेस? डोळे बिघडले म्हणजे? ह्या वयांत चष्मा लावायची पाळी येईल. नवरा मिळणार नाहीं तेव्हां कळेल."

त्या वाक्यानं मी उसळायची. हातांतलं पुस्तक दूर भिरकावून द्यायची, आणि मानेखालच्या उशींत डोकं खुपसून धुमसत रहायची.

"चाळे चाळे करून दाखवूं नकोस. जरा शहाणपणानं वाग. कधीं अक्कल यायची आहे कुणास ठाऊक. या जन्मांत यायचं लक्षण दिसत नाहीं," आई जवळ येऊन कमरेवर दोन्ही हात ठेवून धमकवायची.

मी रागारागानं भिंतीवर डोकं आपटायची. मग आईचं डोकं भडकायचं. माझा कान धरून ती मला पलंगावरून ओढून बाहेर काढायची. मला रडूं कोसळायचं. असं वाढायचं, हा माझा अकारण छळ चाललाय. मला ह्यांतून अजून कुणीच कसं सोडवीत नाहीं.

अशीच वाचीत बसलें होतें. आईनं हांक मारली. रागारागानं पुस्तक आपटून मी स्वयंपाकघरांत आलें. "एवढा चहा बाहेर नेऊन देतेस? मी आलेंच म्हणून सांग," आई अर्धवट टाकलेल्या स्वयंपाकाकडे वळत म्हणाली. स्वयंपाकीणकाकू आज रजेवर होत्या.

"मी नाहीं. मग माझ्या हातून चहा गदळतो आणि बशींत सांडतो. मग तूं मला मारतेस," मी कुरकुरलें.

"मग शीक नीट नेऊन द्यायला. धुसफुसतेस कशाला?" आई तिचा तो हुकमी खरखरीत स्वर काढीत म्हणाली.

"कोण आलंय बाहेर?"

"ते अभ्यंकर...तुझ्या आजीकडून खाऊचा डबा घेऊन आलेत."

मी चहाचा कप घेऊन दिवाणखान्यांत आलें. अभ्यंकर वर्तमानपत्र वाचीत बसले होतें. मी त्यांच्याकडे ढुंकूनहि पाहिलं नाहीं. छोटं स्टूल त्यांच्यापुढं ओढून घेतलं. आणि त्यावर चहाचा कप ठेवून मी आंत जाऊं लागलें तों ते म्हणाले, "तूंच का उषा?"

"हो," मी मागें वळून प्रथमच त्यांच्याकडे टक लावून पाहिलं आणि एकदम थक्कलें. त्यांच्या निळसर, घाऱ्या, गूढ डोळ्यांकडे पहातच

राहिलें. पुस्तकांत वर्णन केलेलं असतं ना, तसे ते दिसत होते. गोरेपान, ऐटबाज आणि लाघवी हसणारे. तरुण होते. तरुण म्हणजे माझ्या मतें पंचवीस वर्षांचे. त्याच्याखालच्या वयांतल्या पुरुषाला तरुण म्हणायला मी त्या वेळीं तयार नव्हतें.

मी थबकलें आणि तशीच उभी राहिलें. उभ्या आयुष्यांत–म्हणजे अकरा वर्षांच्या––प्रथमच लाजावंसं वाटलं. मी गालांतल्या गालांत हसत म्हटलं, "आई कामांत आहे. येतेय्," आणि लाजणं आवरतां न आल्यानं आंत धूम ठोकली.

"आई, चहा दिला मीं त्यांना," मी आंत येऊन आईचा पदर ओढीत म्हटलं.

"बरं," आई कामांत गढली होती.

"अं...ते एकटेच बसले आहेत बाहेर."

"अग पण हें हातांतलं काम आटपूं दे. मग येतेंच मी बाहेर. तें बसतील तोंवर."

आईचं काम कांहीं आटपत नव्हतं.

मी हळूच बाहेर डोकावून आलें. अभ्यंकर वाचीत होते. पुढ्यांत चहा तसाच पडला होता. मी दडादडा धावत आंत आलें. आई खेकसलीच, "धावतीयेस काय खूळ चढल्यासारखी?"

"अग त्यांनीं अजून चहा घेतलाच नाहीं. ते तसेच वाचत बसले आहेत. तूं चल ना बाहेर," मीं तिचा पदर ओढीत म्हटलं.

"अग थांब–माझा पदर काय ओढतेस? लहान का आहेस तूं पदर ओढायला! गाढव कुठची?"

"अग पण ते चहा घेत नाहींत. तसेच बसले आहेत!"

"मग तूं सांग त्यांना. इथं कशाला घुटमळते आहेस?"

मी पुन्हा बाहेर गेलें. चहा तसाच पडला होता. मी हळूच गुणगुणलें, "अहो, चहा घ्या ना."

"आं?" अभ्यंकर वर्तमानपत्रांतून डोकं वर न काढतां म्हणाले.

पुरुष सारखे वर्तमानपत्रं कां वाचतात हें मला तेव्हां कळतच नसे. अभ्यंकरांच्या हातांतून वर्तमानपत्र खेचून घ्यावंसं वाटलं. बायकोला नवऱ्याच्या हातांतून खेचून घ्यावंसं वाटतं ना, तसं. मी धीर धरून पुन्हा म्हटलं, "चहा घ्या ना. थंड होतोय्."

"असं, असं..." अभ्यंकर हंसून म्हणाले.

अय्या! हसले किती छान. ओठांच्या दोन टोकांना दोन नाजुक वर्तुळं उठलीं त्या हंसण्याचीं.

त्यांनीं निवत आलेला चहा एका दमांत पिऊन टाकला आणि फिरून वर्तमानपत्र वाचूं लागले. मला एकदम आठवण झाली. अप्पांचं पानाचं तबक मी त्यांच्यापुढें नेऊन ठेवलं. त्यांचं माझ्याकडे लक्षच नव्हतं.

"घ्या कीं...", मी धिटाईनं म्हटलं.

"मी सुपारी खात नाहीं", ते म्हणाले अन् फिरून वाचूं लागलें.

माझ्या लक्षांत आलं कीं आलेल्या गेलेल्या पाव्हण्यांच्या पुढं करण्यासाठीं अप्पा सिगारेटचा डबा ठेवीत असत. मी पटकन् तो कपाटांतून काढला आणि अभ्यंकरांच्या पुढं धरून म्हटलं "पाहिजे?"

अभ्यंकरांनीं वर्तमानपत्रांतून डोकं बाहेर काढलं. ते फिरून हसले. ओठांच्या कोपऱ्यांवर गोडशीं वर्तुळं उमटलीं. "थँक यू मॅडम", ते म्हणाले. आणि फिरून वाचूं लागले.

काय म्हणाले ते! थँक यू मॅडम! थँ–क–यू–मॅ–ड–म–! किती छान! माझ्याशीं इंग्रजींतून असं कुणी बोललंच नव्हतं. तसं इंग्रजी मला








अनुक्रमणिका

आतां कळायला लागलं होतं. मीं गेल्या वर्षी तर 'जॅक ॲंड जिल" ही कविता पाठ केली होती.

आई अजून बाहेर आली नव्हती. अभ्यंकर वाचीत होते. मी आंत जात होतें. पुन्हा बाहेर येत होतें. पुन्हा आंत जात होतें. पुन्हा बाहेर येत होतें. धड आंत बसवत नव्हतं. धड बाहेर थांबवत नव्हतं. शेवटीं मला एक झकास युक्ति सुचली. दिवाणखान्यांतल्या फर्निचरवरली धूळ आज पुसायची राहिली होती. मी आंतून पिसांचा झाडू आणला, आणि तो खुर्च्यांवरुन, टेबलांवरुन, कपाटावरुन फिरवूं लागलें. हें सारं करतांना डोळयांच्या कोपऱ्यामधून सारखी अभ्यंकरांकडे पहात होतें. ते आपले वाचत होते. मध्येंच टेबलाला अडखळून पाय दुखावल्याचा बहाणा करीत मी 'आई ग' असं सुद्धां म्हटलं. पण छेः! अभ्यंकर माझ्याकडे बघतच नव्हते.

नेमकी तेवढ्यांतच आई बाहेर आली. माझ्याकडे रागारागानं टवकारुन पहात ती म्हणाली, "आतां कसली धूळ झटकायला घेतली आहेस! दिवाणखान्यांत पाहुणे बसले असतांना का कुणी धूळ साफ करतं?"

आईनं मला अभ्यंकरांसमोर मूर्ख ठरवलं होतं. मी दाणदाण पाय आपटीत आंत निघून गेलें. पिसांचा झाडू दिला जमिनीवर भिरकावून आणि पलंगावर अंग धाडकन् टाकून उशींत डोकं खुपसून पडलें. मला एकाएकी रडूं कोसळलं. असं मधूनमधून रडायला आलं म्हणजे मला तसं पाहिलं तर आनंदच व्हायचा. खूप खूप, पोटभर रडून घेतलं म्हणजे मला कसं छान, मोकळं वाटायचं.

बाहेर आई अभ्यंकरांशीं गप्पा मारीत होती, माहेरच्या एकेक गोष्टी विचारीत होती नि ऐकून घेत होती. मला मात्र तिथून हाकलून देण्यांत आलं होतं. मी पलंगावरुन उठलें आणि बराबरच्या गच्चीवर जाऊन उभी राहिलें—पुढच्या फाटकाकडे नजर लावून. थोड्याच वेळांत अभ्यंकर फाटकामधून बाहेर पडले. अंगांत गडद निळा कोट, स्वच्छ, इस्त्रीचा पायजमा—आणि हें सगळं शोभून दिसणारी त्यांची उंच नि रुंद आकृति हळु हळु नजरेपार गेली. मी सारखी टक लावून पहात राहिलें. ते निघून गेले तरी त्या दिशेकडे पहात राहिलें. ते गेल्याच्या जाणीवेनं पुन्हा रडूं कोसळलं. आतां फिरुन अभ्यंकर आलेच नाहींत तर...

पण तसं झालं नाहीं. लौकरच ते आले. ह्यावेळीं ते पापड आणि सांडगे घेऊन आले होते. अप्पा घरांत होते. अप्पांची आणि अभ्यंकरांची पहिल्याच भेटींत गट्टी जमलेली दिसली. अभ्यंकर आले आणि दिवाणखान्यांत अप्पांशीं बोलूं लागले तेव्हां मी आंतमध्यें होतें. त्यांचा आवाज मीं अचूक ओळखला. एकाएकीं मला आनंदाचं भरतं आलं. मी दडादडा धावतच दिवाणखान्यांत आलें. अभ्यंकरांनीं माझ्याकडे नुसता एक दृष्टिक्षेप टाकला. अगदीं सामान्य दृष्टिक्षेप–सहज खुर्चीकडे किंवा टेबलाकडे बघावं तसा. आणि ते फिरुन अप्पांशीं बोलण्यांत गर्क झाले. मी खट्टू होऊन आंत आलें. मग माझ्या दिवाण-खान्यांतून कितीक फेऱ्या झाल्या. पण अभ्यंकर माझ्याशीं कांहींच बोलले नाहींत. माझ्या फेऱ्या लक्षांत येऊन शेवटीं अप्पासुद्धां म्हणाले, "कांहीं हवंय् का उषा तुला? तुझं काय चाललं आहे हें मघापासून–इकडून तिकडे आणि तिकडून इकडे?"

मीं लाजून मानं खालीं घातली आणि आंत पळालें. अप्पा तरी कमालच करतात! अभ्यंकरांसमोर असं का बोलायचं? आतां त्यांना समजलं म्हणजे? पण अभ्यंकरांना कांहींच समजल्याचं दिसलं नव्हतं. मी





अनुक्रमणिका

चहा घेऊन बाहेर आलें तेव्हां ते माझ्याकडे बोलले नाहींत कीं धडपणीं त्यांनीं मला पाहिलंहे नाहीं. त्यांचं तें वर्तुळं उठवणारं नाजुक हास्य पहायला मिळावं म्हणून मी तिथें किती तरी वेळ रेंगाळलें, पण छे; अप्पांशीं राजकारणावर काथ्याकूट करण्यांत ते अगदीं गढून गेले होते.

—आणि मग अचानक माझ्या लक्षांत आलं कीं अभ्यंकर माझ्याकडे बघायला कां तयार नव्हते तें. मी लहान असल्याबद्दल—मी तरुण नसल्याबद्दल त्या क्षणीं मला स्वतःचा असा राग आला म्हणून सांगूं. तरीपण मला एक युक्ति सुचली. मी चटकन् आरशासमोर होऊन पुन्हा वेणी घट्ट घातली आणि आईचे आकडे घेऊन वेणीचं चक्करडं घातलं. कपाट उघडून आईनं माझ्यासाठीं घेऊन ठेवलेल्या साड्यांपैकीं निळ्या रंगाची साडी नेसायला काढली. निळा रंग मला 'लकी' आहे असं आईच एकदां म्हणाली होती. भराभर साडी नेसून मी आईपुढें उभी राहिलें.

"काय ग? साडी नेसून कुठं चाललीस!" आईनं विचारलं.

"शकीकडे जाऊन येतें. आम्ही दोघीजणींनीं आज सारखी सारखी साडी नेसायचं ठरवलं आहे," मीं धीर धरून पहिल्यांदा खोटं बोलण्याचा प्रयत्न केला.

मान खालीं घालून, दातांमध्यें बोट अडकवून, तिरपे कटाक्ष टाकीत मी दिवाणखान्यांत आलें. पण अभ्यंकर तिथं नव्हते. ते इतक्या अवधींतच निघून गेले होते. 'थँक यू मॅडम' मला त्यांच्या तोंडचे ते शब्द परत ऐकायचे होते. मी 'मॅडम' बनून आलें आणि ते मात्र तिथें नव्हते.

त्यानंतर अभ्यंकर अचानक येतील आणि मी साडीमध्यें नसलें तर ते माझ्याकडे बघणार नाहींत, माझ्याशीं बोलणार नाहींत म्हणून मी रोज संध्याकाळीं साडी नेसुन आणि वेणीचें चक्कर घालून बसूं लागलें. पण अभ्यंकर संध्याकाळचे पुन्हा कधीं आलेच नाहींत.

ते आले नाहींत खरे, पण मी साडी नेसलेली असतांना त्यांनीं मला पहावं ही माझी इच्छा मात्र सफल झाली ती मावशीच्या नंदूच्या मुंजींत. नंदूच्या मुंजींत आईचा निळा बनारसी शालू आणि निळें रेशमी खणाचें पोलकें घालून मी जमलेल्या मंडळींना अत्तर लावीत फिरत होतें. साडी चहूबाजूंनं फुगली होती अन् मला तो बोंगा आवरतां आवरत नव्हता. मध्येंच पदर घसरत होता तर मध्येंच काठ पायांत अडकत होते....अन् मी हौसेनं नुसती फुलून फुलून मंडपांत मिरवीत होतें. माझ्या साडींतच मी गुंगलें होतें आणि लोकांकडे माझं लक्षच नव्हतं.

....कुणाला तरी मी अत्तर लावलं...कुणीतरी हंसत हंसत म्हणालं, "थँक यू मॅडम"....मी दचकून वर पाहिलं. माझ्या डोळ्यांवर माझा विश्वासच बसेना. अय्या! अभ्यंकरच की हे. रेशमी नेहरू सदरा पहेनून ऐटींत एका खुर्चीवर बसले होते, पायावर पायाची आढी टाकून अन् दोन्ही हातांच्या पकडीत वरचा गुडघा दाबून. मी हंसलें, हंसलें, इतकी हंसलें कीं खिदळतच सुटलें. खिदळतां खिदळतां मला ठसका लागला नि माझा जीव घाबरा झाला. मी लाजून तिथून जी धूम ठोकली ती थेट आई फराळाचं बशांतून काढीत होती तिथं येऊन पोचलें. आंतल्या खोलींत कांहीं खास निवडक मंडळींना नि नातेवाईकांना फराळ देण्यांत येत होता. माझ्या डोक्यांत एक कल्पना डोकावली. पायांतल्या साखळ्या छुमकवीत मी चटकन बाहेर आलें. उजव्या खांद्यावरुन पदर गुंडाळून घेत मी विनयानं अभ्यंकरांजवळ येऊन उभी राहिलें आणि त्यांना हळूंच म्हटलं, "येतां का आंत फराळाला?"

अभ्यंकर कुणाशीं तरी रंगांत येऊन बोलत होते. त्यांनीं माझ्याकडे लक्षच दिलं नाहीं.

"अहो...," मी धीर करून पुन्हा हांक मारली, "आंतमध्यें फराळाला बोलावलंय् तुम्हाला."

"कुणाला? मला?" अभ्यंकर हसून म्हणाले. ओठांच्या दोन कोपऱ्यांना स्मिताची नाजुक वर्तुळं उमटलीं.

"मग काय तर!" मी आईसारखी ठसक्यांत बोललें.

"पण माझा फराळ तर मघाच झालाय." अभ्यंकर पुन्हा गप्पांमध्यें गढून गेले.

—आणि मग मात्र मी खूप घाबरलें. दाण्याजवळ चोच आणतांच कुणाचं तरी पाऊल वाजावं अन् चिमणीनं भिरभिरत दूर निघून जावं तशी अभ्यंकरांपासून दूर पळालें.

मुंज लागली, जेवणं आटोपलीं तरी माझ्या छातींतली धडधड संपेचना. मंडपांतली गर्दी पांगली तेव्हां माझ्या लक्षांत आलं कीं एका कोपऱ्यांत समोरासमोर खुर्च्या टाकून अप्पा आणि अभ्यंकर रंगांत येऊन एकमेकांशीं गप्पा करताहेत. घरीं जायची वेळ झालीच होती. मग काय गंमत झाली माहीत आहे, मामांच्या गाडींतून आम्ही घरीं जावयास निघालों तेव्हां अभ्यंकरहि त्याच गाडींत येऊन बसले. आई आणि अप्पा मागं बसलें होतें. दुसरीहि कोणी मंडळी होती. पुढं ड्रायव्हरशेजारीं मी आणि आणखी कांहीं मुलं बसलों होतों. मी कडेला दरवाज्यापाशीं बसलें होतें. अभ्यंकरांनीं तोच दरवाजा उघडला आणि ते हसत म्हणाले, "तिकडं जरा सरकून घ्या मॅडम." मी सरकतांच ते म्हणाले, "थँक यू, मॅडम."

अभ्यंकर शेजारीं येऊन बसले ना, तेव्हां मला इतका आनंद झाला कीं रडूंच आवरे ना. सारखी मी पदरानं डोळे चोळूं लागलें. मला वाटलं अभ्यंकर एकदां तरी म्हणतील, "काय झालं हो मॅडम?" पण अभ्यंकर मागें वळून वळून अप्पांशींच बोलत होते. मग मीं काय केली गंमत माहीत आहे? झोप आल्याचं सोंग केलं, एकसारखी पेंगून दाखवूं लागलें आणि पेंगतां पेंगतां अलगद अभ्यंकरांच्या खांद्यावर डोकं ठेवलं.

तेवढ्यांत आई मागून ओरडलीच, "उषा, झोपतेस कसली ग कार्टे एवढ्यांतच? पडशील कीं त्यांच्या अंगावर."

मी दचकून जागी झाल्यासारखं दाखवलं. अभ्यंकर हसून म्हणाले, "झोपूं द्या हो तिला, लहान मुलाला वाऱ्यावर चटकन झोप लागते."

मी लहान मूल काय? मी इतकी संतापलें...इतकी संतापलें कीं असं वाटलं अभ्यंकरांचा पंजा दोन्ही हातांत धरावा नि कडकडून चावा घ्यावा. तेवढ्यांत अभ्यंकरांचं उतरायचं ठिकाण आलं नि अप्पांचा निरोप घेऊन ते उतरले. जातांना त्यांनीं माझ्याकडे ढुंकून सुद्धां बघितलं नाहीं. गाडी सुरू होतांच अप्पा आईला म्हणाले, "अग, अभ्यंकरचं लग्न ठरलंय् म्हणे."

"अगबाई, कुणाशीं?" (कुणाचंहि लग्न ठरल्याची बातमी कानीं पडली म्हणजे आई उगीचच किंचाळून आनंदांत अशी विचारायची.)

"मुलीचं नांव माहीत नाहीं. पण आंतर्जातीय विवाह आहे म्हणतात. प्रेमविवाह म्हणे!"

अप्पा तसं म्हणाले आणि मी ओठ घट्ट आवळून घेतले. नाहीं म्हटलं तरी डोळ्यांत दोन कढत थेंब दाटून आलेच. उगीचच मी स्वतःशीं पुटपुटलें, "थँक यू मॅडम." बस्स, तेवढंच! पुन्हा कधीं उच्चारले नाहींत ते शब्द—

अनुक्रमणिका



# अस्मितेचें आनंद सोहळे

## तेजस्विनी सिंधु

भारतभू ही भगवंताची लाडकी आहे म्हणूनच तिला सिंधूचें वरदान लाभलें. आलेखलेखनांत परमेश्वराला परिपूर्णता आल्यावरच भारताचा आलेख घडला. विश्वाचा सारा तोल भारता-भोंवतीं सांभाळला गेला आहे. आणि हा तोल समतोल रहावा म्हणून जगदाधार अशा हिमनगानें सिंधु आणि ब्रह्मपुत्रेच्या रूपानें आपल्या दोन्ही हातांनीं भारताला हृदयाशीं कवळून धरिलें आहे.

सिंधूचा उगम तिबेटांतला. भारतभू धन्य व्हावयाची नसती तर, इतके अडसर ओलांडून इतकें अंतर तोडून, इतकीं आडवळणें घेऊन ती भारताकडे कशी वळती? पान्हा अनावर झाल्यावर अडचणींचीं कवाडें ओलांडून गाय हंबरत जावी, हिरकणी माय बुरुजांची उंची थिटी करुन कडे लंघण्यास समर्थ व्हावी, तशी सिंधु साऱ्या अडचणी ओलांडून आपल्या स्तन्याची धार उधळीत भारताकडे धांवली. कैलासाच्या मानसांतून सिंधूच्या रूपानें स्रवलेली प्रीतिधारा कैलासाच्या लेकरांकडे यावी हेंच समुचित होतें.

जगाच्या इतिहासांत कुठच्याहि जलौघा-कडून न घडलेलें कार्य सिंधूकडून घडावयाचें होतें. विश्वाला चिरकाल वंद्य होणारी संस्कृति तिच्या कुशींत जन्मावयाची होती. दोन परस्पर-विरोधी प्रबल संस्कृतींच्या संघर्षांतून जन्मलेली ही नवसंस्कृति, सर्वसंग्राहक, परमसहिष्णु आणि उदात्त अशी होती. श्रीरामचंद्रांचा पिंड कौसल्येचीच कूसच धरूं शकते. भगवान श्रीकृ-ष्णास यशोदाच जन्म देते. हें येरा कंगालांचें काम नव्हे. उदात्ततेमुळें जगद्वंद्य होणारी जी संस्कृति भारतांत जन्मणार होती तिचा पिंड धरावयास उदात्त असाच गर्भकोप हवा होता. हें ऐतिहासिक कार्य घडण्यासाठींच भारताला सिंधूचें वरदान लाभलें. हें वरदान सफल करतांना सिंधूनें आर्यांना पचवून टाकलें आणि हिंदूंना जन्म दिला.

उत्तर ध्रुवावर जन्म पावलेली आर्य जात प्रगतीचा मार्ग आक्रमीत होती. तिला आपल्या नग्नतेची जाणीव होऊन हजारों वर्षें लोटलीं होतीं. स्त्री आणि पुरुष हें नातें पिता पुत्री, पति पत्नी, भाऊ बहीण अशा नात्यांत परिणत झालें होतें. स्त्रीच्या लैंगिक सामर्थ्यावर आधारलेली समाजाची घडी विसकटून, पुरु-षाच्या दंडबळावर नवी घडी आधारित होत होती. दांत आणि नखें यांचीं हत्यारें म्हणून असणारी एकमेवता लोपून धातूंचीं हत्यारें घडूं लागलीं होतीं. अमर्याद बर्फापेक्षां कांहीं तरी अधिक ईश्वरानें निर्मिलें आहे आणि श्वेत अभ्रलांहून कांहीं तरी अधिक प्रेय जगामध्यें आहे, अशा ज्ञानांतून सुरू झालेलें आर्यांचें संक्रमण हें शैत्यांतून उबेकडे, अंधारांतून प्रका-शाकडे आणि स्थितीकडून प्रगतीकडे चालू होतें.

सहस्रों वर्षांच्या अकुंठित प्रगतींतून आर्यांना श्रेष्ठत्वाची जाणीव झाली. आत्मविश्वास वाढला. ‘कृण्वंतो विश्वमार्यम्’ हें घोषवाक्य झालें. ही घोषणा इराण आणि गांधार यांना निनादवीत कुभा (काबूल) नदीवरून घरंगळत अटकेपर्यंत येऊन पोचली आणि इथें तिला अटक पडली. ही अटक सामर्थ्याची नसून उदात्ततेची होती, भव्यतेची होती; पराक्रमाची नसून प्रेमाची होती. जणु ईश्वरानें आपला आशीर्वाददाता कर वाटेंत आडवा घालून, इथेंच थांबा असा आदेश दिला होता. यात्रिकाची यात्रा विश्वेश्वराच्या चरणीं संपावी; वारकऱ्यांची ओढ पंढरीच्या दर्शनानें तृप्त व्हावी; मुमुक्षूला साक्षात्कारांत शांति लाभावी; तसें आर्यांना सिंधूच्या दर्शनानें झालें. पांच पांच मैल रुंद असें सिंधूचें पात्र पाहून थक्क झालेल्या आर्यांनीं आपल्या भाषेंतील सर्वश्रेष्ठ जलौघाला नियोजित असा शब्द जो सिंधु त्यानें सिंधूचें नामकरण केलें. थक्क झालेल्या वृत्तींतून गतीला कुंठितता आली. जिथें गमनागमनाला विराम पावतो तें परमधाम हेंच अशी तृप्ति लाभली. इतर भूमि ओलांडून पुढें आलेला आर्यांचा ओघ इथें स्थिरावला. स्थायी झाला.

ही घटना साधीसुधी नव्हती. सिंधूच्या दर्शनानें आर्यांच्या भ्रमणांत पडलेला खंड ही एक क्रान्ति होती. सिंधु आणि तिच्या उपनद्या यांनीं निर्मिलेल्या सुवर्तेत आर्यांचें मन स्थिरावलें तेव्हां त्यांचें जीवन आमूलाग्र बदलून गेलें.

— आनन्द साधले

“जिंका, लुटा–पुढें चला.” ही दिशा बदलून “राखा, जोपासा, सुखशांतीनें उपभोगा” ही दिशा मिळाली. समन्वय आला; सहकार आला. संकरहि आला. साऱ्यांनीं कष्टावें, साऱ्यांनीं खावें इथपर्यंत आलेली प्रगति विस्तारली. श्रमविभाग आला. चातुर्वर्ण्य आलें; राजसंस्था आली. पुरोहितसंस्था आली. कालपरवांपर्यंत हिंदुसमाज म्हणून जें कांहीं होतें त्याची रूपरेखा यावेळीं सिंधूच्या गर्भांतून प्रकटली. आर्यांनीं सिंधु ओलांडली ती हिंदू म्हणून ओलांडली. त्रिभुवनांत जें

अनुक्रमणिका

सर्वश्रेष्ठ, जें मनोरम, जें उदात्त तें सारें इथें आहे, असा साक्षात्कार आर्यांना सिंधूनें घडविला. आर्यांना भारतांत थोपवावें, चिरस्थायी करावें, भारताचा इतिहास घडवावा, संस्कृति आकारावी असें सामर्थ्य सिंधूंत होतें. भारताची अजिंक्य आणि अतुलनीय संस्कृति घडविणारी म्हणून सिंधूला विश्वाच्या इतिहासांत अतुलनीय स्थान आहे. नसेल तिच्या पाण्यांत यमुनेचा विलास, नसेल तिच्या पाण्यांत गंगेचें पापविनाशक सामर्थ्य, पर्णविलास भोगावयास वा पापें करावयास जो समाज हवा त्याची संस्कृति घडविण्याचें बळ सिंधूचें आहे. त्यामुळें भारतास आदरणीय अशा सप्तसिंधूंत ती अग्रगण्य झाली आहे. काशी आणि प्रयागाची घडण तिच्या तीरीं न झाली, तरी सर्व तीर्थेंच जिथें विराम पावतात त्या ईश्वराच्या विशालत्वाची कल्पना देणारा जो सागर तोच माउली सिंधूशीं एकरूप आहे.

# विलासिनी यमुना

गंगा आणि यमुना या सख्या बहिणी. एक तपस्विनी तर एक विलासिनी. गंगा ही लोकसेवा करीत, तप आचरीत आपला मार्ग क्रमिते तर यमुना ही राजविलास भोगीत पुढें जाते.

यमुना जन्म घेते तीच मुळीं तालेवारींत. उन्हाळें उसळत आहे आणि त्यानें बर्फ वितळून त्याचा प्रवाह घडत आहे असा यमुनेचा उगम. आतां रुसली तर आतां हसली अशा लहरी राजकन्येप्रमाणें ही क्षणांत हिमशीत तर क्षणांत बाष्पोष्म. लाडक्या लेकीचे हे सारे चोचले बाप अविरत पुरवीत असतो. अशा वातावरणांत वाढलेली यमुना तालेवार न झाली तरच नवल !

गंगेच्या पाण्यावर हरिद्वार, प्रयाग, बनारस, बेलूर अशीं क्षेत्रें पुष्ट झालीं तर यमुनेच्या पाण्यांतून हस्तिनापुर, दिल्ली, आग्रा, मथुरा अशीं राजविलासी शहरें उदयास आलीं. गंगेच्या परिसरांत वेदमंत्र गाइले गेले तर यमुनेचा परिसर, गोपगोपींचीं रासगीतें, अनारकलीचे प्रीतिनिश्वास आणि अर्झुमंदबानूचे कामसीत्कार यांनीं मुखर झाला. सतारीच्या ताराझंकारांमधून स्वरमेघांवर स्वरमेघ उधळावें तशीं यमुनेच्या तरंगातरंगांतून विलासविभवें विस्तारलीं. यमुनातीरावर असा कुठें एकांत नाहीं कीं जिथें प्रणयी युगुलांचे गळ्यांत गळे आणि ओठांत ओठ गुंतलेले नाहींत. यमुनेच्या परिसरांत जाण्याचीच खोटी. तत्क्षणीं मुरलीचे स्वर कानांत घुमूं लागतात. प्रेमिकांच्या विरहातुर आर्त हांका हृदय चिरीत वातावरणांत विरतात. वर्तमान विसरतें आणि भूतकाल उगवतो. कामिनीच्या चरणांतील नूपुरांचे झणत्कार कानीं पडतात. धसमुसळेपणें कुंजापलीकडे जावयास मन धजत नाहीं कारण त्या कुंजाआड कुणाची तरी कामसमाधी लागली असणार याची जाणीव होते. यमुनाजलाचा घोट घ्यावयास जावें तर त्याला कामिनींच्या कस्तुरीलेपाचा सुगंध येतो. त्यांच्या अधराचे गुलाबी रंग त्या जलांत बिंबित झालेले दिसतात. पानापानांच्या आणि लाटालाटांच्या सळसळीमधून, कामिकांच्या चाटुक्ती कानांत अमृत संवेदना ओततात. हे वसंताचे, हे हिंडोलाचे तर हे जयजयवंतीचे स्वर तनू रोमांचित करीत हेलावतात. तीं कमलदलांचीं शयनें, ते जातिलतांचे कुंज, ते छायाबहुल कदंब पुढें दिसतात. घळून पडलेलीं उत्तरीयें, ओघळलेले मुखराग, वेणींतील विस्कटलेलीं फुलें आणि विगललेल्या मेखला पायीं पायीं गुंतून गति रोखतात. आसमंताचा विसर पडून ओढाळ मन आतुरतें, मोहरतें. पुढें चांदणें फुलतें. यमुनेच्या डोहांत, मृदुमृदुल मखमलीच्या आस्तरणांनीं सुखद झालेली क्रीडानौका दिसूं लागते, आणि तींतील परांच्या शयनांत लोळणाऱ्या कामिनीच्या मृणालकोमल ओठांतून, खुर्रमच्या आलिंगनाच्या आवेगांतून जाणवणाऱ्या सुखद वेदनांतून स्फुरणारे कामतृप्तीचे सीत्कार इंद्रधनुष्यावर आरोहून मन व्याकुळ करीत करीत ताजमहालाच्या रूपानें ईश्वरी साक्षात्कार घडविणाऱ्या उदात्ततेप्रत उंचावतात. प्रणय ही ईश्वरी किमया आहे आणि प्रणयपूर्तीचा ब्रह्मानंद हा ईश्वरी साक्षात्काराएवढाच उंच आहे हें सांगत ताजमहालचें स्वप्न साकार होतें.

अशा तऱ्हेचे विलास भोगणारी यमुना ते विलास आपल्या अंगाला लावून घेते. ती सुखांगिनी प्रमदा बनते. तिच्या अंगांगांतून वैभवें ओथंबतात. ती पुष्ट नितंबिनी, घनस्तनी आणि अलसगमना बनते. मी धन्य. मी तृप्त. मग काय कमी, हाच एक विचार तिच्या मनांत असतो आणि अशी ती प्रयागपर्यंत येतांच तिला फार दिवस वेगळ्या मार्गानें दुरावलेल्या गंगेचें दर्शन होतें आणि एक नवा साक्षात्कार होतो.

या साक्षात्कारामध्यें भारतांतील जीवनमूल्याचा गाभा समूर्त झाला आहे. भारतीय जीवनाची पूर्तता गंगायमुना संगमाचें दर्शन घेतल्याशिवाय होत नाहीं. भारतीय अध्ययनाची सांगता या संगमाच्या तीर्थयात्रेनेंच होते. धनसंपत्ति, भोगविलास यांनीं जीवन कितीहि संपन्न असलें तरी ही राजस संपत्ती सात्विक संपत्तीच्या तेजापुढें फिकीच पडते. तपोतेजापुढें राजतेज उणें होय. श्रीराम अयोध्यानाथ असला तरी वसिष्ठापुढें नतमस्तक होतो. देवांच्याहि सभेचें अध्यक्षपद वेदमूर्ति ऋषीला मिळतें मग तो बालवयी असो वा कुरूप असो. विद्वानाशीं भेट झाली असतां राजा त्याला प्रथम मार्ग करून देतो. ज्या जीवनमूल्यांमुळें आणि विचारधारणेमुळें ही गोष्ट घडते ती विचारधारा गंगायमुना-संगमांत साकार झाली आहे. विलाससुंदरा यमुना जेव्हां तपःसुंदरा गंगेच्या पुढ्यांत येते तेव्हां एकदम थबकते. आपलें वैभव जरी कितीहि अमोल असलें; प्रत्यक्ष श्रीकृष्ण जरी आपल्या उदरांत नीलवर्णानें वास करीत असला; साकार प्रणय ताजमहालाच्या रूपानें रतीचें स्वप्न आपल्या कडेवर सत्य करीत असला, जगजेत्या साम्राज्यांचे अलंकार जरी आपल्या अंगाखांद्यावर असले तरी तपःपुनीत अशा धवलवसना गंगेपुढें आपण विनम्र व्हावयास हवें हें जाणून यमुना थबकते. गंगेचें इकडे लक्षच नसतें. निःस्पृहस्य तृणं जगत् या न्यायानें, यमुनेनें आणलेल्या भुवनभांडारतुल्य करभाराकडे लक्षहि न देतां गंगा आपलें तपज्ज्वलित जीवन जगत पुढें निघून जाते. सुसंस्कृत यमुना यांत अपमान मानीत नाहीं. तपस्विनीच्या शुभचरणांवर कुलांगनेनें अर्घ्य द्यावें त्याप्रमाणें ती आपल्या अथांग जलाचें गंगेच्या चरणीं आदरांजलींनीं समर्पण करते. आपलें सर्वस्व गंगार्पण करून आपलें जीवन तिच्या जीवनधारेंत मिळवून देते.

या विश्वांत सारें क्षणभंगुर आहे असें म्हणतात. तें खरें कसें मानावें? गंगायमुना संगमाचें उदात्त ईश्वरी सौंदर्य आपला साक्षात्कार घडवीत युगानुयुगें थाटलें आहे आणि पुढेंहि युगानुयुगें थाटणार आहे. तें चिरंतन आहे.








# तपस्विनी गंगा

गंगा ही आपली माउली आहे. आई हा शब्द ऐकतांच आपल्या मनांत जें भावनांचें भरतें येतें त्याहून कांकणभर अधिकच उफाळ आपल्या भावनांना गंगा हा शब्द ऐकून येतो. अशी भाग्यवती गंगा ही भारतीय संस्कृतीचें सर्वांत रम्य आश्चर्य आहे. गंगा हा शब्द ऐकतांच तिच्या दर्शनाची ओढ उत्पन्न होते. तिच्या ओघवान स्रोताचें दर्शन व्हावें, तिच्या पुण्यपावन प्रवाहांत स्नान घडावें, निदान जीवनमुक्ति देणाऱ्या तिच्या जलाचा एक तरी थेंब तोंडांत पडावा हीच जीवनाची इतिकर्तव्यता ठरवून भारतांतील अनेक पिढ्यांनीं आपलें भावनिष्ठ जीवन संपविलें आहे. असल्या जागीं स्नान करतांना गंगाप्रेमानें उचंबळून त्यांच्या मुखांतून जेव्हां "गंगेऽगंगेऽ" अशा भावकरुण आर्त हांका स्फुरल्या आहेत तेव्हां दुरावलेल्या गाईसाठीं हंबर घालणाऱ्या वत्साच्या स्वरांतील आर्तता तेथें मूर्त झालेली आहे.

गंगेनें आपल्या मनावर ही जी ओढ घातली आहे ती उगाच नाहीं. जन्मदात्री माय ही काय हीय अशा वत्सलतेनें, गंगेनें, आपल्या मायेनें उभारलेल्या कुशींत पिढ्यानपिढ्या भारतीय अस्मितेला आश्रय दिलेला आहे. जे रंजले गांजले असतील त्यांच्या जीवनभरल्या दुःखांना क्षणांत ओसर पडावा असें सामर्थ्य गंगेच्या मायेच्या स्पर्शांत आहे. गंगा ही जणुं मातेची माया. प्रभूची मूर्त करुणा. जिवंतपणीं हिची भेट घडली नाहीं तर निदान मृत्यूनंतर हरिद्वारला हिच्या कुशीत निद्रा यावी हीच आपली तळमळ. दुःखाचें सुख, पापाचें पुण्य नरकाचा स्वर्ग करण्याची किमया या माउलीच्या स्पर्शांत आहे. गंगेच्या शीतल स्पर्शांत राव आणि रंक यांना एकाच उबेची प्राप्ति होते. परमेश्वराची कृपा अशी गंगा त्याला स्वर्गांत सोडून खालीं उतरली तेव्हां देवांचें देवपण संपलें, स्वर्गाचा सहारा झाला आणि भारताचें नंदनवन झालें.

गंगेचा भूतलावर अवतार झाला तो दयेच्या पोटींच झाला. हिमालयावर उगम पावून तिबेटच्या देवभूमींत हुंदडणाऱ्या या गिरिकन्येसमोर प्रयत्नांचें धरणें धरून, रघूच्या जनकल्याणनिरत पूर्वजांनीं, पिढ्यान् पिढ्या तपस्या केली; भारतांतील आर्यांचें जीवन समृद्ध आणि पावन करण्यासाठीं गंगेच्या पायवाटेवर आपल्या जीविताच्या पायघड्या घालून तिचा मार्ग वळवून घेतला; तेव्हां त्यांच्या निरलस तपस्येनें प्रसन्न झालेली गंगा आपली देवलोकांतील सुखाची मिरास सोडून हिमालयाखालीं उतरण्यास तयार झाली. रघूच्या पूर्वजांची आराधना इतकी दांडगी होती कीं त्यांच्यावर प्रसन्न झालेली गंगा आज शेंकडों पिढ्या उलटल्यावरहि आम्हां राघवांवर आजहि प्रसन्न आहे. दीनांचा उद्धार आणि दुःखांचा परिहार करण्याचें आपलें व्रत ती अविरत चालवीत आहे. देवभूमींतील अप्सरा असतांना तिची जीवननिष्ठा काय होती नकळे. भारतभूंत आल्यावर लोककल्याण हीच तिची जीवननिष्ठा झाली. मातृत्व प्राप्त होतांच विभ्रम लोपून वात्सल्याचें वैभव फुलारावें त्याप्रमाणें लोकमाता म्हणून भारतांत आगमन केल्यावर जो वात्सल्याचा पूर गंगेच्या हृदयांत उचंबळला त्याला अजून ही ओसर पडलेला नाहीं. पुढेंहि कधीं पडण्याचा संभव नाहीं.

लेकुरवाळीला क्षणाची उसंत नसावी तसें गंगेचें दर्शन कुठेंहि घडतें तें घाईघाईंत. कर्तृत्ववान पुण्याईचा गंगेचा एवढा प्रचंड ओघ! पण दीनांच्या दुःखांवर फुंकर घालण्याचें कामहि इतकें अफाट आहे कीं त्यापुढें आपली उदंड पुण्याईहि गंगेला अपुरीच वाटावी. कालाच्या अनंत प्रवाहांतील क्षणन् क्षण ती आपल्या अथांग प्रवाहांतील थेंबाथेंबानें दुःखितांच्या दग्ध मनावर शैत्याची फुंकर घालीत चालली आहे. तिला क्षणाचीहि उसंत नाहीं. यमुनेच्या भेटींत तिला क्षणभर बोलायलाहि, वेळ नाहीं तो यामुळेंच. जातां जातां एक कटाक्षच काय तो ती टाकूं शकते. आपल्या कन्येचें उदात्त गंभीर तपोजीवन जवळून पाहावें म्हणून प्रत्यक्ष कैलासनाथ विश्वेश्वर काशीला येतो तर पित्याचीं पवित्र पाउलें पूजावयास लागेल तेवढाच क्षणभर वेळ घेऊन गंगा दुःख निवारण्याचें व्रत चालविण्यास पुढें निघून जाते.

तिला क्षणाचा विसावा मिळतो तो कोणी पातकी कळवळ्यानें तिला हांक मारून तिच्या कुशींत शिरतो तेव्हां. त्याच्या पाठीवर हात फिरवून त्याचें दुःख निवारण व्हावें एवढा वेळ ती तेथें थांबते. कुंतीनें आपलें पाप चर्मण्वती हातीं तिच्याकडे धाडलें तेव्हां त्या पापाला छातीशीं धरून गंगेनें त्याला पावन केलें आणि भारतभूषण अशा कर्णांत त्याला उत्क्रांत केलें. जगन्नाथपंडितानें भवतापाच्या आंचेनें कांचावून तिला आर्त हांका मारावयास आरंभ केला तेव्हां अशीच ती क्षणभर थांबली आणि तिनें जगन्नाथास शांति दिली. अशा कोटिकोटि दुःखी जीवांचें दुःखनिवारण करावयास लागेल तेवढाच वेळ या माउलीला विश्रांति.





अनुक्रमणिका

लगबगीनें चालणाऱ्या गंगेच्या श्वासांतून जें संगीत प्रतिक्षणीं आसमंत कोंदीत असतें त्याचें उदात्त चित्र सातशें वर्षांपूर्वीं प्रकटलेल्या एका थोर संताच्या वाणींत पडलेलें दिसून येतें.

"हे प्रभू, तुझ्या कृपेची धार माझ्या जीवनांत प्रकटूं दे. तुझ्या कृपेनें माझ्या हातून द्वेषाचें प्रीतींत रूपांतर घडूं दे; घाव असेल तेथें फुंकर पडूं दे; शंका असेल तेथें श्रद्धा फुलूं दे; अंधारांतून प्रकाश उजळूं दे; दुःखांतून आनंद प्रकटूं दे.

"हे प्रभू, माझें सान्त्वन कोण करील अशा विवंचनेंत घालवावयास मला वेळ न मिळतां मला दुसऱ्याचें सान्त्वन करूं दे. माझें मन कोण समजून घेईल याची फिकीर न करतां मला दुसऱ्याचें मन समजून घेऊं दे. माझ्यावर प्रीति कोण करतो त्याचा हिशेब न ठेवतां मला जगावर प्रेम करूं दे.

"हे प्रभू, सर्वस्वाचें दान माझ्याकडून घडून त्यांतून मला प्रीतीचें दान लाभूं दे. माझें जीवन क्षमाशील घडून त्यांतून मला तुझ्या क्षमेचें दर्शन घडूं दे. माझ्या शेवटच्या श्वासांतून माझें चिरजीवन उमलूं दे."

## शुभांगिनी सरस्वती

महाभारतानें सरस्वतीला अतिशुभा असें म्हटलेलें आहे. नुसतें शुभा हेंच विशेषण कोणाहि नदीला तीर्थरूप द्यावयास समर्थ आहे. सरस्वती ही अतिशुभा असल्यानें ती तीर्थांचेंहि शुभातीर्थ झाली तर त्यांत नवल नाहीं.

अशी ही शुभांगिनी परमपावन सरिता गुप्त आहे. तिचें दर्शन चर्मचक्षूंना होत नाहीं. कारण तिची उत्पत्ति सामान्य नदीप्रमाणें कुठच्या दगडामातीच्या पर्वतापासून झालेली नाहीं. ज्याचें रासायनिक पृथक्करण करतां येईल असें पाणी तिच्या प्रवाहांतून वहात नाहीं. ज्याचा आलेख करतां येईल असें तिचें पात्र नाहीं. तिचा उगम ज्ञानाचें अधिष्ठान वेदमूर्ति ब्रह्मदेव याच्या श्वासांतून झालेला आहे. याज्ञवल्क्यानें चिंतन केल्यावर ती ॐकाराला पुढें ठेवून स्वर आणि व्यंजनें यांच्या निनादांनीं मुखरित अशा लाटांनीं प्रवाहित झाली आहे. मति, स्मृति, प्रज्ञा, मेधा, बुद्धि आणि वाणी यांनीं आकारलेल्या मुर्तींतून ती प्रकट झाली आहे. तिच्यांतील जल हें वाङ्मय आहे.

ज्ञानाच्या कक्षा जेव्हां मर्यादित होत्या तेव्हां आध्यात्मिक जिज्ञासेचें समाधान निसर्गचमत्कारांचीं स्तोत्रें गाऊन होत होतें. पण जीवनास स्थिरता आल्यावर आध्यात्मिक अतृप्ति वाढीस लागली. एक सद्विप्राः बहुधा वदन्ति अशा तऱ्हेचे जे अस्फुट विचार पुरातन ऋषींनी मांडले होते त्यांच्या अर्थाचा वेध लागूं लागला. कोऽहं ? हा प्रश्न जाचक होऊं लागला. कार्पासधवल दाढीमिशा आणि आतुर जिज्ञासा यांत अविरत ज्ञानचर्चा घडूं लागल्या. उपनिषदांचीं ज्ञानगंधानें धुंडाळलेलीं उपवनें जागोजाग प्रकटूं लागलीं. या उपवनसुमनांतून कणाकणानें जमलेला ज्ञानमधु लुटून लुटून यात्रिकांच्या मधुमक्षिका तो प्रयागच्या पुण्यभूमींत नेऊं लागल्या.

तल्लख प्रतिभेच्या ऋषींनीं गंगायमुना संगमाला पृथ्वीचा जघनभाग म्हटलेलें आहे. प्रयागक्षेत्र हें पृथ्वीचा उपस्थ अशी ऋषींची धारणा आहे.

> **गंगायमुनयोर्मध्यं पृथिव्यां जघनं स्मृतम् ।**
> **प्रयागं जघनस्थानमुपस्थमृषयो विदुः ॥**
> **म. भा. व. ८६।७६ ॥**

ऋषींच्या आश्रमाच्या परिसरांतून जें ज्ञानामृताचें दोहन आणि मंथन अविरत चालू होतें त्यांतून प्रकटलेलें नवनीत जेव्हां या उपस्थांत प्रवेशलें तेव्हां त्यांतून जी दिव्यदेहिनी, शुभांगिनी, शुभस्मिता कन्या प्रकटली तीच सरस्वती नदी. विद्येची देवता.

पृथ्वीवरील लोकांच्या स्वर्ग जाणून घेण्याच्या परिश्रमांतून ही नदी उगम पावली होती. हिच्या जन्मानें स्वर्गधरेंतील अंतर आटलें होतें. मानवाची प्रतिभा अज्ञाताच्या मेघपटलावर उंचावून सत्यब्रह्माशीं समीपता पावूं लागली होती. असाध्य तें साध्य झालें होतें. सरस्वतीला अपूर्व अलौकिकता लाभली होती.

या दर्शनाचें वर्णन कसें करावें? हिचा वर्ण धवल खरा. पण धवल कशासारखा ? कुंदकळ्यांसारखा? छे! ही प्राकृत उपमा झाली. सरस्वतीच्या रूपांतील धवलिम्याची स्वर्गीयता प्रकटण्यास ही उपमा थिटी आहे. त्याला उपमा कुणाची ! चंद्राच्या सुधेची. इंदुतुषारांची. पण इंदुतुषारांनीं सरस्वतीची स्वर्गीयता प्रकटली तरी पृथ्वीची जवळीक कशी प्रकटणार इंदुतुषार का पितां येतील ? ओंजळींत धरतां येतील ? त्याला उपाय कुंदकळ्या आणि इंदुतुषार यांचा हार करावयाचा. मग इंदुतुषारांत न्हालेल्या कुंदकळ्या जशा दिसतील तसा सरस्वतीचा धवलिमा. तिचा वर्णच धवल नाहीं तर वस्त्रहि धवल. धवल पद्माच्या मृदुमृदुल केसरांवर हिचें आसन. प्रत्यक्ष परमहंस परब्रह्म हे तिचें वाहन. नितांत सत्य अशा परमेश्वराच्या धवलिम्यांतून या सरस्वतीच्या वाहनाचा धवलिमा वेगळा उठून दिसणें कठीणच. दोघे एकमेकांत विरलेले मिसळलेले. 'सोऽहं सोऽहं' अशा सुरांच्या सरगमवर झुळलेली वीणा हिच्या हातांत. तिच्यांतून वेदोपनिषदांचे झंकार उठत असलेले. सारें मंगलमय. सारें सच्चिदानंदमय. सारें धवल आणि शुचिर्भूत.

सरस्वतीचें हें रूप इतकें मनोहर होतें कीं ज्यांना तिचें दर्शन झालें ते तिच्यावर लोभले. ज्याला विद्यारुची लाभली त्याला जीवनाचें भांडार गवसलें. विद्येसारखा अवीट सहवास दुसऱ्या कुणाचा असणार ? ज्याच्या श्वासांतून

सरस्वती जन्मली तो ज्ञानारंभ असा ब्रह्मदेवहि तिच्या सहवासांत अविरत रमला. तिचें दर्शन व्हावें, आपली गुप्तता सोडून ती प्रकट व्हावी म्हणून ज्यांनीं ज्यांनीं तप केलें त्यांना एकदां तिच्या दर्शनाचा लाभ झाल्यावर तिच्या सहवासांतून सुटणें अशक्य झालें.

सरस्वती ही शुभा आहे. अतिशुभा आहे. ती ब्रह्मचारिणी आहे. वासनेचा कलंक तिला नाहीं. तिच्या अकलंक, अलांछित सहवासांत जे रमले ते अकलंक झाले. तिच्या सहवासांत हीणांचें सुवर्ण झालें. वासनेची तृप्ति झाली आणि जाणीव नेणीव एक होऊन अंतीं उरला तो निष्कलंक धवलिमा. एकमात्र कैवल्यानंद. सच्चिदानंद.

## प्रमद्वरा नर्मदा

भारताच्या घडणींत सिंधु, गंगा आणि यमुना यांचें जें स्थान आहे तेंच दक्षिणेच्या घडणींत नर्मदा, गोदा आणि कृष्णा यांचें आहे. नर्मदेच्या कांठीं एक मोठें सांस्कृतिक स्थित्यंतर घडलें आहे. गोदावरी दक्षिण गंगेचें तैर्थिक पावित्र्य पावली आहे आणि कृष्णाकांठानें सम्राज्याचीं वैभवें मिरविलीं आहेत.

नर्मदेचें वैभव हें कीं ती दक्षिणेची माता आहे. आपली परंपरा सांगतांना आजहि रामेश्वरापर्यंत प्रत्येक दाक्षिणात्य 'नर्मदायाः दक्षिणे तीरे' असा आपला स्थाननिर्देश करीत आहे. नर्मदाहि दाक्षिणात्य संस्कृतीची जनित्री आणि संरक्षिका आहे. सिंधुपार झालेल्या आर्यांच्या दक्षिणेकडील वैभवविस्ताराला नर्मदेनें अडसर घातला. आपल्या कुशींत विसावलेल्या भिल्ल, शबर, गोंड या आदि-दाक्षिणात्यांचा नायनाट या प्रचंड लाटेखालीं होऊं नये यासाठीं नर्मदा जागरुक राहिली. आदिदाक्षिणात्यांची संस्कृति उपेक्षणीय नव्हती. संस्कृतिसंकरापूर्वीचा शेवटचा दाक्षिणात्य सम्राट रावण यानें दीर्घकालपर्यंत आर्यांना नमविलें होतें. परंपरापरंपर्यंत गोंडांची राणी दुर्गावती आणि आजवर तिचा मदनमहाल राजवाडा या संस्कृतीचा वारसा पटवीत आहेत.

सिंधूच्या तीरावरून खालीं उतरलेला हिंदु संस्कृतीचा प्रवाह नर्मदेनें अडविल्यावर तिच्या तीरानें पूर्वेकडे वळला. नर्मदेचा पिता विंध्य आणि भाऊ सातपुडा या समर्थ पितापुत्रांनीं तिला अतुल साहाय्य केलें.

नर्मदेच्या उत्तरेकडे प्रगत झालेल्या संस्कृतींत पुरोहितसत्ता आणि राजसत्ता यांच्या कक्षा स्पष्टत्व पावल्या होत्या. पुरोहितांनीं पुढें जाऊन आपल्या त्यागदर्शी जीवनाच्या आदर्शांनीं संस्कृतीच्या विस्तारासाठीं मनोभूमीची मशागत करावी आणि त्यामागून राजसत्तेनें मनोजय संपादून विस्तार दृढमूल करावा ही पद्धति मूळ भारतीयच आहे. अगस्तीऋषि नर्मदा ओलांडून प्रथम खालीं उतरला. त्यानें दक्षिण संस्कृतीचा महासागर पिऊन पचवून नवसंस्कृत करून पुन्हा मुक्त केला. मागाहून श्रीरामानें सांस्कृतिक दळणवळणाचा मार्ग रामेश्वरापर्यंत सुकर केला. पूर्वी सिंधुकाठीं संस्कृतिसंगम झाला तसाच आतांहि झाला. उत्तरेच्या संस्कृतीला रामेश्वरापर्यंत मार्ग मोकळा झाला तसा नर्मदेनें दाक्षिण्यात्य संस्कृतीला हिमालयापर्यंत मार्ग मोकळा करून दिला. नर्मदेपार झालेल्या आर्यांना दाक्षिण्यात्य संस्कृतीशीं जुळवून सामावून घ्यावें लागलें. रामेश्वरापर्यंत आर्यांना प्रवेश देणाऱ्या दाक्षिणात्यांनीं आर्यांचे इंद्र वरुणादि देव अक्षरशः पायदळीं घातले आणि आपल्या लिंगदेवाला उमेशीं विहार करण्यासाठीं अमरनाथापासून तों बद्रीनाथापर्यंत सारा हिमालय मोकळा करून दिला. कृष्णाला राहावयास भीमातटीं वीटभर जागा दिली तर आपल्या लिंगाला बनारसला विश्वेश्वर बनविलें. राजविलासी विष्णूला जोगड्या महादेवास समतेनें वागवावें लागलें, एवढेंच नाहीं तर प्रसंगीं त्याचे पाय धरावे लागले तेव्हां दक्षिणेचे दरवाजे आर्यांना खोलले. एक हनुमान असेल तर दहा राम येतील पण उलट एक राम असला तर दहा हनुमान येऊं शकणार नाहींत अशा भूमिकेवरूनच प्रत्यक्ष रामाचें सैन्य दक्षिणेंत लढत होतें याला रामायणांत आधार आहे. उत्तरीय संस्कृतीचा मानदंड आणि कणा असा जो हिमालय त्याची कन्या गिरिजा हिची खंडणी दाक्षिणात्य संस्कृतीचा मानदंड जो विंध्य आणि कणा जो सह्याद्रि, त्यांचा नाथ शंकर याला मिळाल्यावरच हा संस्कृतिसंगम सुकर झाला याचे पुरावे आजहि चोहीकडे पसरले आहेत. जशी वाघीण आपल्या पिलांच्या रक्षणास दक्ष असते तशी नर्मदा दाक्षिणात्यांच्या रक्षणास दक्ष राहिली आहे. जें प्रेमानें आलें त्यांचें तिनें स्वागत केलें आहे आणि दंडशक्तीला विरोध केला आहे. हर्षासारख्या सम्राटाला सुद्धां तिनें आपला पुत्र पुलकेशी याकडून चोप दिला आहे. दंडसत्तेची लाट अपवाद म्हणून खालीं आलीच तर तिचा दिढीनें प्रतिकार करून भीमथडीच्या तट्टांना अटकेपर्यंत जाण्याचें सामर्थ्य दिलें आहे. आजहि हिंदी साम्राज्यवाद्यांना ती आपलें ताठर सामर्थ्य दाखवीत निडरपणें इतिहासाकडे त्यांचे डोळे वळवीत आहे. नर्मदेचें रक्त हें गोंडाचें, शबरांचें निडर रक्त आहे. "भले तरी देऊं सोडोनी लंगोटी, नाठाळाचे माथीं सोटे मारूं," हा तिचा मर्मर आहे. जगा आणि जगूं द्या हा तिचा धर्म आहे.

ती पिंडानें नर्मदा आहे. नर्म म्हणजे विलास, क्रीडा, शृंगार. यांचें दान करणारी ती नर्मदा. सारें शांत असतें तेव्हां ती अमरकंटकाच्या वनपरिसरांत लपंडाव खेळते. धुवांधारच्या प्रपातांत उच्छृंखल नृत्य करते. मयसभेला लाजविणाऱ्या संगमरवरी रंगमहालांत, सुधांशूला मिठींत कवळून त्याचीं चुंबनें घेत, मत्त प्रमदेप्रमाणें आळसावून धुंद पडलेली असते. पण हें सारें करतांना दक्षिणेच्या बालोद्यानांतील आपल्या लेकरांचा कानोसा ती घेत असते. त्यांची हांक कानीं येतांच ती रणरागिणी दुर्गावती बनून आपला खड्गहस्त उभारून त्यांच्या रक्षणास सिद्ध होते. मदनमहाल हें जसें दुर्गावतीचें प्रतीक आहे तसाच दंडसत्तेला जरब बसविणारा इतिहास हेंहि तिचें प्रतीक आहे. नर्मदा ही दुर्गावतीची माता आहे. जशी माय तशी लेक. जशी लेक तशी माय.

## तीर्थरूपा गोदावरी

माते मज या उष्ण धुळीच्या<br>
कर्मभूमितुनि चटसरशी<br>
उचलूनि देवि ब्रह्मगिरीवरि<br>
गोदेसन्निध ठेव कशी ॥

अशा अर्थाच्या चंद्रशेखर कवींच्या उद्गारांत प्रत्येक महाराष्ट्रीय मनाची तळमळ प्रकट झाली आहे. कन्येला माहेराची ओढ तशी मराठी मनाला गोदेची ओढ. गोदा ही मराठ्यांची










माता. ही भाग्यशालिनी भुवनांतील साऱ्या सरितांत परमधन्य. तीर्थांचें जें तीर्थ त्या गंगेलाहि हेवा वाटावा असें अहोभाग्य गोदावरीचें. गुहेच्या नौकेंतून प्रवास करतांना गंगेला श्रीरामाचा काय सहवास घडला असेल तेवढाच. त्या क्षणिक सहवासानें गंगेला अभिमानाचा महापूर आला. मग ज्या गोदेच्या काठीं श्रीरामाचा निवास वर्षानुवर्षे घडला तिचा अभिमान आणि भाग्यठेवा कोणी वर्णावा ?

आयुष्यभर दुःखांत पिचलेल्या सीतेला या महाराष्ट्रानेंच आणि या गोदेनेंच काय तें सुख दिलें. अगस्तिमुनींनीं श्रीरामास निवासास योग्य अशी जागा दाखविली तेव्हां 'मैथिली तत्र रंस्यते (इथें सीतेला सुख लागेल)' असेंच गोदाकांठाचें वर्णन केलें आहे. अत्यंत अल्प आणि तेंहि एकदांच बोलणाऱ्या श्रीरामानें गोदातटाचें वर्णन 'इदं रम्यं इदं पुण्यं (हें सौंदर्यशाली हें पुण्यशाली)' या शब्दांनीं केलें आहे. श्रीराम अन्यत्र या पुण्यपरिसराबद्दल म्हणतो 'यत्र द्रुमा अपि मृगा अपि बंधवो मे (इथें वृक्षपाषाण आणि पशुपक्षी यांनींहि मला बंधुभाव दिला).' श्रीरामानें असें म्हणावें यांत नवल काय ? जटायूसारख्या गिधाडांनींहि रामसीतेचें भावजीवन फुलविण्यास सहकार देऊन इथें जें भव्योदात्त महाकाव्य निर्मिलें त्याचें वर्णन आणखी कसें करावयाचें ?

वांटणी करून सीमा आंखण्यांत प्रवीण असे तेलगु बंधु गोदावरी हें नांव गोदे म्हणजे सीमा या तेलगु शब्दावरून आलें असें मानतात. प्रेमाचें सौंदर्य फुलविणारें मराठी मन असें मानीत नाहीं. जलदेवता या गोस्वरूप कल्पिल्या आहेत. जल देणारी ती गोदा. आणि सर्व गोदांमध्यें श्रेष्ठ ती गोदावरी हा मराठी अर्थ अधिक भावरम्य आहे. गोदेकडे जो तो आपल्या दृष्टीनें पहातो. तेलंगणांत ती तंबाखू आणि तांदूळ पिकविणारी, तसेंच व्यापार सुकर करणारी व्यापक नदी मानली जाते तर मराठी मन तिच्या कांठीं, त्रिंबकेश्वर, नासिक, नेवासें, पैठण, नांदेड अशीं भक्तीचीं साम्राज्यें फुलविते. अमृताशीं पैजा जिंकणारी मराठी बोली इथें जन्मते–वाढते. भक्तिरसास उधाण आणणारे अनेक संत आणि थोर पुण्यात्मे इथें जन्म घेतात. आपल्या भाषेचें आणि संस्कृतीचें मंदिर स्वर्गाची लूट आणून संपन्न करतात. गरीब-श्रीमंतीचा भेदभाव विसरून प्रेमानंदांत दंग होतात. 'स भवति दरिद्रो यस्य तृष्णा विशाला मनसिच परितुष्टे कोऽर्थवान को दरिद्रः' (ज्याला हांव तो दरिद्री. जो संतुष्ट त्याला सारेंच सारखें.) या भर्तृहरीच्या उद्गाराप्रमाणें इथें प्रेममदांत आणि भक्तिवैभवांत संतुष्ट झालेले कलंदर गोदागौरवांतच सारीं विभवें उपभोगतात.

मराठी मनाला गोदा म्हणतांच तिचें एकच दर्शन होतें. तें म्हणजे जिच्या कांठच्या शीलातलावर सीतेच्या मांडीवर डोकें ठेवून श्रीराम पहुडला आहे अशा गोदावरीचें. मराठी संस्कृतीच्या प्रवाहाचा उगम अशा गोदावरीचें. अंजन-कांचन-करवंदीच्या तसेंच बकुळफुलांच्या, प्राजक्तांच्या आणि दगडांच्याहि या देशाला आपल्या स्तन्यांतून बाळसें देणाऱ्या गोदावरीचें.

रामाला इथें स्नान घडलें आणि या जलाला तीर्थत्व आलें. हा देश मंगल, विमल आणि सफल झाला. सीतेच्या अंगाचा सुगंध इथल्या फुलांत कोंदला. मराठी संस्कृति आणि चारित्र्य इथें उपजलें आणि वाढलें. रामानें इथें संस्कृति पेरली.

त्यावेळीं त्या समर्थ पुरुषाचे जे दिव्य अश्रु गोदेंत मिसळले तीच तिची तीर्थता; तिचें सामर्थ्य. या सामर्थ्याच्या जोरावर गोदेनें मराठी अस्मितेचें नीरांजन सतत तेवत ठेविलें आहे आणि ती तें पुढेंहि ठेवणार आहे.

*कुपुत्रो जायेत क्वचिदपि कुमाता न भवति ॥*








*आजवर कुणी पाय लावला नव्हता त्या सिद्धाच्या खडकाला; पण गोकुळा त्याच्या माथ्यावर चढली. बायकांचं तें काम नव्हतं; पण....मुसमुसलेली, रसरसलेली गोकुळा चढली. त्या सिद्धाच्या जबड्यांत पार दिसेनाशी झाली....*



श्रीराम कामत

सिद्धाच्या उघड्या जबड्यांत शिरलेली गोकुळा सुखरूप त्याच्या माथ्यावर चढलेली दिसली आणि तसा खालीं गावितांच्या पोरींनीं एकच ओरडा केला—

**"सिद्धाच्या लेकी तुला दर्या ग राखी !**
**मोत्यांच्या राशी तुझ्या मचव्यात टाकी !"...**

हा सिद्ध केरांतील गावितांचा मूळपुरुष. तो बाटेना म्हणून फिरंग्यांनी काजऱ्याच्या झाडाला बांधून त्याला जिवंत जाळला. मरता मरता त्यानं आकान्ताची साद घातली—'धांव, दर्या धांव!' चमत्कार असा, पांच मैलांवरून दर्यानं आ वासून थेट उडी टाकली आणि आपल्या या लेकराला पोटांत घेतला.

त्या ठिकाणीं हा खडक उठला. फिरंग्याच्या कसाबकरणीची ती काळी निशाणी आज तीनचारशें वर्षे तशीच उभी होती. वारेवादळाला तोंड देत, उन्हाचा ताप आणि खाऱ्या पाण्याचा राप पचवीत गावितांचा हा भला उंचच उंच, काळाकभिन्न आणि अक्राळविक्राळ राखणदार, सिद्ध किनाऱ्यावर खडा होता. दर्याच्या पायाशीं धरणं धरून उघड्या तोंडानं सांगणं घालून राहिला होता. जोरगतीला उधाण तोंडांत शिरलं कीं सिद्ध आज सुद्धां साद घालीत राही—'धांव रे, पाव दर्या!'

सिद्धाच्या माथ्यावर चढून उभं राहिलं कीं गावितांच्या पोरांना आभाळाला हात लागल्याइतका हर्ष होई. अवखाण पोरं सिद्धाचं नांव घेऊन बेशक त्याच्या जबड्यांत उतरत. आंतील मिट्ट काळोखांत सरड्यागत सरकत न् घसटत वरवर चढत. जिकिरीचं, त्रासाचं खरं, पण खेळांत सगळीच गंमत! या बिळांतून एकदां का बाहेर पडलीं कीं शिद्धाच्या माथ्यावर तीं थयथयाट करीत, धिंगाणा मांडून रहात.

पण सिद्धाच्या खडकावर आज पोरं नव्हतीं. सध्यां रांपण पडत होती. केरांतील बाप्येमंडळी आणि वाढलेलीं पोरं तिकडे रांपणीवरच असत. सांजला तीं परतत. कधीं लवकर, कधीं उशीरा. नेम नव्हता.

रांपणीची वाट बघत गावितांच्या पोरी किनाऱ्यावर उभ्या होत्या.

तर ह्या गोकुळाच्या टाळक्यानं एकाएकीं काय घेतलं—तर्स! सिद्धाच्या माथ्यावर चढायचं! बरोबरच्यांनीं चेष्टा केली, तिला वेडींत काढली. कारण तें बायकांचं काम नव्हतं. पण तिनं नाहीं मानलं. त्यांचं सांगणं जुमानलं नाहीं. ती धांवली. बेधडक सिद्धाच्या जबड्यांत शिरून दिसेनाशी झाली...

बराच वेळ असा गेला.

खालीं पोरींना नसतीच काळजी. सिद्धाच्या जबड्यापर्यंतहि त्या कधीं पोंचल्या नव्हत्या. पोरांकडून कांहींबाही ऐकलं होतं. तर ऐकूनच त्यांच्या अंगावर कांटा उठे...आणि...आणि सिद्धाच्या खडकावर घामाघूम उभी असलेली गोकुळा त्यांना दिसली मात्र, तसं पोरींना अजब झालं, चमत्कार वाटला.. ती सिद्धाची लेक झाली होती.

गोकुळाचं तिच्या सोबतिणींनीं नसतं कौतुक लावलं. तोंड फाटेपर्यंत तारीफ चालवली.

"अगो, लगिनाची काळजी तूं करूंच नकोस! ती आहे आतां सिद्धाला." खालीं एकीला साक्षात्कार झाला.

दुसरीनं भरल्या तोंडानं म्हटलं, "तो तुझं सोनं करील. दुणावाचं वाण भरील. तुझ्या जवानीचा मचवा भल्या मर्दाला दान करील."

"ह्या मर्दाचा गो काय नेम?" कुणी तरी चेष्टा केली.

तिला उखाण्यांत जाब मिळाला. हा असा—

**"वेळ नाहीं काळ, कयेंत ही उशी**
**शिडांत ग वारं, मग मचव्याला खुशी!**

जाम खसखस पिकली. मुक्काड रेघेंत भरतीची लाट फुटावी तशा पोरी खदखदल्या, खळखळल्या.

आणि चेकाळलेली एकजण असोस पुटपुटली, "मजा असती ग, नाहीं?"

तिला अनुभव नव्हता. त्यांच्यांत एकीलाहि तो नव्हता. हुरहुरीची जाणीव, आगीची जाग. मातीची घागर देहाला जड झालेली. सुखाचं अप्रूप सावलीसारखं आगंमागं, दिसत होतं–भासत होतं. मात्र हातीं लागलं नव्हतं.

"होय! ही मज्जा होते एकदीस जड. आन् मग केळीला फुटतो घड." दुसरीनं लग्न झालेल्या गावतिणींचा शोध सांगितला. मिटक्या मारीत, आवंढे गिळीत. कुठं कधीं कानावर आलं होतं. तेंच फेकलं.

"आन् मग गो?" एक होती अर्धवट. तिला उशीरा जाग आली.

"जा विचार तुझ्या आएला!" हंसून कुणीसा सल्ला दिला.

"आए काढील कोलीत–चुलींतलं."

तसा आणखी एकीनं मार्ग दाखवला, "मग बिच्चार जा त्या कड्याला."

"नाहींतर थेरड्या हिरुला." आणखी एकीची चावट सूचना.

"त्या थेरड्याला?" ती अर्धवट पोर चोळीची गांठ घट्ट करीत पुटपुटली.

"कां? जाऊन विचारणार आहेस?" पहिलीनं छेडलं.

"आन् पत्ता लागणार होय हिला? पोट वाढलं आन् उभ्या गांवाला दिसलं तरी ही विचारील, मग गो?"

गोकुळाचं कौतुक करतां करतां गावितांच्या पोरींचीं हीं अशीं बोलणीं सुरू झालीं. जिवाभावाचं हितगुज चाललं.







वर गोकुळाला या गप्पा ऐकूं जात नव्हत्या. तिचं लक्षसुद्धां नव्हतं. तें लागलं होतं समोर, उघडया दर्याकडे. बुद्धबुद्ध भिरकावून ती बघत होती. नजर थकत होती. दृष्टि चकत होती. पण हा समींदर संपतच नव्हता. कड नाहीं, तड नाहीं, थेट मळ्याला गांठ घालून तो बसला होता.

दूर क्षितिजावर धुक्यांत एक दाट ठिपका गोकुळाला दिसला. सिद्धाच्या माथ्यावरून ती ओरडली, "बायांनो, रांपण आली गो!"

गावितांच्या जातीला रांपणीचं मोठं कौतुक. रांपणींत लुटून आणलेलीं दर्याची जिवन्त दौलत खालीं किनाऱ्यावर उपसतांना बघण्यांत काय गंमत आहे, त्यांची त्यांनाच ठाऊक! पण ती बघायला गावितांचा झाडून उभा वाडा लोटलाच पाहिजे.

उगाच नाहीं! गोकुळानं रांपण आली म्हणून हळी देतांच किऱ्यांचं भिरं उडावं तसा खालीं कालवा उठला, "रांपण आली, रांपण आली."

त्यांना बाकी विचारच राहिला नाहीं. तो अन् तेवढाच. तश्या त्या तडक निघाल्या. रांपण ज्या ठिकाणीं किनाऱ्याला लागते तिकडे धूम धांवत सुटल्या. मागं सिद्धाच्या माथ्यावर गोकुळा आहे याची आठवण सुद्धां त्यांना उरली नाहीं.

त्यांना निघालेल्या बघून गोकुळा ओरडली होती, "अगो जरा थांबा! मी आलेंच."

शिंदळ कोंबडीगत तिनं मान मोडली. तसा तोंडावरचा उभा वारा तिच्या केसांत शिरला. कपाळावरचे पिसाट केंस दोन्ही हातांनीं मांगं करूं लागली तर इकडे पदराचं शीड उडालं.

तर ती वाऱ्याशीं झगडूं लागली. "ह्या मेल्याला का रे जोर आला?"

"माझ्यावाणी त्यानं तरी किती आन् कशी वाट बघायची गो?"

आधीं हा सलगीचा प्रश्न आणि मागून तो कलगीचा हात पुढं झाला.

गोकुळा दचकली. तिचा थरकांप उडाला. चेहरा भयभीत, पांढरा-फटक झाला. इत्तर गार पडलं. देह गोठून जड झाला.

"अगो मी, मी कश्या तो!" कश्या गावींत ओरडला. म्हणजे तिची ती अवस्था बघून तो सुद्धां चरकला. मनांतून कचरला. "मला घाबरलीस गो!"

"मेल्या तूं?" गोकुळा पडतां पडतां सावरली. सिद्ध नाहीं, हा कश्या गावीत आहे ही जाणीव तिच्या डोक्यांत आस्ते आस्ते शिरूं लागली. गुदमरलेल्या स्वरांत तिनं विचारलं, "रांपणीवर नाहीं रे गेलास!"

"म्हटलं आज चैन करावी." तो लोचट हसला. बाजूला कोपऱ्यांत पडलेल्या दोन बाटल्या दाखवून म्हणाला, "पिऊन पडलों होतों, नाहीं?"

"मग आतां उठलास रे कां मुडद्या? कोणी केलं जित्तं?"

"तूंच कीं! आवाज ऐकला तुझा आन् तशी दारू उतरलीच बघ!" कश्यानं जाब केला आणि तो फसफसत हसला. सलगी करीत जवळ सरकला.

गोकुळानं त्याला नजरेनं रोखला. म्हटलं, "बघ तूंच! पण आधीं हात सोड."

"सोडायलाच धरला होय गो? आं!"

अनुक्रमणिका







# चालू जमान्यांत साजरे झालेले भारतीय दिव्य महोत्सव







अनुक्रमणिका






**चेटूक** पान ७१ वरून

"बऱ्या बोलानं सोडतोस का कसं?" तिचा आवाज चढला होता. ती पूर्ण सावध झाली होती. ह्या कश्याला ती पुरा ओळखत होती. मेला कुत्रा होता.

"आहे ताकद तर सोडीव तुझा तूं! मला टाइम नाहीं. हां!" आणि त्यानं तिचा हात आणखीन् घट्ट पकडला. तिला जबरीनं जवळ खेचली. मिठींत कवटाळली. नाहींतरी नष्टच तो. मेला मोठ्यानं हसत तिच्या अंगाला झोंबला.

एकच क्षण! आणि पुढच्याच क्षणीं कश्या कळवळून ओरडला, "अगो, अगो अयाय्—"

अंगावर पुढंपुढं करणाऱ्या त्याच्या हाताचा गोकुळानं कचकचून चावा घेतला होता. कश्याच्या हाताची मिठी आपसुख ढिली झाली. तशी झटक्यासरशी ती बाजूला झाली. आणि आश्चर्यानं तोंड उघडं घालून तो आपला बघतोच आहे तर समोर समुद्रांत या माथेफिरू पोरटीनं उडी टाकली.

मेली तर मेली, कटकट गेली! गोकुळाला जिवाची पर्वा नव्हती. कुठची कोण, लांबची आते ही धुरपदी! पण रडायला तीसुद्धां आज हयात नव्हती. पांचा मात्रांत ती सोपली होती. वेफाट जगांत गेले चार महिने पोर बिलकुल उघडी पडली होती. ह्या आतेचा नवरा, तो थेरडा हिरू गाबीत तिचा दुस्वास करी. त्याला ही डोळ्यासमोर आलेली खपत नव्हती. दरखेपेस तो तसा टवकारून तिच्याकडे बघत राही. अंगावर नेसूं असूनहि नसल्यासारखी ती अर्धीमुर्धी होई. लाज उघडी पडल्यासारखं वाटे. आल्या दिवसापासून म्हाताऱ्याची ही अशी नजर आणि दुस्वासाचं बोलणं.

त्याचा लेक मंगा तर वाऱ्यालासुद्धां फिरकत नसे तिच्या. आएचं दुःख पोरानं काय इतकं मनाला लावून घेतलं होतं सिद्धाला ठाऊक! पण मंगाचं सगळं लक्षणच बदललं होतं. हसणं सुटलं होतं. बोलणं तुटलं होतं. जड पायानं तो घरांत वावरे. तिऱ्हाईत कसा. आणि तिला दर्यांतील भोवरा समजून तो टाळीत होता.

होय, खरं होतं. गोकुळा जगांत बिलकुल एकटी होती. आणि ती मरती तर कोणाचं कांहीं बिघडलं नसतं!

पण गाबितांच्या पोरी बुडून मरत नाहींत. त्यांना पोहतां येतं...

—

रांपण किनाऱ्यावर थडकली होती. शीड गुंडाळलं आणि मंगा गाबीत डोलकाठीला पाठ टेकून उभा झाला. समोर कावळ्याची टक लावून राहिला. सातआठ हात झपाझप वल्हीं ओढत होते. पिछाडीला आणखी एकजण ठाव घेत नेटानं तावद मारीत होता.

आणि रांपण कमरभर पाण्यांत आली तसा गलका करीत गाबितांच्या बायकापोरी पुढं आल्या. नाचत बागडत उसळल्या. बचक् बचक् पाणी घुसळत, खिदळत न् खिंकाळत मचवा वर काढण्यासाठीं त्या धांवल्या. उघड्या गळ्यांत हिरव्या नाहींतर काळ्या मण्यांची पोत, उभार भरलेलं अंग गच्च काचोळींत बांधलेलं, उलट्या कासेचं वर ढोपरापर्यंत नेसूं—मचव्याच्या दुशी बाजूं भराभर त्या उभ्या राहिल्या. रांपणीवरचीं लोकं पाण्यांत उड्या टाकून तयार होतींच. "हायलेस,












## लेखकांच्या नाना 'कळा' : भक्तिमय लेखक



गळां वैजयंती माला
चाले चिपळ्यांचा चाळा
जटाधारी हनुकेशी
नीळकंठ कीं गोपाळा
किती रसायने केली
कैक उद्धरीले वीर
परि फाटक्या देहाचा
भासे आर्द्र प्रेमवीर.

अरे होय होय हायलेस" असं तोंडानं ओरडत ओरडत तीं मचवा वर किनाऱ्यावर लोटूं लागलीं.

तशी एकाला काय लहर आली काय कीं! दर्याच्या भरल्या भावाजांत घुमत त्यानं सुरुवात केली. तरण्या पोरांनी साथ दिली—

"आतां है है नाखवा, दर्यांत मचवा डोलतोय गो।
गोमूच्या मचव्याला सांपडली मुशी—

आणि यावर गावितांच्या बायकापोरींनी आवाज चढवीत जाब केला—

"मुशीच्या नादानं गोमू झाली खुशी।
आतां है है नाखवा, दर्यांत मचवा डोलतोय् गो"...

पुढांत दर्याच्या पाण्याला गहिरा गारवा होता. आभाळाच्या गर्द सावलींत जळ जड होऊन सुस्त विसावलं होतं. तीच मस्त धुंदी गावितांना चढली होती. रागरंग जुळला होता. जीवनाचा एक ताल लागला होता. त्यांचं गाणं रंगत होतं, फेर धरून चढत होतं. सवालाला बरोबर जाब मिळत होता—

"गोमूच्या मचव्याला सांपडली सुरमय
सुरमयच्या नादानं गोमू म्हणे व्हय व्हय.
आतां है है नाखवा—
गोमूच्या मचव्याला सांपडली कर्ली
कर्लीच्या नादानं गोमू कुशींत शिरली
आतां है है नाखवा—
गोमूच्या मचव्याला सांपडलीं पिठीं
पिठ्यांच्या नादानं गोमू मारी मिठी
आतां है है नाखवा—
गोमूच्या मचव्याला सांपडला बांगडा—"

आणि गावतिणी अडखळल्या. त्यांना रोकडा जाब सुचेना. त्या विचारांत पडल्या. एकमेकींच्या तोंडाकडे बघूं लागल्या. त्यांचा आवाज बंद झाला.

त्यांना हिणवण्यासाठीं पुरुष मंडळी ती एकच ओळ पुन्हा न् पुन्हा घोळवत राहिली—

"गोमूच्या मचव्याला सांपडला बांगडा—"

गावीत खूश होते. त्यांच्या मुखड्याला बायकांकडे तुकडा नव्हता. ज्या तोंडांचा उभ्या गांवाला धाक तीं त्यांनीं चूप्प केलीं होतीं. गावतिणी हरल्या होत्या. त्यांच्याकडे जाब नव्हता.

तो दिला गोकुळानं. पोर लगालगा धांवत आली होती. तिला उशीर झाला होता. नशीब! रांपण ओढण्यांत सगळींजणं गुंतलीं होतीं. पाऊल न वाजवतां अन् चाहूल न देतां ती त्यांच्यांत घुसली. तर गावितांचा जोर चालला होता—

"गोमूच्या मचव्याला सांपडला बांगडा—"

तिच्याकडे प्रश्नार्थक दृष्टीनं मंगा बघत होता. तशी लाजून लवलवत गोड स्वरांत तिनं म्हटलं—

"बांगड्याच्या नादांत रऽ पुरा झाला सौदा
आतां है है नाखवा"

असा सूचक अन् अर्थपूर्ण जाब दिला पोरीनं—गावतिणी तर एकदम फुलल्या. त्या गालांतल्या गालांत हसल्या. हुंकारत माना वेळावून त्यांनीं बाप्यांकडे पाहिलं. बायकांच्या जातीचं नांव राखलं होतं गोकुळानं.

पुरुषांनींहि दिलखुलास पसंती दिली. तोंड भरून कौतुक केलं, "वाः वाः! पोरी कमाल गो तुझी!"

गोकुळाची मान आणखीन् खालीं गेली. शरमेनं तिचे तुकडे झाले. खाल्मानेनं ती लटकंच म्हणाली, "जळलं रे तुमचं कौतुक!"

आणि एकदम मान उचलून सरळ तिनं मंगाकडे पाहिलं. तें तसं, चिटाईनं, खोट्या रागानं. त्याला तिनं बरोबर पकडला होता. त्याची नजर सारखी तिच्यावरच खिळून होती.

पण—पण मंगाला कुठं ती हिंमत होती? तिच्या डोक्याला त्याचा ओझरता डोळा भिडला आणि त्यानं तो चुकवला. तो दुसरीकडेच बघूं लागला, बाजूला, सुरूच्या सळसळत्या रानांत• वेड्यावाणी कांहीं तरी बघत न् शोधत राहिला. हसणं नाहीं रुसणं नाहीं. सलगीचा राहूं द्या, पण साधा ओळखीचा शब्द सुद्धां मंगाच्या तोंडून निघाला नाहीं. त्याच्या घरची ती--घरचीच नाहींतर! मरतांना धुरुपदीनं गोकुळाला आपल्या ह्या लेकाच्या ताब्यांत सोपवला होता. शपथ घातली होती त्याला—"पोरा, एक दारू सोड आणि...आणि ह्या गोकुळाला बघ." शेवटचा शब्द म्हातारीच्या तोंडून कांहीं निघाला नाहीं. तिला उचकी लागली. हूं! आएचं बोलणं मंगानं फक्त अर्धे ऐकलं. तेवढी दारू सोडली. पण गोकुळाला तो बघत नव्हता—बघायलाहि तयार नव्हता.



अनुक्रमणिका

आए मेली आणि एकाएकीं मंगा तिला परका झाला. आधीचं सगळंच्या सगळं तो विसरला. तिकडे मुरूच्या रानांत, एकीकडे दोघांत झालेले खेळ आणि बोललेले बोल—

नाहीं ! तिला कळत होतं, दिसत होतं. मंगा विसरला नव्हता. मात्र विसरूं बघत होता. त्याचा खूप प्रयत्न चालला होता. तिच्या-पासून दूर पळण्याचा, मन मारण्याचा, आठवणी जाळण्याचा. पण जळत होता तोच. खंगत होता, पिचत होता, आंतल्या आंत तडफडत होता—वरकरणी कितीहि देखावा केला तरी गोकुळाला तो फसवूं शकत नव्हता. एकांत एक गुंतून बसलेलें त्यांचे जीवितधागे असे तुटणार नव्हते, सुटणार नव्हते. उलट ते अधिकच गुंतत. आणि त्यांबरोबर तीं दोघं !

मचवा वर किनाऱ्यावर काढला आणि तशी लोकं रांपण ओढूं लागलीं. रांपणीचं लांबच लांब जाळं मोकळं होऊं लागलं. म्हावऱ्याच्या राशी लागल्या. बांगडे, तारल्या, लाल कोलंबी—उभी दर्याची दौलत किनाऱ्यावर तडफडत पडली. मग तणतणत अन् गजबजत वांटण्या झाल्या. पाट्या भरभरून डोईवर वाहत गावतिणी आणि त्यांच्या पोरी बाजाराला धांवल्या.

भरली पाटी डोईवर घेतली आणि गोकुळा पुढ्यांत उभ्या असलेल्या मंगाला म्हणाली, "जाऊन येतें रे बाजाराला."

"अशी ओल्यानं." त्यानं विचारलं.

होय ! इतक्या लोकांत फक्त त्याच्याच लक्षांत आलं होतं. तिचं नेसणं चिपचिंब झालं होतं. ओलं वस्त्र झाडाची साल कसं अंगाला बसलं होतं. चिप्प केसांतून अजून पाणी निथळत होतं.

"हूं: ! त्याला काय होतं ?" खुसूखुसूं हसत तिनं विचारलं.

मंगानं उत्तर दिलं नाहीं.

"अरे, कशी भिजलीस म्हणून तरी विचार."

त्यानं नाहीं विचारलं.

गोकुळाच सांगूं लागली, "मंगा, बुडणारच होतें रे. नशिबानं वांचलें बघ—तुझ्या." हा शेवटचा शब्द अस्पष्ट, अस्फुट, आवाजांत.

तरीसुद्धां त्यानं तिच्याकडे बघितलं नाहीं. मंगा थंड झाली. म्हाव-ऱ्याची पाटी डोईवर सांवरीत तरातरा ती निघाली. सरळ त्याच्या अंगावरून.

"आधीं घरला चल," मंगानं आवाज चढवला.

"उशीर होईल मला." तिनं त्याच स्वरांत जाब दिला.

"नाहींतर रोज टाइमावरच येतीस ?"

"अरे पण कां ?"

त्यानं कारण सांगितलं नाहींच. तिच्याकडे एक तुटक कटाक्ष टाकून मुकाट तो चालूं लागला. गोकुळा जळफळत त्याच्या मागं निघाली...

बाहेर पडवींत दारावर हिरू गावीत बसला होता. कमरेला कासटा, बाकी उघडाच. केस पिकून त्याच्या डोक्याचं शबांड झालं होतं. हजामत सदा वाढलेली. तांबूस मिशा, राकट न् रुंद चेहरा. बघूनच हिरूबद्दल मत वाईट होई. थूः थूः करीत जाड जिभेनं तो उफराटं बोलूं लागला म्हणजे तर संतापच येई.

त्याच्या डाव्या पायांतून वारं गेलं होतं. डॉक्टरानं बजावलं होतं—'अर्धांगाचा हा पहिला झटका. हिरू, जपून रहा.' हिरू गावीत हा असा जपत होता. तरसासारखा पाय ओढीत उभा गांव उनाडत








होता, पी पी दारू पीत होता, अजीर्ण होईपर्यंत चरत होता. हें खाल्लंप्यालेलं पचविण्याकरितां तंटेबखेडे काढीत होता. बाहेर नाहीं साधला, तर घरांत गोकुळा होतीच!

मंगा त्याचा लेक, पण हिरूनं पाहिलं मागून येणाऱ्या गोकुळाला. गुडगुडी बाजूला ठेवून तो मोठ्यानं पुटपुटला, "आज लवकर आली पांढऱ्या पायाची. भेटला नाहीं कोण?"

हा असा कानमंत्र लेकाला जेव्हांतेव्हां देऊन म्हाताऱ्यानं त्याला गोकुळाच्या विरुद्ध फितवला होता. त्याच्या बोलण्याकडे लक्ष द्यायचं तिनं कधींच सोडून दिलं होतं. ऐकून ती न ऐकल्यासारखं करी.

आतांसुद्धां तिनं नाहीं, मंगानं जाब दिला, "दादा, बाजाराला गेली नाहीं ती अजून."

तसं हिरूचं लक्ष मंगाकडे गेलं. त्याला बरं नाहीं वाटलं. तीं दोघं बरोबर आलेलीं खपलं नाहीं. पापी नजर त्याची. त्याच्यादतकीच पाड पडलेली. तो निष्कारण उसळला, "मग म्हणणं काय? म्हावरं घेऊन मी बसूं बाजारांत? आणि तुम्ही बसतां रांपण घालून घरांत?"

"दादा—" मंगा भडकला. बापाचं बोलणं त्याला आवडलं नाहीं.

"अरे होय, ओळखतों मी." हिरू हात उडवीत त्याच्या अंगावर आला. "माझ्या धुरुपदीची शपथ विसरलास पोरा! बरं नाहीं, तुझं बरं नाही होणार! काय?"

सणसणीत चपराक खावी तसा मंगाचा चेहरा पडला. बापानं त्याला सावध केला होता. आला तसाच खालीं मान घालून तो बाहेर चालता झाला.

"मंगा, पाटीला हात लाव रे?" गोकुळानं मागं साद घातली.

"तोच हवा! मी काय म्हातारा झालों? आं!" हिरू ओरडला. पाय ओढत पुढं झाला.

पाटी उतरतांना त्याच्या ध्यानांत गेलं कीं पोर चिप भिजून आली आहे. म्हाताऱ्याच्या भुंवया वर चढल्या. डावा डोळा तांबरला.

"कोणाच्या गळ्याला मिठी मारून बुडत होतीस?" त्यानं विचारलं.

"तुझ्या! इतक्यांतच विसरलास?" गोकुळानं वैतागानं म्हटलं. आणि माजघरांत जाऊन ती नेसणं बदलूं लागली.

हिरू गाविताला रहावेना. तो दारांतून आंत डोकावूं लागला. अधाशी दृष्टीनं, अतृप्तीच्या सुखानं. म्हाताऱ्याच्या तोंडांतून कुत्र्यासारखी लाळ लागली होती.

आंत गोकुळाच्या तें लक्षांत आलं, तसं भरकन् तिनं नेसणं अंगावर ओढलं. ती वस्कन् त्याच्यावर ओरडली, "मुडदा झाला तुझा थेरड्या, अजून नाहीं खाज जात?"

"छाः छाः! अगो दिसत नाहीं मला!"

"बाकी नाहीं. पण हवं तें बरोबर दिसतं."

"शिद्धाची शपथ! सांगणार होतों—"

"कांहीं नको सांगूस. हिथचा नीघ आधीं." गोकुळा फणफणली.

"जुनंच नेस गो. वाढलेल्या पोरीला नट्टापट्टा कामाचा नाहीं. लोकांच्या नजरा बऱ्या नसतात. काय?" हिरू गावीत तिच्या हिताचं सांगत होता.

"आन् तुझी नजर रे, दादा?" गोकुळानं खवचटपणानं विचारलं.









"अगो, आतां म्हातारा झालों मी." तिला खिजवीत त्यानं जाब केला. "म्हातारा, काय ?" आणि मुद्दाम ढेकर देत राहिला 'अय् अऽऽय्!

"छीः !" गोकुळाला शिसारी आली. किळस आली. "अरे जा ना. समंध मेला !"

"जातों. जायलाच हवं. नाहींतर खाशील तूं मला. काय ? सटवीनं माझ्या धुरपदीला खाल्लीन्--"

हें असं नाहीं तें बरळत हिरू गावितानं डोईला टावेल गुंडाळला. थंड झालेल्या गुडगुडीचा जोरदार दम मारला. तमाकूचं कडवट पाणी पचाक पचाक थुंकत तो बाहेर पडला. तरीहि एकदोनदां मागं बघितलंच—

म्हणजे त्याचं डोचकं पार चढलं होतं. पोटांत नळ फुगला होता. अंतोनीकडे जाऊन चांगली अद्शेर, अरसल काजूची दारू मारल्या-शिवाय त्याला बरं वाटणार नव्हतं. आणि नंतरसुद्धां बरं वाटणं आतां अशक्यच होतं. दिवस गेला होता. पण रात्र सरळ जाणं कठीण होतं. म्हातारा झाला होता हिरू. अवसान गेलं होतं. म्हणून--

अंतोन ख्रिस्तावाचं शाप पूर्वी वाटेंत उघड्यावर होतं. सरकारी दारूबंदी आली. आणि हें शाप झालं गडप, सुरूच्या रानांत आड चोर-वाटेला जाऊन दडलं. भाव वाढला, माल खराब झाला. आतां अन्न नसलं तर पोटाला गांठ मारून गावीत कळ काढील. पण दारू नसून त्याचं चालायचं नाहीं. तो मग अडलाच. सांजला इतक्या दूर सुरूच्या रानाकडे गावितांची उगाच नव्हती रीघ लागत.

तर्र होऊन हिरू गावीत बाजारच्या वाटेवर बसला होता, वाट बघत गोकुळाची आणि तिला शिव्या देत.

तर झुकांड्या खात कश्या गावीत तिकडून आला.

"कोणाला रे, दादा ?" कश्यानं सहज चौकशी केली.

"तुला नाहीं. तूं जा आपला. काय ?"

"छाः ! असा कसा जाईन ?"

"मग काय थोतरींत हव्यात दोन ?" हिरूनं पुसलं.

"दोन काय, चारसुद्धां खाईन. पण तिला नाहीं सोडणार. हां !" मोठ्या आवेशानं कश्यानं म्हटलं आणि हिरूच्या शेजारींच थपकल मारली.

दिवेलागणी झाली होती कावळीं कावकावत माथ्यावरून जात होतीं. वटवाघळं घिरट्या घालत होतीं. पोरं काठ्या घेऊन त्यांच्या मागं लागलीं होतीं. ओहोटीचा दर्या गोगलगाय होऊन अंग चोरून पडला होता. गावतिणी बाजाराहून परतल्या होत्या. कश्या त्यांना टवकारून टेहाळत होता. नजरेचा गळ टाकून गडी वाट बघत होता.

"कोण रे ?" हिरूनं लाळ घोळवीत विचारलं.

"डोळ्यानंच बघ कीं !"

"केलन् काय ?"

"रांड चावली रे हाताला. कचकचून–कुत्री कशी." कश्यानं सांगितलं.

"अरारा ! म्हणजे तूं केलंस काय ?" म्हाताऱ्याचं कुतूहल चाळवलं.

"तूं काय करीत होतास जवानींत ?"

"पण मी म्हातारा झालों रे कश्या ?" हिरू गावीत हळहळला आठवणी रवंथ करूं लागला.

"मी आहे तरणा, काय ! तिला कळलं पाहिजे हें. ह्या कश्या गावितानं जिला धरली ती हरलीच. हां !"

आणि बाजूच्या वळणावर पोरींचा कल्कलाट ऐकूं आला. गोकुळाचा टिपेंतला आवाज हिरू गावितानं ऐकला. घोरणीच तो ! वानरासारखा बाजूला निवडुंगाच्या फडांत तो तोंड दडवून बसला. पोरटीला उगाच वाटायला नको कीं म्हातारा आपल्या मागावर असतो.

कश्या लटपटत्या पायांनीं वाटेंत आडवा आला. गावितांच्या पोरी दचकल्या, बावरल्या. कोंबड्यांसारख्या भुरभुर तुरतुर गलका करीत इकडे तिकडे उडाल्या.

डरली नाहीं गोकुळा. ती जागच्या जागीं उभी ठाकली. कश्याकडे तिनं तुच्छ नजरेनं बघितलं. विचारलं, "कुत्र्या तूं ?"

"कुत्रीं हीं—हीं अशीं चावतात." तिनं चावा घेतलेला हात पुढं करीत कश्या ओरडला.

"आन् माणसं मग हीं–हीं अशीं पिसाळतात. हूंः ! हो वाटेचा बाजूला !"

"वाट तुझ्या बाची नाहीं."

"तुझ्या सुद्धां नाहीं. चल हट् !"

कश्या आधींच तर्र होता. त्यांत ही भर पडली. आणि त्याचा विचार गेला, आवर उरला नाहीं. वेड्यानं सरळ गोकुळाच्या पदराला हात घातला. हिसक्यानं खसकन् ओढला.

म्हणजे तिला सुद्धां कल्पना नव्हती. कश्या गावीत वाईट खराच ! पण या थराला तो जाईल असं तिला वाटलं नव्हतं. मनाची नाहीं, निदान जनाची तरी लाज मेल्याला असेल असा तिचा तर्क होता. आणि तो चुकला होता. डोईची पाटी भिरकावून दोन्ही हातांनीं तिनं पदर पकडला. सर्व शक्ति पणाला लावून गोकुळानं तो घट्ट धरून ठेवला.

रात्रंदिन आम्हां युद्धाचा प्रसंग....!




युद्धविराम (CEASE-FIRE) भांडी फेकीनंतर




कश्याला तें आव्हान वाटलं. त्याला चेव आला. जिद्द पेटली. भांडणतंट्यांत पक्का मुरब्बी तो. त्यानं हिक्मत केली. पदर हिसकून घेण्यासाठीं गोकुळा जोर करूं लागलेली बघून एकदम त्यानं तो सोडून दिला. गोकुळा वेसावध, लाज सावरण्यांत गुंतलेली. तोल जाऊन धाडकन् ती बाजूला पडली, जमिनीवर आदळली. हसत, गर्जना करीत कश्या गावीत तिच्या अंगाला झोंबला. ओरडला, " हिथं चव्हाट्यावर तुझी अब्रू घेतों."

बरोबरच्या पोरी आकान्त करीत होत्या, "अरे धांवा, धांवा—"

निवडुंगाच्या फडांत दडून हिरू गावीत सगळा प्रकार बघत होता—बघतच होता. पुढं होऊन या कश्याला आवरावा असं त्याला वाटलं नाहीं. सुचलंहि नाहीं. कोण, कुठला हा कश्या ? म्हाताऱ्याला तो दिसतच नव्हता. दिसत होती गोकुळा. आणि...आणि तरणाताठा हिरू गावीत. मुर्दाड वर्तमानकाळ त्याच्या कुडींत मुडदा होऊन ताठ पडला होता. रगेल अन् रंगेल भूतकाळ मात्र जिवंत होऊन डोळ्यांच्या खाचांत वावरत होता...

बोभाटा ऐकला आणि दर्यासारखा मंगा गावीत धांवून आला. कश्या गोकुळाच्या अंगाशीं झोंबलाय हें दिसलं मात्र आणि दर्यासारखाच तो अवधाण उसळला. खडकावर लाट फुटावी तशी त्यानं ताडकन् कश्यावर झेंप टाकली. बारा रेड्यांचं बळ त्याला चढलं होतं. मानगूट धरून कश्या गावितालां त्यानं सरळ वर उचलला आणि दिला भिरकावून. कश्या धडपडत उठतो न उठतो तर मंगा धांवत जाऊन त्याच्या छातीवर जाऊन बसलासुद्धां....

कश्या गावितार्चीं शंभर वर्षं भरलींच होतीं. नशिबाचा खबरदार म्हणून बचला. लोकं धांवून आलीं. तीं मध्यें पडलीं. मंगाला मुश्किलीनं त्यांनीं बाजूला केला. कश्याला सोडवला.

मंगा कश्याच्या छातीवर चढला आणि तशी निवडुंगाच्या फडांत एका मुडद्याला शुद्ध आली. छाः छाः ! हिरू गावीत नाहीं हा ! हिरूनं असा मार खाल्ला नसता, कधींच नाहीं. हा कांहींच नव्हे, असे एक एक तंटे त्यानं काढले आणि माजवले. पण हिरू नेहमींच जिंतला. मार आणि माघार घेतलीच नाहीं कधीं....आणि ही जाणीव झाली तसं म्हाताऱ्या हिरूच्या डोळ्यांतलं आठवणीचं धुकं विरलं. उरला फक्त गहिंवर, पाण्याचे थंड थेंब. डोळे चोळत अन् उसासे टाकत, दांत पडलेल्या नागासारखा तो वळवळला. त्याचं वय झालं होतं. हातापायाच्या शिरा चिपाड झाल्या होत्या. त्यांतील रक्त आटलं होतं. अंगांत रग नव्हती, नुसतं मांस-थलथलीत, लोळागोळा. डावा पाय अर्धवट लुळा पडलेला. सारं तेल जळून गेलं होतं.

आणि तरीहि वात जळत होती...

थूः थूः करीत पाय ओढीत हिरू गावीत पुढं झाला. मानेचा फणा उभारून गोकुळाकडे त्यानं बघितलं. आधीं पाचकन् थुंकला आणि मग बोलला, " हात् रांडे ! चव्हाट्यावर आडवी पडलीस गो ? "

"एक झाला. पण हा दुसरा राक्षस राहिलाच कीं रे ? "

असं म्हणून गोकुळा खो खो हसत सुटली.

पाटी उचलून धांवलीच ती घरला. पोर जाम खूश होती. शरीर-मन हरखली होती. निःसंग सुखावली होती. सिद्ध तिला पावला होता.






अनुक्रमणिका





त्यानं तिची लाज राखली होती, काज केलं होतं. तिचं माणूस तिचंच होतं. अगदीं तिच्यापाशींच होतं. सिद्धानं पडताळा दिला होता.

गोकुळाला वाटलं होतं मंगा तिच्या मागोमाग घरला येईल. पण वेडाच तो, रोजच्याहून त्यानं उशीर केला. आणि कधीं नाहीं ते बाप लेक आज बरोबर आले होते.

रोज पाव्हण्यासारखा बाहेर पडवींत बसून रहायचा मंगा. आज तो सरळ आंत शिरला. माजघरांतून तिनं तें पाहिलं वाटतं. आणि लाजून ती आंत रांधूच्या कुडींत शिरली. मुद्दामच पाठमोरी होऊन विस्तव विझवूं लागली.

पण मंगाला तेवढाहि धीर निघाला नाहीं. त्यानं मागच्यामागं तिचा हात धरला, तिला ओढली. चूल फुकट पेटत होती. ती कांहीं विझवूं दिली नाहीं त्यानं गोकुळाला.

"पुरे रे, आहे टाऊक!" गोकुळानं लटक्या रागानं म्हटलं, "मंगा, कां रे पातळ केली होतीस माया!"

तिला उत्तर दिलं हिरूनं, "चूप रांडे!"

"म्हाताऱ्या, तूं का मध्यें आलास?" गोकुळा फडफडली, "जा बाहेर, नळी घेऊन बैस. तुझं काम नाहीं हिथं!"

"काम नाहीं कसं? आहे. तुझा हा गोरागोमटा मुखडा नाहीं बघवत मला."

"मग काय करणार आहेस! डाग देणार आहेस ह्या तोंडाला!" तिनं चेष्टेनं विचारलं. आणि तिरप्या मानेनं मंगाकडे पाहिलं. गुलुगुलू हसली. टच्च ओठ मुरडले.

हिरू गाविताला तें आवडलं नाहीं. त्याच्या अंगाची लाहीलाही झाली. तो गुरगुरला, "तोच विचार आहे."

"जळ्ल तुझं तोंड! मंगा, सोड रे जरा. गोवर घालतें ह्याच्या तोंडांत." मंगानं तिचा हात सोडला नाहीं. उलट जोरानं हिसडला. चिडून तो म्हणाला, "गोवर खाल्लास रांडे तूंच!"

हा जड अन् जाड आवाज गोकुळाच्या ओळखीचा नव्हता. तो मंगाचाच कीं काय म्हणून तिनं चमकून त्याच्याकडे पाहिलं.

"दारू प्यालास तूं मंगा—कां—कां?" तिनं दुभंगून विचारलं.

मंगानं उत्तर दिलं नाहीं. कारण नव्हतं. तो पुरुष होता. काय हवं तें करायला मोकळा होता.

"आएची मरतानाची शपथ मोडलीस?" गोकुळानं आठवण दिली.

तसं हिरूनं मध्ये तोंड घातलं, "बापाचा हुकूम."

"बाप नाहीं, राक्षस आहेस तूं मेल्या?"

मंगानं तिच्या दोन थोबाडींत हाणल्या. दम दिला, "दादाला शिवीगाळ करूं नको."

गाल चोळीत अन् डोळे फाडफाडून गोकुळा मंगाकडे बघूं लागली. तो—तो तिचा मंगा नव्हता. त्याच्या रूपानं कोणी दुसराच होता. आणि ती याला ओळखत नव्हती.

"पोरा, अरे तुझ्याकडे बघत उभी आहे ती." म्हाताऱ्यानं मंगाला सावध केलं. दारूच्या नशेंत त्याला सगळा उलगडा झाला होता. "अडव तिला. बघूं देऊं नकोस. चेटूक करील—ही चेटकीण! सिद्धाच्या खडकावर कश्याला तिनं तेंच केलं. आणि मग तुझ्या बापाला. हिथं, माज घरांत ही बघा नागडी उभी रे मंगा. म्हातारा मी, पण राहिली बघत. चेटूक—चेटूक केलन्."

"हात् रांडेची!" दारूच्या तारेंत मंगाला स्वतःची अक्कल आणि धोरण उरत नव्हें. दुसरा काय सांगेल ते पटे. मग कोणी सदुयांत उडी टाक म्हटलं, तरी टाकील. इतका बेफाम होई तो. त्याच्या आएला हें माहीत. म्हणून तर मरतांना तिनं मंगाला शपथ घातली होती—"दारू सोड."

तर हिरू गावींत तावातावानं सांगत होता, "मंगा, माझ्या धुरपदीला हें माहीत. काय? म्हणून अन्ताला पोरा तिनं तुला शपथ घातली. काय? तर ह्या सटवीला सोड. आतां दारूच्या नशेंत हिच्या नादीं लागलास तर? तेव्हां दारू सोडायला सांगितलन् तुझ्या आएनं. पण हें खरं नाहीं –म्हणजे दारूचं. नको लक्ष देऊंस. हां!"

दादाचं म्हणणं मंगाला बरोबर पटलं. तो मोठ्यानं हसला. म्हणाला, "अशी युगत होती तर आएची! आं! काय रे गाढव मी? हात्तेच्या! हिच्या नादाला मी घरा लागीन?"

गोकुळाला त्यानं गदगदां हलवून सांगितलं, "लक्षांत ठेव हें चेट-किणी." ती शून्यदृष्टीनं त्याच्याकडे बघत होती. दगड होऊन उभी होती. मुद्रेवर भाव नाहीं, अंगाची हालचाल नाहीं.

आणि म्हाताऱ्यानं लेकाला फर्मान सोडलं, "बाहेर माजघरांत ओढ तिला. चिमटा निखाऱ्यावर टाकून येतोंच मी."

मंगानं गोकुळाला हाताला धरुन खेचली. निमूट ती गेली. माजघरांत खाटेवर त्यानं तिला आदळली. निर्जीव पोत्यासारखी गोकुळा टेकली

रात्रंदिन आम्हां युद्धाचा प्रसंग....!



तोफखाना (ARTILLERY)




अनुक्रमणिका

मागं हिरू गावीत पाय घासत आलाच. गचांडी देऊन थेरड्यानं तिला खाटेवर पाडली. दोघांनीं मिळून तिचे हातपाय खाटेला घट्ट बांधून टाकले. फुकट गांवाला कळायला नको म्हणून हिरूनं तिच्या तोंडांत बोळा कोंबला.

गोकुळानं प्रतिकार केला नाहीं. करावासं वाटलंच नाहीं तिला. तिची इच्छाशक्तीच मुळीं मेली होती. राग, चीड, ओरड—सगळ्या भावना आणि संवेदना सुन्न आणि बधिर झाल्या होत्या. स्वत्वाची जाणीवच आंतल्या आंत सरून अन् मरून गेली होती. नाहींतर काय ?

हिरू गावितावा मात्र कोंब्यासारखा जोर चढला होता. ढुळ्या पायाची शुद्ध नव्हती, वयाची बुध नव्हती. पोराहून पोर झाला होता तो. आतुरला होता काय ? फुरफुरला होता किती ! लाळ चघळीत म्हातारा पचापचा थुंकत होता. चाळवून खाज काढीत होता. आंबट ढेकर देत सुटला होता.

डोक्यांत दारूची नशा, तरी मंगाच्या काळजांत मळभ धरलं होतं. अंधारून आलं होतं. लखकन् एक वीज चमकली. गोकुळाची तिरडीच बांधली होती जशी. समोर त्या खाटेवर. अन् तसा तो थरारत हादरला.

उचंबळून मंगानं बापाला म्हटलं, "दादा—"

"काय ?"

"ती मरेल—बिरेल !"

"मरते कशानं ?" एखाद्या ढोराची परीक्षा करावी तसा गोकुळाकडे बघत म्हातारा म्हणाला, "अंगानं बरी खबरदार आहे. पांचसहा चिमटे सहज पचवील. काय ?"

"पण —" पुढं बोलायला मंगाची जीभ अडखळली.

"हात् तुझी ! कसला रे माझा लेक तूं !" हिरू उसळला.

"जरा दर्यावर जाऊन बसतों, दादा." मंगानं भीतभीत म्हटलं.

"मेलास तूं ! जा हो चालता. अरे नालायका, जायचं असलं तर रांडेकडे जा !"

मंगा बाहेर धांवला. आणि कुठं काळोखांतून मग तो ओरडला, "तिच्या तोंडावर डाग नको देऊंस, दादा."



मॅचिंग

लेकाची ती सूचना ऐकली आणि हिरू गावीत सैतान कसा हाः हाः करीत मोठ्यानं हसला. डोळ्यांत उन्हं पेटलेलीं, जौळाच्या घोंघावणाऱ्या आवाजांत तो एकटाच बडबडत होता, "पोरा, मला आहे ठाऊक ! सगळं, सगळं—कुठं, कसा न् काय ? ह्या हिरूला कोणी शिकवूं नका. हां ! कपाळावर एक—"

बाहेर काळोखांत मंगा कुठं मसणांत जाऊन दडला होता त्यालाच ठाऊक ! कोंब्यानं बांग दिली. जवळच कुठंतरी भालू गळा काढीत वर रानाकडे निघाली. आणि तशीं कुत्रीं एकदम केंकाटत उठलीं.

दार उघडं बघून मंगाला आश्चर्य झालं. बाहेर पडवींत बांकड्यावर बाप दिसला नाहीं तसा तर धक्काच बसला त्याला. दोनच टांगांत त्यानं माजघर गांठलन्. डबरा मिणमिण पेटत होता.

खाटेवर गोकुळा पडली होती, खिळून—जखडून. हातपाय बांधलेलें, तोंडांत बोळा, फक्त चोळी आणि नेसूं अस्ताव्यस्त, नव्हे—नसल्यासारखंच.

मंगा माणसांत होता. दारूच्या नशेंत नव्हता. गोकुळाची ती अवस्था बघून त्याला भडभडून आलं, मेल्याहून मेल्यासारखं झालं. तडक तो खाटेकडे धांवला. प्रथम त्यानं तिच्या तोंडांतला बोळा काढला. आणि तो तिच्या हातापायाच्या गांठी सोडायला लागला. तिच्याकडे तसं बघतांना त्याला लाज वाटली नाहीं, शरम झाली नाहीं.

गोकुळानंच विचारलं, खोल दूर दूर जाणाऱ्या स्वरांत. "काय बघतोस मंगा ? तापल्या चिमट्याचे डाग ? नाहीं दिसणार. दिलेच नाहींत."

त्यानं दीर्घ निःश्वास सोडला, "दादा कुठं गेला गो ?"

"तो काय !" तिनं खालीं जमिनीकडे बोट दाखवलं.

आणि तेव्हां मंगाचं लक्ष गेलं.

खालीं लोळागोळा झालेला हिरू गावीत अंग हलवीत आणि बरळत जमिनीवर पडला होता. नुसताच ताल धरला होता त्यानं. एकहि शब्द स्पष्ट निघत नव्हता. पांढरे डोळे वर आढ्याकडे लागले होते.

डोळे ताठ करून आणि आ वासून मंगा बघत राहिला.

जड आवंढा गिळत गोकुळानं म्हटलं, "अर्धांग झाला आहे त्याला. कां तें विचारूं नकोस. लहान नाहींस तूं ! एकदां नव्हे, दोनदां नव्हे—वय झालेलं. पण भान नाहीं राहिलं. बिचारा—"

"बिचारा हा—हा ? मग राक्षस, सैतान कोण गो ?" मंगा चवताळला. आवेगानं बापावर त्यानं लाथ उगारली.

"हां खबरदार मंगा—"

खाटेवरची उठून गोकुळा तीरासारखी धांवली. हिरूच्या अंगावर बेधडक ती आडवी पडली. ओरडली, "ह्या देहाचा मालक आहे तो. असा मुडदा होऊन पडला तरी गोकुळा त्याचीच आहे."









# एक आनंद

—वसंत सबनीस

*नाटक संपूर्ण शंभरटक्के यशस्वी झाल्याचा आनंद निराळा! केवळ प्रयोगदृष्ट्या यशस्वी होणें हाहि निराळा; पण नाटक पाडण्याचा म्हणून एक आनंद असतो. हा आनंद परमेश्वरस्वरूप आहे.... !*

माणसाच्या अनेक अवस्था असतात. पशु, पक्षी वा फुलपांखरू यांनाहि विविध अवस्थांतून जावें लागतें. पण नाटक ही एकच वस्तु अशी आहे की जिच्या फक्त दोनच अवस्था असतात. एक तर तें पडून राहतें किंवा उभें राहतें. तें उभें राहून पुढें चाललें वा पडलें तरी या दोन अवस्थांच्या बाहेर जात नाहीं. जगांत ज्यांच्याबद्दल गैरसमज फार असतात त्यांत स्त्रिया आणि नाटक यांचा क्रमांक वरचा लागेल. किंबहुना नाटकाचा क्रमांक पहिला लागेल. नाटक लिहिणें वा तें समर्थपणें उभें करणें हें अत्यंत अवघड काम आहे हा एक सर्वांत मोठा गैरसमज नाटकाच्या वाट्याला आला आहे. निदान महाराष्ट्रांत तरी नाटक यशस्वी कसें करावें या प्रश्नाचें उत्तर देण्यास तीन कोटि लोक सहज पुढें येतील. याचें कारण महाराष्ट्रांत यशस्वीं नाटकें थोडीं झालीं असलीं तरी यासंबंधीं यशस्वी चर्चा अमाप झाली आहे. महाराष्ट्रांतील नाट्यसंस्थांची नुसती संख्या जरी विचारांत घेतली तरी नाटक उभें करणें अवघड आहे असें कुणीहि म्हणूं शकणार नाहीं. निवडणुकीला जितक्या सहजपणें माणसें उभीं राहूं शकतात तितक्या सहजपणें नाटकें उभीं राहतात.

तेव्हां नाटक उभें करणें वा यशस्वी करणें हा साधा सरळ पण सोपा सोपान आहे. त्यांत अलौकिकत्व कांहीं नाहीं. किंबहुना तमाम नाट्यसंस्था हेंच करण्यासाठीं धडपडत असतात. त्यांच्यासाठीं नाटक कसें बसवावें, कसें लिहावें, तें कसें चालवावें, तें कसें उचलावें हें सांगणारे प्रायोगिक व तात्त्विक ग्रंथ अनेक आहेत ते वाचून नाटकाचें जें कांहीं करावयाचें असेल ते करतां येतें. त्यासाठीं तपश्चर्येची गरज नाहीं. जें सगळ्यांना जमते ते अवघड असूंच शकत नाहीं, हा सरळ सिद्धांत आहे.

तेव्हां नाटक उभें करणें वा यशस्वी करणें यापेक्षा अत्यंत अवघड अशी एकच गोष्ट आहे आणि ती म्हणजे नाटक पाडणें. नाटक पाडणें ही सकृद्दर्शनी वाटते तितकी सोपी गोष्ट नाहीं. नाटक पाडणें सोपें आहे हाहि नाटकासंबंधींच्या गैरसमजाचाच एक भाग आहे. तथापि या ठिकाणीं एक गोष्ट स्पष्ट केली पाहिजे. नाटक पाडण्याची क्रिया दोन दिशांनी होत असते. रंगमंचाच्या दिशेनें आणि प्रेक्षागृहाच्या दिशेनें. पैकीं प्रेक्षक हा तसा सहनशील प्राणी आहे आणि आक्रमक वृत्तीचा नाहीं. तो आपणहून नाटकाचे पाय ओढीत नाहीं. पण नाटक डळमळूं लागलें कीं मग मात्र तें पाडायला मुक्तकंठानें हातभार लावतो. त्यांतहि प्रेक्षकाचा मार्ग अत्यंत श्रेष्ठ. तो नाटक पाडण्यासाठीं थिएटरमध्यें येण्याचे श्रम घेत नाहीं. तो आला नाहीं कीं नाटक पडतें. तेव्हां नाटक पाडण्यासाठीं प्रेक्षकांना मुळींच श्रम पडत नाहींत. तेव्हां पाडण्याची अवघड जबाबदारी पडते ती संस्थेच्या चालकांवर आणि नटवर्गावर. त्यांच्या परिश्रमांना सीमा नाहीं. आजपर्यंत नाटक यशस्वी करण्यासाठीं किती प्रयास पडतात याचींच रसभरित वर्णनें वाचकांना वाचावयास मिळालीं आहेत. त्यामुळें ही दुसरी बाजू वाचकांना कधींच कळलेली नाहीं. नाटक पडलें म्हणजे अनेकजण हंसतात. हंसणाऱ्याचे दांत तेवढे जगाला दिसतात. पडणाऱ्याचे कष्ट दिसत नाहींत. म्हणून हा खटाटोप.



'नाटक कसें पाडावें' या गंभीर विषयावरील पडदा उघडण्यापूर्वी थोडी नांदी आवश्यक आहे. 'पाडण्या'चा विचार करण्यापूर्वी थोडा 'पडण्या'चा अभ्यास अपरिहार्य ठरतो. 'पडणें' ही क्रिया वा क्रियापद नैसर्गिक आहे. उदा० पिकलेलें फळ पडतें. तेव्हा नाटकहि पिकलें नसलें तरी 'पडणें' नैसर्गिक आहे. जें उभें आहे तें केव्हां ना केव्हां तरी पडणारें असतें. मग तें घर असो, झाड असो वा नाटक असो. म्हणजेच 'पडणें' हा निसर्गधर्म झाला. पण 'पडण्यां'त क्रिया असली तरी क्रियाशील असा कोणीहि नाहीं. 'पडणें' हें स्वयंभू असतें. उलट 'पाडणें' ह्या क्रियापदांतून निसर्ग निघून जातो आणि उरतो तो फक्त माणूस. 'म्हणजे 'पाडण्यां'त पाडणारा आणि पडणारा किंवा पडणारे अशा दोन गोष्टी हव्यात.








अनुक्रमणिका

### लेखकांच्या नाना 'कळा': संगीत समीक्षक



**जिथें रंगले धुंद गानी स्वरांच्या**
**किती दाद देती खडी मैफल**
**तिथें पेंगतो लावतो खर्ज नाना**
**मुखा वासुनी मागुती त्रेदिल**
**तरी अग्रणी छापुनी ती समीक्षा**
**'कुठें हे घराणें—कसे ते तराणे'**
**किती राग नामावली हा उगाळी**
**परि जाणते जाणती त्या उणे.**

याचाच नाऱ्याच्या भाषेंतील अर्थ असा कीं 'पडणें' ही एकपात्री ॲक्शन आहे आणि 'पाडणें' हें किमान दोनपात्री नाट्य आहे. 'नाटक पाडणें' ह्या शब्दप्रयोगात तर क्रिया, क्रियाशीलता व क्रियापद आहे एवढेंच नव्हें तर क्रियाकर्मांतराचीहि कृतकृत्यता आहे.

तेव्हां 'पडणें' व 'पाडणें' यांतील भेद सुज्ञांच्या सूक्ष्मपणें व सर्वसामान्य वाचकांच्या ढोबळपणें लक्षांत आलाच असेल. तथापि हें विवेचन येथें पुरें होऊं शकत नाहीं. क्षणभर 'पडणें' सोडून देऊन 'पाडणें'चा आणखी खल (पाडण्यांतील खलप्रवृत्तीहि या ठिकाणीं ध्यानांत यावी) करावा लागेल. मराठी भाषा प्रगत होत आहे असें भाषाशास्त्रज्ञ म्हणतात. अनेक शब्दांना नव्या अर्थांचे कोंब फुटले आहेत. 'पाडणें' हा त्यापैकींच एक भाग्यवान शब्द. अलीकडे अलीकडे 'पाडणें' हें क्रियापद विधायक व विनाशक अशा दोन्ही अर्थांनीं वापरलें जातें. 'त्यानें दोन तास बसून सहा कविता पाडल्या' अशी भाषा वारंवार ऐकूं येते. या वाक्यांत कविता पाडण्याची वृत्ति विघातक (वाचणाऱ्यांच्या दृष्टिकोनांतून) असली तरी कृति विधायक आहे. येथें कविता 'पाडली' असली तरी जन्म घेते. उलट त्यानें दोन तासांत वीस आंबे पाडले' असें आपण जेव्हां म्हणतों त्यांतील वृत्ति कदाचित् क्षुधाजन्य असेल वा सूडजन्य असेल पण कृति मात्र विनाशक असते.. तेव्हां जें दृश्य आहे तें 'पाडणें' हें विनाशक 'पाडणें' आणि जें दृश्य नाहीं तें पाडणें हें विधायक 'पाडणें' असा हा भेद सूक्ष्म आहे. यांपैकीं विनाशक 'पाडण्या'च्या दृष्टीनें नाटकाचा विचार आपल्याला करावयाचा आहे.

इतका खोल विचार करण्याचें कारण पाडण्यांतील अवघडपणा वाचकांना पटावा हेंच आहे. केवळ 'पाडणें' हें क्रियापद समजावून घेणें इतके विकट आहे मग प्रत्यक्ष क्रिया किती विकट असेल! एखादें घर पाडण्यासाठीं दहा माणसें पुरलीं नाहींत तर वीस लावतां येतात. एखादा पूल पाडण्यासाठीं सुरुंगाचा उपयोग करतां येतो. पण नाटकाचें तसें नाहीं. येथें नाटकांत असतील तेवढींच पात्रें वापरावीं लागतात. जास्त आणतां येत नाहींत. सुरुंगाचाहि उपयोग करतां येत नाहीं. कारण त्यामुळें नाटकाऐवजी थिएटर पडण्याचा धोका असतो. तेव्हां ह्या सर्व मर्यादा लक्षांत घेतां नाटक पाडणें कसें अवघड आहे हें ध्यानांत यावें.

यादृष्टीनें आजपर्यंत बारकाईनें अभ्यास करून जे सर्वसामान्य निष्कर्ष निघाले आहेत ते मार्गदर्शक स्वरूपाचे ठरतील याबद्दल मुळींच शंका नाहीं. होतकरू नाट्यसंस्थांच्या चालकांना याचा अंशतः उपयोग झाला तरी काम झालें असें म्हणावयास हरकत नाहीं. मी स्वतः संस्थाचालक.या नात्यानें जे मार्ग अवलंबिले त्या अनुभवांचाहि फायदा मला या लेखनकर्मासाठीं उपयोगी पडला. त्या अनुभवांचा मी ऋणी आहे.

## नाटक

नाटक पाडण्याचें एकदां ठरल्यावर सर्वांत पहिली गरज नाटकाची असते. नाटक हातांत असल्याशिवाय तें पाडण्याची बात फजूल आहे. प्रेमप्रकरण हें जसें स्त्रीशिवाय घडूंच शकत नाहीं तसें नाटकाचें प्रकरण नाटककाराशिवाय होऊं शकत नाहीं. सबब नाटकासाठीं नाटककार धरावा लागतो. नाटककार शोधणें हें एके काळीं फार अवघड होतें. म्हणे! आतां हें प्रकरण तितकेंसें अवघड नाहीं. रस्त्यांतून जातांना स्त्रियांकडे पाहण्याऐवजी बारकाईनें पुरुषांकडे पहात राहिलें असतां नाटककार सापडणें अवघड नाहीं. हातांत जाड वह्या (बहुतेक तीन) घेऊन वधूपित्यागत चिंताक्रांत चेहरा करून नाट्यसंस्थांची स्थळांच्या आस्थेनें चौकशी करणारा इसम नाटककार आहे असें बेधडक समजावें. थोडेंसें चुचकारून त्याची पाठ खाजवली की तो संकोच सोडतो. थोड्याच वेळांत आपल्याजवळ नाटक असल्याचेंहि कबूल करतो. त्याला तसाच टॅक्सींत किंवा व्हिक्टोरियांत घालावा आणि घरीं वा संस्थेच्या कचेरींत न्यावें. बैलगाडीसारखें वाहन मात्र टाळावें. कारण नाटककाराला सुरुवातीपासूनच हादरे देणें बरें नव्हे. ॲम्ब्युलन्स ओळखीची असली तरी तिचा वापर यावेळीं करूं नये. कारण प्रयोगानंतर नाटककाराला पोचविण्यासाठीं तीच लागणार असते. तेव्हां ओळखीचा फायदा फार न घेणें इष्ट. नाटककार वेळ नाहीं म्हणतो, सवडीनें येईन म्हणून सांगतो, जरा घाईत असल्याची बतावणी करतो, पण तो सगळा नाटकाचा भाग असतो. त्याला आग्रह करावा. मग मुकाट्यानें येतो. त्याला नाटक वाचावयास सांगावें. दोन कप चहांत तीन अंक सहज बसतात. (कांहीं नाटककार एका अंकाला तीन कप या दरानें चहा मागतात म्हणून हा तपशील दिला आहे.) नाटक ऐकावें. दोनचार गण्येगंप्येहि सोबत असल्यास उत्तम. नाटक बऱ्यापैकीं आहे आणि यशस्वी होण्याची शक्यता आहे असें दिसल्यास हातचें सोडूं नये. नाटककार तसा भोळा असतो. त्याच्यापुढें नाटकाच्या यशाचीं भव्यचित्रें रंगविलीं कीं त्याचे हात स्वर्गाला लागतात. तो पावसाळ्यांत उघड्यावर पडलेल्या खडीसाखरेसारखा जागच्या जागीं विरघळूं लागतो आणि नाटकासकट आपल्याला चिकटतो. चार महिन्यांत शंभर प्रयोग करून दाखवूं असेंहि सांगावें. (फक्त खबरदारी एवढीच घ्यावी कीं प्रयोगांची संख्या महिन्यांच्या एकूण दिवसांपेक्षां फार जास्त असणार नाहीं.) या ठिकाणीं नाटकाच्या निवडीबद्दलहि चार शब्द सांगणें आवश्यक आहे.

## नाटकाची निवड

नाटकाची निवड ही महत्त्वाची बाब आहे. यासाठीं दृष्टि अत्यंत चोखंदळ व साफ असावी

लागते, कारण फार चांगलें नाटक पाडण्यासाठीं निवडल्यास तें पाडूं म्हटलें तरी न पडण्याची शक्यता असते. गुंडगुळ्या बुडाच्या बाहुली-सारखे तें पाडण्याचा प्रयत्न केला तरी पुन्हां उभें राहतें. सबब फार चांगलें नाटक पाडण्याच्या दृष्टीनें निरुपयोगी असतें. तें एखादवेळां सर्व प्रयत्नांवर बोळा फिरवून यश देण्याचा धोका असतो. अगदीं वाईट नाटक निवडल्यास त्यांत आपल्याला पाडण्यासारखें कांहींच नसतें. नुसतेच श्रम होतात. आधींच दुसऱ्यानें मारलेल्या वाघाजवळ बंदूक घेऊन उभा राहून फोटो काढवून घेण्यासारखेंच तें निरर्थक असतें. ढिसाळ भिंतीला धक्का लागला व ती भिंत पडली तर त्याचें श्रेय धक्क्याला नसून भिंतीला असतें हें लक्षांत टेवावें.

म्हणून वाईट नाटकहि पाडण्याच्या दृष्टीनें बाद ठरतें. आणि त्यामुळें कदाचित् आपल्यावरहि बरबाद होण्याची पाळी येते. हें केव्हांहि अनिष्ट. नाटक पाडून आपण राहिलों पाहिजे. तेव्हां पाडण्यासाठीं निवडावयाचें नाटक बऱ्या-पैकीं असावें. जरा चांगलें असलें तरी चालेल. म्हणजे असें कीं तें यशस्वी होऊं शकेल अशी नाटककाराला आशा दाखवितां आली पाहिजे आणि त्याचबरोबर तें पाडण्यांत आपल्याला यश मिळेल याची खात्री असली पाहिजे· या दृष्टीनें निवडीचें महत्त्व लक्षांत घ्यावें. नाटक निवडण्यांत घोटाळा झाला वा चूक झाली तर पुढें नाटक पाडण्यांत होणारा आनंद गमावून बसावें लागतें. म्हणून नाटक निवडतांना फार विचार करावा. चार लोकांनीं 'हें नाटक चालेल' असा अभिप्राय दिल्यास तें पाडण्यांस योग्य आहे असें समजावें. अर्थात् हें ज्ञान अनुभवानें अधिक काटेकोर होतें. म्हणूनच नाट्यसंस्थेच्या चालकानें एक दोन बऱ्या वाईट नाटकांत कामें केलेलीं असावींत.

### पात्रयोजना

नाटक यशस्वी करण्यासाठीं पात्रांची निवड करतांना जितका चोखंदळपणा आवश्यक असतो त्यापेक्षां पाडावयाच्या नाटकासाठीं पात्रयोजना करतांना अधिक चोखंदळपणाची गरज असते. कारण कांहीं नाटकें, सर्व प्रकारची खबरदारी घेऊनहि अशीं चिवट आणि काटक निपजतात की एकट्या चालकांना वा दिग्दर्शकाला पडतां पडत नाहींत. अशावेळीं पात्रांची मदत घ्यावी लागते. तेव्हां पात्रांची निवड करतांना नाटक समर्थपणें पाडण्यास उपयोगी पडतील अशीं बलदंड पात्रें निवडावींत. या बाबतींत नामवंत सिनेमा नट वा 'वृद्धत्वी निज यौवनास जपते' अशी सिनेमा नटी यांचा हमखास गुण येतो. सिनेमांतील नटांना वा नटींना आपली भाकरी वा साडीचोळी नाटकावर अवलंबून नाहीं याची खात्री असते. शूटिंगमुळें त्यांना तालमी टाळणें सहजसाध्य असतें. शिवाय त्यांची 'नाइट' प्रयोगापासून सुरू होत असल्यामुळें तालमीसाठीं 'दिवस' देणें त्यांच्या दृष्टीनें फायद्याचें नसतें. ही मंडळी नामवंत असल्या-मुळें त्यांना तालीम, श्रम वा पाठांतर यांपैकीं कशाचीहि गरज नसते हाहि एक फायदा असतो. त्यांना नांव टिकवावयाचें असतें तें सिनेमांत. त्यामुळें नाटकाच्या बाबतींत त्यांना कसलीच चिंता नसते. तेव्हां सिनेमाचें नांव सांगून नाटकाचें गांव पाहायला येणारी ही मंडळी नाटक पाडण्याच्या कामांत उत्साहानें सहभागी होतात असा जाणत्यांचा अनुभव आहे. पात्रयोजनेच्या बाबतींत सर्वसाधारण नियम असा कीं जीं पात्रें नियमितपणें ताल-मीला येऊं शकणार नाहींत अशीं पात्रें अधिक खात्रीशीर असतात. नियमितपणें व प्रामाणिकपणें तालमीला येणाऱ्या पात्रांवर कडक नजर ठेवावी. त्यांच्यापासून सदैव सावध राहावें. अशीं माणसें नकला पाठ करून नाटक पाडण्याच्या कामांत अडथळे आणतात.

### दिग्दर्शक

'दिग्दर्शकाचें यशापयश हेंच नाटकाचें यशापयश' (एक टीकाकार) या सूत्रावरून नाटक फक्त यशस्वी करायला दिग्दर्शक लागतो असें समजण्याचें कारण नाहीं. नाटक पाडण्या-साठींहि दिग्दर्शकाची गरज असते. मात्र नाटक पाडण्यासाठीं योजावयाचा दिग्दर्शक नाटकाबद्दल बरेंच बोलणारा पण नाटकांतलें थोडेसें कळणारा असा असावा. तो बरेंच बोलणारा असला तर तालमीचा बराच वेळ तो एकटा खाऊं शकतो. हातांतील नाटकाच्या तालमी न घेतां पूर्वी आपण बसविलेल्या नाटकांच्या तालमींबद्दल तो अखंडपणें बोलत राहतो. ही बाब फायद्याची ठरते. दिग्दर्शकाला नियमितपणाची अनिष्ट संवय नसावी. तालमीला सर्व पात्रें नेहमीं हजर राहतां कामा नयेत अशी दिग्दर्शकाला आधींच ताकीद द्यावी. तसेंच ज्या दिवशीं जास्त पात्रें हजर असतील त्या दिवशीं दिग्दर्शकाला कांहीं-तरी दुसरें महत्त्वाचें काम निघालेंच पाहिजे. दिग्दर्शकहि सिनेमाक्षेत्रांतील असेल तर दुधांत

एकदम साखर व केशर पडल्यासारखें होईल. त्यायोगें पहिला फायदा असा होतो कीं नायक-नायिका आणि दिग्दर्शक या तिघांनाहि नाटकाचें सोयरसुतक रहात नाहीं. तालमींचे अनेक तास चित्रपटांच्या चर्चेत हंसत खेळत निघून जातात.

## तालमी

कुणाला वाटेल नाटक पाडण्यासाठींहि तालमींची गरज असते का किंवा कां असते? एखाद्या पहेलवानाला कुस्तींत पाडायचें झालें तर मेहनत पाहिजे का नको? अर्थात पाहिजेच. मग दोन पात्री कुस्तीसाठींहि मेहनतीची गरज असते तर अनेक पात्री नाटक पाडण्यासाठीं तालमींची आवश्यता नाहीं असें कसें म्हणतां येईल? तालीम न करता नाटक पाडणे हे लग्न न करतां घटस्फोट घेण्यासारखें विसंगत आहे. तेव्हां तालमी पाहिजे तर थोड्या कराव्यात पण तालमी भरपूर केल्याचा गवगवा करावा किंवा तालमीच्या वेळीं सतत पैपाहुणे वा बघे येत राहतील अशी व्यवस्था करावी. कांहीं वेळां त्यांना बोलवावें आणि बोलत ठेवावें. साहजिकच गप्पा वाढतात. कां कुणास ठाऊक पण इतर वेळीं न रंगणाऱ्या गप्पा तालमीच्या वेळीं एखाद्या नाटकासारख्या रंगत जातात. तालमी नेहमींच्याच असतात रंगणाऱ्या गप्पा नेहमीं मिळत नाहींत. सबब गप्पांवर जोर देऊन तालमी कमजोर कराव्यात.

आपण भारतीय लोक लोकशाहीचे पुरस्कर्ते असल्यामुळें लोकशाहीची परंपरा सर्व क्षेत्रांत पाळणें ही आपली नैतिक जबाबदारी आहे. नाट्यसंस्था, नाटक वा तालमी याहि लोकशाहीच्या बाहेर राहूं शकत नाहींत. तेव्हां तालमींत संपूर्ण लोकशाही असावी. त्यामुळें दिग्दर्शकास दिग्दर्शकगिरी करण्यास फारसा वाव मिळत नाहीं. प्रत्येक पात्राला गमनागमन-स्वातंत्र्य, उच्चारस्वातंत्र्य, आचारस्वातंत्र्य आणि अभिनयस्वातंत्र्य असलें पाहिजे. 'स्वातंत्र्यातच कलागुणांचा विकास होतो' असें अनेक नेत्यांनीं अनेक प्रसंगीं सांगितलेलेंच आहे. सर्वांना मनःपूत स्वातंत्र्य दिल्यानें अभिनयांत विसंवादित्व आलें तरी विसंवादांतहि संवादित्व राहतें. शिवाय नाटकांत विविधता येते आणि या विविधतेंतून नाटक पाडतांना एकात्मता प्रत्ययास येते. साहजिकच पात्रांना स्वातंत्र्य दिल्यानें दिग्दर्शकाच्या सूचना पाळण्याचें नैतिक बंधनहि त्यांच्यावर येत नाहीं. सिनेमा कलावंत यादृष्टीनें स्वयंभू लोकशाहीवादी वा स्वातंत्र्यवादी असतात. चित्रपटांत कामें करकरून त्यांच्या तोंडाची अभिनयाची चवच गेलेली असते त्यामुळें ते चांगला अभिनय करतील अशी मुळींच भीति नसते. वेळ मारून नेण्याचें तंत्र त्यांनीं आत्मसात् केलेलें असतें.

तालमी किती घ्याव्यात याचा निश्चित आंकडा सांगणें कठीण आहे. पण नाटक यशस्वी करण्यासाठीं जेवढ्या तालमी लागतात तेवढ्या घ्यायला हरकत नाहीं. तालमीप्रमाणें रंगीत तालमीचीहि क्रिया उरकावी. ती एवढ्यासाठींच कीं नाटक पाडण्याच्या दृष्टीनें कांहीं उणीवा राहिल्या असल्यास त्या प्रयोगापूर्वीं कळाव्या. मुख्य पात्रांच्या नकला प्रयोगापर्यंतहि पाठ होऊं शकत नाहींत. तसा त्यांना शापच असतो. सबब रंगीत तालमीच्या वेळी ८ ते १० पार्श्वसूचक किंवा प्रॉम्प्टर असावेत. अर्थात् प्रॉम्प्टर आणि रंगीत तालीम यांचा परस्परांशीं तसा कांहींहि संबंध असूं नये. प्रॉम्प्टरनें तालमीकडे लक्ष न देतां आपली कॉपी वाचत रहावें. पात्रांनीं प्रॉम्प्टरकडे न बघतां आपलें काम करीत रहावें. अशाप्रकारच्या रंगीत तालमीमुळें आपला आत्मविश्वास वाढतो.

तालमीच्या बाबतींत एक पथ्य मात्र अवश्य पाळावें. तें म्हणजे नाटककाराला तालमीच्या जवळपासहि फिरकूं न देण्याचें. मेलेल्या उंदराप्रमाणें तालमीचा वासहि फार दूरवर पसरतो हें लक्षांत घेऊन नाटककाराला त्या वासाच्या हद्दीबाहेर ठेवावें. यांत नाटककाराची अवहेलना करण्याचा मुळींच हेतु नसतो. उलट त्याला आपण तालमीपासून दूर ठेवतों म्हणजे यातनांतून दूर ठेवीत असतों. कारण नाटककार ही मुतानें स्वर्गाला भिडणारी जात असल्यामुळें तो तालीम पाहून प्रयोगाची कुंडली मांडीत बसतो. तो तालमीला आलाच तर सूतिकागृहांतील व्हरांड्यांत फिरणाऱ्या गलितगात्र नवऱ्यासारखा अस्वस्थ होऊन हॉलच्या बाहेर घोटाळत असतो. त्यांतून त्याची सुटका करणें फार अवघड असतें. एखाद्या कसाईखान्याकडे पाहावें तसा तो तालमीकडे पहात असतो. त्याच्या त्या केविलवाण्या नजरेमुळें पात्रांच्या पोटांत दया निर्माण होण्याची व दयेपोटी तालीम नीटनेटकी होण्याची भीति असते. तेव्हां त्याच्याच हितासाठीं त्याला दूर ठेवावा.

नाटकाची जाहिरात मात्र चांगली करावी. कारण चांगली जाहिरात झालेलें नाटक पडतांना अधिक मजा येते.

## प्रयोग

प्रयोगाची तारीख निश्चित करतांना कांहीं गोष्टी न चूकतां लक्षांत घ्याव्या. पात्रांच्या नकला पाठ होण्याचा संभव असेल त्याच्या दोन आठवडे आधींच तारीख प्रयोगासाठीं निवडावी. गुण हमखास येतो.

तसेंच वर्तमानपत्रांचे नाट्यसमीक्षक न चुकतां हजर राहतील अशी खबरदारी घ्यावी. जसें कांहीं भटजी केवळ उत्तरक्रियेचाच व्यवसाय करतात तसें कांहीं समीक्षक नाटकाच्याहि उत्तरक्रियेची जबाबदारी हौसेनें घेतात. त्यांना पहिल्यानें सुपारी द्यावी. ज्यांना नाट्यांतलें कळत नाहीं असे समीक्षक वेचून आणावेत.

पूर्वी गुलामांना सिंहाच्या तोंडीं देण्याची जेव्हां शिक्षा देण्यांत येत असे तेव्हां नियोजित सिंहाला ८।१५ दिवस उपाशी ठेवण्यांत येत असे. त्यामुळें शिक्षेच्या दिवशीं सिंहाला सोडलें रे सोडलें कीं तो आपल्या भक्ष्यावर एकदम तुटून पडत असे. हीच युक्ति समीक्षकांच्या बाबतींतहि वापरावी. त्यांना प्रयोगाच्या आधीं चहाफराळाला मुळींच बोलवूं नये म्हणजे ते प्रयोगावर तुटून पडतात. आपण नाटक पाडण्याचा प्रामाणिक प्रयत्न करूनहि तें पुरतेसें पडलें नाहीं तर दुसरे दिवशीं नाट्यसमीक्षक तें पाडून टाकतात. कांहीं समीक्षकांना नाटक पाडण्याचें सर्व श्रेय आपल्याकडे घ्यावयाचें असतें. तें खुशाल त्यांना घेऊ द्यावें. त्यांत आपलें वा आपल्या बापाचें कांहींएक जात नाहीं.

इतकी सर्व पूर्वतयारी झाल्यावर प्रयोग कधींहि वेळेवर सुरू करूं नये. कारण त्याला दृष्ट लागण्याचा संभव असतो. कांहीं संस्थांना आपला पडदा नवाच्या ठोक्याला वर जातो असें अभिमानानें सांगण्याची खोड असते. आपण त्या ठोक्याच्या भानगडींत पडूं नये. ठोकेच मोजून पडदा उघडावयाचा असेल तर नाटककाराच्या छातीचे ठोके मोजावेत. ते सारखे चुकत असतात त्यामुळें त्यांचा हिशेब नीट लागत नाहीं. ते बंद पडण्याच्या बेतांत आले कीं पडदा उघडावा. ठोके लगेच दुप्पट जोरानें चालू होतात. शिवाय दुसरा फायदा असा की पडदा वेळेवर न उघडल्यानें प्रेक्षकहि कंटाळतात आणि आपल्याला हवा तसा प्रेक्षकांचा मूड तयार होतो.

आपल्याला पहिल्याच प्रयोगांत अपेक्षित यश मिळवावयाचें असतें हें कधींहि विसरूं नये. चारपांच प्रयोग करून नाटक पाडण्यांत मुळींच पुरुषार्थ नाहीं. एक घाव दोन वा





अनेक ठिकाणी हेंच तत्त्व श्रेयस्कर असतें. यासाठीं मुळांतच दुसऱ्यासुद्धां प्रयोगाची उमेद मनांत बाळगूं नये आणि अशी उमेद कुणाला बाळगूं देऊं नये. वरीलप्रमाणें सर्व पथ्यें सांभाळल्यास पहिला प्रयोग संपण्यापूर्वींच नाटक पडूं लागतें आणि प्रयोग संपतो तेव्हां ते चारहि पाय वर करून सपशेल पडतें. प्रेक्षकवर्ग नाटक संपल्याच्या आनंदांत परत जातो. आपण नाटक पाडल्याच्या आनंदांत मश्गुल असतो. ह्या आनंदाला तुल्यबल असा दुसरा आनंद सापडणें कठीण. आनंद भरपूर सेवावा आणि तृप्त मनानें घरीं जावें. या सर्व आनंदोत्सवांत सहभागी न होणारा एकच जीव असतो. तो म्हणजे नाटककार, पण त्याची तमा बाळगण्याचें कारण नसतें. एक हजार लोकांच्या आनंदासाठीं एका माणसाच्या आनंदाचा बळी गेला तर त्यांत कांहींहि बिघडत नाहीं. नाटककार सुऱ्याचा मार बसल्यासारखा निपचित पडलेला असतो. त्याला ॲम्ब्युलन्समध्यें घालावा आणि घरीं पाठवावा. तो पुढें आठ दिवस शुद्धीवर येण्याची शक्यता नसल्यामुळें आपल्याला चिंता करण्यासारखें कांहीं नसतें. पहिला प्रयोग आटोपून थिएटरच्या बाहेर पडल्याबरोबर घराकडे न वळतां दुसऱ्या नाटकाकडे वळावें.

आतां कांहीं वेळां असें घडतें कीं पहिल्या प्रयोगांतून आणि नाट्यसमीक्षकांच्या टाचेंतूनहि नाटक सुटतें. पडल्याचा भास होतो. पण प्रत्यक्षांत तें पडलेलें नसतें. अशा वेळीं नाइलाज म्हणून दुसरा प्रयोग करावा. पण तो आडबाजूच्या गांवांत. तेथें वर्तमानपत्रांनीं आधींच भूमिका तयार करून ठेवलेली असते. त्यामुळें काम सोपें होतें. ह्या प्रयोगांत हमखास नाटक पडतें. नाटकाला मुळींच उत्पन्न होत नाहीं. आपल्याला वा पात्रांना परत येण्यासाठींहि पैसे उरत नाहींत. अशावेळीं नाटकाचे सेट व इतर सामान तिथेंच टाकावें. हीहि परंपरा जुनी आहे. त्यामुळें आपण चाकोरीबाहेर जातों असेंहि वाटण्याचें कारण नाहीं. अगदीं मोकळ्यां मनानें परत यावें. सेटच गेल्यामुळें तिसऱ्या प्रयोगाचा प्रश्नच येत नाहीं. सेट हालविण्याची दगदग व खर्च वाचतो.

अर्थात् नाटक पाडणें जसें श्रमाचें आहे तसेंच तें खर्चाचेंहि आहे. पण कुठलाहि आनंद मिळवायचा झाला तर त्यासाठीं किंमत द्यावी लागली तर त्यांत वाईट वाटण्याचें काय कारण आहे ! तसें पाहिलें तर आर्थिक नुकसान होत असलें तरी आपलें होत नाहीं. ज्यांच्याकडून आपण भांडवल घेतलेलें असतें त्याचें होतें. फार तर इतर किरकोळ पात्रांचें होतें, सेट रंगवणाऱ्या पेंटरचें होतें. तसें नाटककाराचेंहि होतें पण नाटककाराला आधींच सुरीची जखम झाली असल्यानें त्या जखमेवर आर्थिक नुकसानीची सुई टोचली तर अशा काय यातना होणार आहेत ? तेव्हां नुकसानीचाहि बाऊ करून घेऊं नये.

आणि तसेंच बघायचें तर जास्तींत जास्त काय होईल ? नट, पेंटर, नाटककार वारंवार पैसे मागतील एवढेंच ना ? त्यावर अत्यंत सोपा उपाय आहे. प्रयोगाच्या दुसऱ्याच दिवसापासून खिशांत कांहींहि न ठेवतां फिरावें म्हणजे कुणालाहि त्या चटकन वर करून दाखविणें सोपें होतें. नाहीं तरी खिशाचा दुसरा उपयोग काय असणार ?

तेवढ्यासाठीं परमेश्वराची बरोबरी करूं शकणारा आनंद नाट्यपाडण्यांत काय हंईल आहे ? परमेश्वर हा सर्व पृथ्वी व्यापून दशांगुळें वर उरलेला आहे म्हणे. नाटक पाडण्यांतील आनंद नेमका तसाच आहे. तो सर्वांच्या यातना व दुःखें गिळून वर दशांगुळें उरतो.



अनुक्रमणिका







# “तस्करा हाऽऽऽतीं

लोकांचीं मनें तरंगत असत. बुवा बिदागीहि भरपूर घेत. त्यामुळें सर्वजनिक उत्सवाचेंच आमंत्रण त्यांना मिळायचें. या खेपेला ते असेच चार वर्षांच्या कालावधीनंतर गोव्यांत आले होते व म्हणून त्यांच्या कीर्तनाला तोबा गर्दी झाली होती.

आमच्या गांवची मंडळी बुवांच्या कीर्तनाला दोन मैल चालत जायची. त्यामुळें साडेसात वाजेपर्यंत सर्व कांहीं आटोपून हातांत कंदील आणि पेटलेल्या चुड्या घेऊन आडवाटेनें जाऊन नवाच्या आधीं शक्यतों मुक्काम गांठावा लागे; पण या खेपेला आम्हांला उशीर झाला. आणि आमच्या गांवच्या मंडळींना पूर्वरंग संपेपर्यंत मंडपाबाहेर उभें राहावें लागलें. आम्ही पोहोंचलों तेव्हां बुवांचें “सीताराम राम चरणीं लक्ष लागो रे” हें भजन रंगांत आलें होतें. बुवांच्या गोड भजनांत तर साऱ्या लोकांचें लक्ष वेधलेंच होतें; पण त्याहून विशेष म्हणजे आज

—गोपालकृष्ण भोबे

*इतका गोड, इतका मुलायम, इतका स्पष्ट आणि गोंडस ठेका त्या पूर्वी आम्ही कधीं ऐकलेला नव्हता. आम्हां सर्वांभोवतीं त्या गोड ठेक्यानें नादाचें एक वलयच निर्माण केलें, पण तीं अमृतांत बुडविलेलीं बोटें असलें विखारी कृत्य करीत असतील.........?*

अष्टेकरांचें कीर्तन म्हटलें, कीं आसपासच्या पंचक्रोशींतल्या घराघरांत—उद्ईक लग्नमुहूर्त असल्यावर आदल्या रात्रीं जशी धांदल गडबड असते तशीच—धांदल गडबड उडायची. घरांतीलबायकामंडळींना तर—लहान मुलांची व्यवस्था, थोरांचीं जेवणें, उष्टीं खरकटीं हें सर्व आटोपून शिवाय साजशृंगार करून—रात्रीं बरोबर नवाला कीर्तनाला हजर व्हायचें म्हणजे मोठें दिव्य होतें. त्यांतून बुवा जितके ‘कीर्तनरंगीं रंगांत’ येत तितकेच थोडेसे कडक होते. नऊ म्हणजे नऊ! नवाच्या ठोक्याला कीर्तन सुरू व्हायचें आणि बाराला संपायचें. जे उशिरा आले त्यांनीं पूर्वरंग संपेपर्यंत सभामंडपाबाहेर उभें राहून ऐकावें. आंत येऊन व्यत्यय आणूं नये असा त्यांचा दंडक होता. आणि लोकहि तो मानायचे. बुवांचें कीर्तनच तसें होतें. कीर्तन कसलें! एकपात्री नाटकच तें. नवरस तिथें पार्षदांसारखे उभे असत. बुवांच्या कथानकाबरोबर

बुवांच्या साथीला जो देखणा तरुण तबलजी बसला होता त्यानें बहार उडवून दिली होती. ‘राम राम’ हीं अक्षरें तो सही सही तबल्यांतून काढीत होता. आणि नानातऱ्हेच्या लग्ग्या लावून त्या भजनाची रंगत वाढवीत होता. अक्षरशः मुरंब्याची उपमा द्यावी इतका गोड हात. त्याच्या तबल्यावरील बोल ऐकतांना मनाला गुदगुल्या होत होत्या. भजन संपलें तसा बुवांनीं आपल्या नेहमींच्या शिरस्त्याप्रमाणें ‘ख्याल’ सुरू केला. त्या ख्यालाची सम पकडतांना तबलजीनें असा एक सुंदर मुखडा मारला, कीं सभामंडपांतील सर्व लोकांनीं एकमुखानें त्याला दाद दिली. अष्टेकर बुवांनीं तिथल्या तिथें त्याचा उजवा हात पकडला आणि पटकन त्या हाताचें चुंबन घेतलें.

श्रोत्यांत चर्चा सुरू झाली. कोण हा तबलजी? कोठून आला? कोण्या गांवचा?



अनुक्रमणिका

इतके दिवस कुठें होता ? आणि शेवटीं खात्रीलायक कळलें, कीं त्याचें नांव बाजी शिरधोणकर होतें. वरींच वर्षें तो गोव्याबाहेर नाटक कंपनींत होता. नाटक कंपनी कायमची सोडून तो गोव्यांत आला होता; व यापुढें तो इथेंच राहाणार होता. माणसांत असा कांहीं दिव्य गुण दिसला, कीं आम्हीं समस्त गोवेकर मंडळी त्याच्यावरून जीव ओवाळून टाकायला तयार असतों. बाजीनें त्या दिवशीं असा कांहीं तबला वाजविला, कीं दत्ताराम नांदोडकरांनंतर इतका नखरेल, इतका सुरेल व इतका वजनदार हात ऐकायला मिळाल्याबद्दल कीर्तनाला जमलेले सर्व रसिक लोक स्वतःस धन्य समजत होते. बाजीला धन्यवाद देत होते. गोमंतक या अभिजात कलाभूमीबद्दल मतें व्यक्त करीत होते. म्हणत होते—

"गोयांक पापया दॅवालँ दॅणँच आसा. कलावान जन्मांक येंवचॉ तो गॉयांनूच ! जायतें तबलजी पळेंलॅ; पुण असलॅ पळेंलॅना ! हॉ म्हणचॅ दॅवाच्या मूर्तिकपासून नाचौपी ! हाजीं बॉटां म्हणचॅ सामन्यो ल्हायो फुरफुरतात !"

बाहेर ही अशी चर्चा चालू होती तर आंत सभामंडपांत बाजीच्या अंगांत वीज संचारली होती. रंगारंगानें तो वाजवीत होता. भजनाला निराळी लग्गी, पदाला निराळा ठेका, कटवाचा ठेका वेगळा, आर्येंत हळूच एखादी मोहक सरपट. श्लोकांत देखील 'शेर' म्हणून झाल्यानंतर कुशल तबलीया ज्या तऱ्हेनें तबल्यावर गुंजन करतो—थोडेसें—तसें वादन ...छे, छे, छे ! बाजीनें आज अगदीं कमाल केली होती. अष्टेकर बुवा तर भर कीर्तनांत बाजीच्या जादुगार बोटांची वारंवार तारीफ करीत होते.

कीर्तन संपलें तसा तबल्याची पुडी गादीनें बांधून घामानें चिंब भिजलेला बाजी सभामंडपाबाहेर आला. इतका वेळ किट्सन दिव्याच्या प्रकाशांत बारीकपणें त्याला न्याहाळतां आला नव्हता. आपले मऊशार केस तो उजव्या पंजाच्या बोटांनीं वारंवार उलटे फिरवीत होता. अंगांत 'क्रेप' कापडाचा उघड्या गळ्याचा पिवळसर सदरा आणि पांढरें शुभ्र साध्या ब्राह्मणी पद्धतीनें नेसलेलें धोतर असा त्याचा वेष होता; नाकीं डोळींहि तो नीटस होता. त्याच्या भोंवतीं कडें केलेले लोक त्याच्या असामान्य गुणाची स्तुति करण्यांत नुसते फुलले होते. आपली स्तुति ऐकली, कीं चोरटें हंसून तिरक्या नजरेनें बाजी त्या स्तुति करणाऱ्या व्यक्तीकडे पाही. एका विशिष्ट तऱ्हेची त्याची नजर होती. कुणाकडेहि तो सरळ नजरेनें पहात नसे. मान खालीं घालून आपलीं गोल गोल बुबुळें डावीकडे किंवा उजवीकडे नेऊन अगदीं कोपऱ्यांतून बॅटरीच्या झोतासारखा तो कटाक्ष टाकी. त्याचें छाती पुढें काढून सहजगत्या चालणें, दुनियेला तुच्छ लेखणारी कलती मान, वाऱ्याच्या झुळुकेबरोबर भुरभुरणारे केस इत्यादि गोष्टींनीं माझें लक्ष वेधून घेतलें. बाजी मला खूप आवडला. त्याच्या तबल्याइतकाच !

रात्रीची उमर वाढत चालली होती. कीर्तनाला आलेले अर्धअधिक लोक घरीं निघूनहि गेले होते. थोड्या वेळानें बाजीहि गेला. कुणीतरी सायकलवर पुढें बसवून त्याला हव्या असलेल्या ठिकाणीं घेऊन गेलें. आमची कांहीं जाणती मंडळी आणि उत्सवाचे चालक अष्टेकर बुवांभोंवतीं मंडलाकार बसले होते. आम्हीहि तरुण मंडळी—नुकतेच कांहींतरी विशेष ऐकल्यामुळें व स्मृति उसवल्यामुळें कांहीं जुन्या गोमंतकीय वादकांच्या आठवणी उगाळीत बाहेर उभे होतों. इतक्यांत सभामंडपांत कसली तरी शोधाशोध चाललेली दिसली. असेल बुवांची एखादी झांज किंवा टिपरी हरवलेली म्हणून आम्हीं तिकडे दुर्लक्ष केलें; पण आंतून आलेला एक माणूस म्हणाला, कीं बुवांचें बटव्यांतलें पाकीट नाहींसें झालेलें आहे. जिकडेतिकडे शोधाशोध चालली. आमच्याकडे यापूर्वीं असा प्रकार कधीं झालेला नव्हता. चोरी ही गोष्टच आमच्या परगण्याला ठाऊक नव्हती. सगळे लोक 'ठेविलें अनंतें तैसेंचि' राहाणारे होते, मग हें अचानक घडलें कसें ?

जाजमें उचलीं. कोपरे न्याहाळा. चपलांची रास उसकटा. तबला पेटीची बैठक उचला. बुवांची बारबंदी उलटसुलट करा...छे ! शोधाशोध अगदीं इरेस पेटली होती. कुणाबद्दलहि तर्कवितर्क करायला तिळाएवढी जागा नव्हती. बुवांनीं बिऱ्हाडीं जाऊन आपल्या सामानाची उलथापालथ केली. सर्व बिछाना झाडून पाहिला पुन्हा सर्वजण मंडपांत आले. शोधूं लागले. इतक्यांत मंडपाबाहेर कुणाला तरी तें पाकीट सांपडलें. "मॅळ्ळॅं ! मॅळ्ळॅं !" असा गिल्ला झाला. बुवांसकट सर्वांचा जीव भांड्यांत पडला. बुवांकडूनच धांदलींत तें पडलें असावें असा लोकांनीं समज करून घेतला. आमच्याकडे अशी गोष्ट कधीं घडणारच नाहीं या विषयावर ज्याच्या त्याच्याकडून बराच आत्मविश्वास व्यक्त केला जाऊं लागला. मागाहून कळलें कीं बुवांच्या पाकिटांतील पैशांपैकीं फक्त पांच रुपये नाहींसे झाले होते. बुवांनींच कुठें तरी ते खर्च केलेले असावेत. आणि त्यांना आठवण नसावी. तो विषय फारसा महत्त्वाचा नव्हता. हरवलेलें पाकीट सांपडलें होतें. एका परीनें गांवची अब्रू वांचली होती. पाकिटाची गोष्ट आम्ही लगेच विसरलों.

आम्ही घरीं परतलों तों फक्त बाजीच्या तबल्याचा नाद आठवत. ज्याच्या त्याच्या तोंडीं एकच विषय होता तो म्हणजे बाजी आणि त्याचें मनमोहक तबलावादन. त्याची बायाची धुं धुं घुमारी; त्याची तबल्यावरील एकसुरी चाट; त्याची सुरेल थाप. तबल्याच्या त्या तिहेरी नादांत आमचा जीव एकात्म झाला होता. त्या विशाल नादलहरींत गुरफटून गेला होता.

'लेखकांच्या नाना कळा...' :
रहस्यकथाकार

वामहातीं रोखुनिया
लुटुपुटुचें पिस्तुल
अन् नेत्रीं बांधुनिया
चिरगुट ते कदमल
कथा केल्या रहस्याच्या
शतकांनी - न अस्सल
असे- विक्रमी पहा ! तरि
म्हणती 'हॅगार्ड' हा बुझदिल.

त्या कीर्तनानंतर बाजी शिरधोणकराचा तबला आम्हांला पुढें कित्येक महिने ऐकायला मिळाला नाहीं. गोव्यांत त्याचें नांव गाजत होतें तें ऐकूं येत होतें. आज या गांवीं तर उद्यां त्या गांवीं अशी उत्सवांच्या नाटकांची साथ करीत तो फिरत होता. फक्त एकाच तालमीला तो येई आणि दुसऱ्या किंवा त्याच दिवशीं देखील तो नाटकाची साथ करी. साथीव्यतिरिक्त अनेक सुलभ सूचनाहि तो करी. सगळीं नाटकें त्याला तोंडपाठ होतीं. एखादा माणूस बेताल असला तरी बाजीच्या साथीनें त्याचें तें वैगुण्य झांकलें जाई. महिन्याचे तीसहि दिवस तो कामांत गुंतलेला असे. जो तो विचारी, "बाजीचँ नाटकांतलँ तबलँ आयकलां?" आणि नकार दिला, कीं पुढें म्हणत, "एकदां आइक पापया. कान तृप्त जातलॅ तुजॅ!"

बाजीचा तबला पुन्हा केव्हां ऐकायला मिळेल याची आम्ही चातकासारखी वाट पाहात होतों; पण संधीच येत नव्हती. आमच्या पंचक्रोशींतल्या उत्सवाच्या नाटकांची साथ करण्याकरितां त्याला आणायचे प्रयत्न झाले; पण त्याची बिदागी जास्त असल्यामुळें व उत्सव कमिटीला तें परवडणारें नसल्यानें बाजीला ऐकण्याचा योग कांहीं आम्हांला येईना. आम्हां सर्वांचे कान तर आसुसले होते. आणि एका दिवशीं ध्यानीमनी नसतांना बातमी आली, कीं आमच्या गांवापासून पांच मैलांवर असलेल्या 'पैठण' गांवांतल्या गावीत समाजाच्या दोन नाटकांची साथ बाजी शिरधोणकर करणार आहे.

त्या रात्रीं वाऱ्यासारख्या सायकली सोडून आमच्या गांवची पलटण पैठणला गेली. चढाव काढून खालीं गांवांत उतरेपर्यंत आम्हांला रात्रीचे अकरा वाजले. नाटक सुरू झाल्याचा वार आम्हांला चढावावरच ऐकूं आला होता. उतरंडीवर सायकली आल्या तशी नमनाचें पद पायपेटीवर वाजत असल्याचें स्पष्ट ऐकूं येत होतें; पण पेटीपेक्षांहि ठण्, ठण, ठण, ठण, अशी तबल्यावरील चाट कानांचे पडदे भेदून जात होती.

आम्ही परगांवचे पाहुणे नाटकाला आल्याचें कळतांच आम्हांला मंडपांत जागा करून देण्यांत आली. रंगमंचावर दोन पात्रें बोलत उभीं होतीं. साथीदारांच्या जागेत उंच फरकॅप घातलेला दणकट पेटीवाला तोंडांत पान चघळत पद गायची वाट बघत होता. त्याच्या डाव्या हाताला फिडलवर गज ठेवून एक गोरटेलेसा पोरगा बसला होता. आणि उजव्या हाताला बसलेला बाजी शिरधोणकर आपल्या मऊशार केसांवर हात फिरवीत कलत्या मानेनें तोंडावर चोरटें हास्य आणून तिरक्या नजरेनें आमच्याकडे पाहात होता.

पद सुरू झालें तसें पुन्हा एकदां आमच्याकडे त्याच तिरक्या नजरेनें पाहात–पाहा आतां कशी गंमत करतों ती–अशा अर्थानें-मानेला झटका देत बाजीनें चक्रीपेचाचा असा एक मुखडा मारला कीं चटकन् नादाचें इंद्रधनुष्य उमटलें. ताल आणि नाद एकरूप झाला. समुदायाला त्यानें उत्तेजित केलें, परंतु बाजीच्या त्या किमयेनें स्टेजवर गाणारें पात्र कालाची मात्रा न सांपडल्यामुळें निःशब्द झालें. फिडल-वाला गोरा पोरगा तर वाजवायचें विसरून तबल्याकडे आ वासून पाहात राहिला आणि फरकॅपवाला पेटीमास्तर एकवार बाजीकडे रागानें बघत आणि दुसऱ्या वेळीं त्या पात्राला इशारा करीत जोरजोरानें भात्यावर पाय मारीत पदाचा चरण त्या पात्राला सुचवूं लागला. बाजीची तिरकी नजर चोरट्या स्मितानें आमच्यावर विनोदी वार करीत होती. जाणत्या माणसांत हास्याची एक बारीक लाट उसळून विरली.

एक वेळ, दोन वेळ, तीन वेळ असें करतांकरतां प्रत्येक पदाच्या सुरुवातीलाच बाजी असे चक्रीपेचाचे चक्करदार वाजवीतच राहिला. आज त्याच्या अंगांत कोण संचारलें होतें कोण जाणे. पेटीवाल्याच्या अंगाची तर लाही झालेली होती. कारण स्थानिक लोक पेटीवाल्यालाच दोषी ठरविणार होते. त्याला चाली व्यवस्थित बसवितां येत नाहींत असें म्हणणार होते; पण दोन अंकांनंतर आम्हांला कळलें कीं बाजी आज पिऊन आला होता. जसजशी त्याला नशा चढत गेली तसतसा तो अधिकच पेचदारपणें वाजवूं लागला. आणि साऱ्या नाटकाचा त्यानें बेरंग करून टाकला. पात्रें घाबरून गायिनाशीं झालीं. पेटीमास्तरला आंतून जळफळण्याशिवाय दुसरें कांहीं करतांच येणें शक्य नव्हतें. मधून मधून रागीट मुद्रेनें त्यानें इशारे देऊन पाहिले; पण बाजीनें मनावर घेतलें नाहीं.

## लेखकांच्या नाना 'कळा' :
### ऐतिहासिक लेखक



खोलुनी वासन बांधुनी आसन
पूर्वजांची स्मृति करूनी प्राशन
अशां देउ नवी कीर्ति आराधना
कांही ना सुचे-की घेतो जुने ठिगळून

आम्हांला नाटकाची विशेष ओढ नव्हती. ओढ होती बाजीच्या तबल्याची. तेव्हां ती रात्र तियेंच एका पाहुण्याकडे राहून दुसऱ्या दिवशींचें नाटक पाहून परतायचें असा बेत करून नाटक संपल्यावर कांहीं वेळ पत्ते कुटत थकलेलीं शरिरें आम्हीं निद्रादेवीच्या स्वाधीन केलीं. सकाळीं साधारण दहाच्या सुमाराला मीच पहिल्यानें जागा झालों. बाकीचे डाराडूर झोंपले होते. ज्यांच्याकडे उतरलों होतों त्यांना उगाच त्रास नको असा विचार करून उत्सवाच्या मांडवाकडे जिथें चहाफराळाच्या दुकानांची जत्रा भरली होती, तिथें जाऊन चहा प्यावा म्हणून एकट्यानेंच निघालों. जसजसा मी जत्रेच्या जवळ आलों तसतसा पांच पंचवीस लोकांच्या जमावाचा गलका मला ऐकूं येऊं लागला. असेल त्या मांडवांतली उत्सवाची कांहीं गडबड म्हणून मी तिकडे दुर्लक्ष केलें. परंतु चहाचीं दुकानें तशींच उघडीं टाकून मालक नोकरसुद्धां सर्वचजणें त्या गलक्यांत सामील आहेत — कांहींतरी भानगड आहे, असें कळलें तेव्हां तें काय प्रकरण आहे हें पाहाण्याकरितां मीहि तिकडे वळलों. आणि काय आश्चर्य ! समोरचें रौद्र भयानक दृश्य पाहून माझ्या डोळ्यांवर माझा विश्वास बसेना. मांडवाच्या बाहेर बाजी शिरधोणकराला उघड्या अंगानें एका माडाला, विहिरीच्या दोरानें गच्च आवळून बांधलेला होता. आणि लिंगडीच्या झुडपाच्या वेतासारख्या पण अंगाचीं सालं काढणाऱ्या काठीनें एक राकट इसम सपासप त्याच्या सर्वांगावर कोरडे ओढीत होता. भोंवतालचीं सारीं माणसें मुकाट्यानें तें दृश्य पाहात उभीं होतीं. मधूनमधून कांहींतरी पुटपुटत होतीं. माझ्या मनाला एक शंका चाटून गेली. रात्रीं हा प्यायला होता. त्या कैफांत एखाद्या बाईबिईवर त्यानें हात तर टाकला आणि नसेल ना ? मी अधिक जवळ सरकलों. आणि जें ऐकलें त्यानें माझ्या कानावर जबरदस्त आघात झाला.

"पाजी, बेशरम, हल्कट, चोर ! बोल ? गळ्यांतली साखळी कुठें ठेवलीस ? बोल ! नाहीं बोलत ? घे ! घे !"

हातांतली काठी हवा कापीत अंगावर बसत होती. गुंय गुंय असा आवाज देत होती. पेटीवाला जवळच होता. म्हणत होता—

"दहा वेळां माझे पांच पांच रुपये नाहींसे झालेले आहेत. हा साथीला असतो तेव्हांच माझे पैसे नाहींसे होतात. रोज हा पैसे कमावतो. सगळीकडून याला मागणी आहे. आमच्यापेक्षां याची बिदागी जास्त आहे; आणि हा बेशरम चोरी करतो. स्वतःच्या घरच्या आई बहिणीचे देखील पैसे चोरतो हा याच्या घरचे लोक आल्यागेल्याकडे कागाळी करतात. चोपा—चोपा त्याला. त्यानंच चोरली आहे साखळी."

पायानें भाता दाबून चढवावा तसा पेटीवाल्याचा स्वर चढत होता. बाजीची तिरकी दृष्टि माझ्याकडे गेली. आणि तशा स्थितींत देखील तो चोरटें हंसला. मला दया आली. ज्याच्या हाताचें चुंबन अष्टेकर बुवांनीं घेतलें. ज्याच्या जादुगार बोटांच्या किमयेनें धुंद होऊन आम्ही कित्येक दिवस रंगलों; ज्याला आख्या गोमंतकांत तोड नव्हती; पैशाला ज्याला कधींहि कमी नव्हतें तो हा बाजी त्याच मंगल हातांनीं चोऱ्या करतो ? ज्याच्या मधानें भिजलेल्या बोटांच्या नादानें कान पावन झाले, त्याच बोटांचें दुष्कृत्य आज कानाला विटाळणार ? छे, छे ! नक्की कांहींतरी कुभांड रचलें आहे त्या पेटीवाल्यानें, पण बाजी तर एक अक्षरहि बोलत नव्हता. तो सारखा मार खात होता. त्याच्या सर्वांगावर वण फुटले होते; परंतु त्याच्या चेहेऱ्यावर मात्र मला मोह घालणारें तें चोरटें हांसूं कायम होतें.

गोष्ट अशी झाली होती, कीं रात्रीं नाटक संपल्यावर ज्या घरीं बाजीची राहाण्याची सोय केलेली होती त्या घरच्या एका लहान मुलीच्या गळ्यांतली सोन्याची सांखळी नाहीशी झालेली होती. वडीलधाऱ्या माणसांनीं दोन अडीच तास शोध केला व पुढें त्या मुलीला परोपरीनें चुचकारून विचारलें तेव्हां त्या मुलीनें सरळ बाजीकडे बोट दाखवून त्यानें सांखळी काढून घेतल्याचें सांगितलें; पण बाजीनें साफ कानावर हात ठेवले होते; व शेवटीं हा असा प्रसंग ओढवला होता. त्यांत पेटीवाल्याची साथ. मग कांहीं विचारूं नका. दिवस चढत होता तसतसें वातावरण तापत होतें. इतक्यांत कुणीतरी जोरजोरानें ओरडत धांवत आलें. "सांपडली सांखळी ! सांखळी सांपडली ! बाजी शिरधोणकरच्या सद्याच्या चोरकप्प्यांत होती !" तो मारणारा राकट इसम धांवत त्या सांखळी आणलेल्या माणसाजवळ गेला. जवळजवळ त्यानें ती त्याच्याकडून हिसकावूनच घेतली आणि बाजीकडे पाहात शिव्या घालीत दांतओठ खात तो आपल्या घराकडे वळला.

आतां बाजी केविलवाण्या दृष्टीनें माझ्याकडे पाहूं लागला. मी मध्यें पडलों. मला राहवेना. पेटीवाल्याजवळ जाऊन विनंति केली. 'तोहि कलावंत—तुम्हीहि थोर कलावंत आहांत ! चुकतो एखाद्या वेळीं माणूस. त्याच्या कलेकडे पाहून तुम्ही जाणत्यांनीं त्याला क्षमा केली पाहिजे !'

असें सारवासारव करणारें बरेंच कांहीं बोललों. पेटीवाल्याची खूप समजूत घातली आणि एकदम जाऊन बाजीच्या अंगाभोवतीं आवळले तो दोर सोडला. त्याच्या अंगावर दोरीच्या पिळाचा सांचा झाला होता आणि वळांवरील जखमांवर रक्ताचे थेंब सांकळले होते. माझे



अनुक्रमणिका

**रात्रंदिन आम्हां युद्धाचा प्रसंग....!**



**यशस्वी माघार (SUCCESSFUL RETREAT)**

त्यानें आभार मानले. थोडा वेळ त्यानें आपल्या पाठीपोटावरुन हात फिरवला. आणि तशाच उघड्या स्थितींत त्यानें एकदम धूम ठोकली. "बाजी गेला ! पळाला !" असा एकच गिल्ला झाला. कांहीं अत्युत्साही पोरांनीं त्याला अडवण्याकरितां सायकली सोडल्या; पण बाजी त्यांना सांपडला नाहीं. रात्रीचें नाटक वाजविण्याकरितां नव्या तबलजीच्या शोधांत पैठण गुंग झालें. आणि पैठणकरांच्या नाटकांत आम्हांला आतां स्वारस्य उरलें नसल्यानें सायकलीवर टांगा मारून आम्हींहि पैठण सोडलें.

पण पैठण सोडून आम्ही मात्र साफ फसलों. बाजी आतां कसला परत येतो ? झालेल्या अपमानानें कदाचित् गोव्याची हद्द सोडूनहि तो जाईल. पुन्हा या गोव्यांत, निदान या परगण्यांत तरी तो तबला वाजवायला येणार नाहीं, अशी कल्पना करीत व डोळ्यांसमोर नुकत्याच घडलेल्या त्या भयानक प्रसंगाचीं चित्रें शब्दांनीं उभीं करीत आम्ही आमच्या गांवीं निघून आलों; परंतु दुसऱ्या दिवशीं कळलें तें विपरीतच. बाजीनें त्या दिवशींच्या नाटकाची साथ केली होती. इतकेंच नव्हे तर त्यानें अशी कांहीं बहार उडवून दिली होती, कीं गांवच्या एका श्रीमंत गृहस्थांनीं त्याच्यावर वेहद्द खूष होऊन आपलें मनगटी घड्याळ त्याला बक्षीस देऊन टाकलें होतें. नाटक बेफाम रंगलें. आणि जणुं सकाळीं कांहीं घडलेंच नव्हतें अशा अर्थानें लोक वागले. उत्सवाच्या मस्तींत सारें विसरून गेले. नाटक संपल्यावर बिदागी देऊन व पुढच्या वर्षी यायचें वचन घेऊन पहांटेच्या वेळीं गांवकऱ्यांनीं बाजीला सीमेपर्यंत पोंचवला देखील होता.

मला चुटपुटहि लागली आणि आश्चर्यानें मी थक्कहि झालों. त्या सकाळचा तो प्रसंग जशाच्या तसा माझ्या डोळ्यांसमोर उभा राहिला. माझें अंगांग थरारलें. शहारलें. ते काळेनिळे फुटलेले वण. त्यावर सांकळलेले रक्ताचे बारीक थेंब. बाजीची ती करुण दृष्टि. त्याचें तें अंगांत आल्यासारखें धांवणें...या माणसाला म्हणावें तरी काय ? हा माणूस कीं कोडगा ? निर्लज्ज कीं एखादा अवलिया ? आहे तरी कोण हा ? बाजीबद्दल आतां मात्र एकाएकीं मला अनामिक अशी ओढ वाटूं लागली. अंगावर कांटा उभा करणारा त्याचा चोरीचा दुर्गुण माहीत झाला अजूनहि त्याची भेट व्हावी असेंहि वाटूं लागलें; पण नंतरचे बरेच दिवस नाटकाच्या साथींत किंवा दुसऱ्या कोणत्याहि ठिकाणीं त्याची माझी भेट झाली नाहीं. सगळीकडे त्यानें आपल्या गुणाचा आणि दुर्गुणाचा सारखाच प्रकाश पाडला होता. तो चोर होता हें लोक जाणत होते; किंबहुना त्याचें नांव सांगतांना 'बाजी चोर' म्हणूनच त्याची ख्याति झाली होती; पण हें सर्व जाणत असूनहि लोक त्याला आग्रह करकरून आपापल्या गांवीं बोलावीत होते. बाजीचा एकहि दिवस फुकट जात नव्हता.

एका दुपारीं म्हापशाला अचानक तो मला भेटला. पूर्वी मी त्याला पाहिला होता त्यापेक्षां तो चांगलाच फुलला होता. गळ्याला एक झकपैकीं रेशमी मफलर गुंडाळलेली आणि डोक्याला पांढऱ्या 'फर'ची टोपी हाच काय तो त्याच्या वेषांत नवा बदल झालेला होता. मला पाहातांच तो माझ्याकडे वळला. जणुं मागें कांहीं घडलेंच नव्हतें अशा तऱ्हेनें पण फार जवळकीनें तो माझ्याशीं बोलूं लागला. सत्तरी महालांतल्या कुठल्या तरी आडगांवीं नाटकाची साथ करायला तो चालला होता. येणारीं जाणारीं माणसें त्याच्याकडे कौतुकानें, आदरानें पाहात होतीं. अनोळखी असूनहि ओळख असल्यासारखें दाखवीत होतीं. त्याला हॉटेलांत येऊन चहा घेण्याबद्दल विनंति करीत होतीं; पण तो नाकारत होता. माझ्याशीं बोलणें हें त्याला चहापेक्षां महत्त्वाचें होतें. थोड्या वेळानें तो म्हणाला—

"तुमच्या उत्सवाचीं नाटकं होत नाहींत का?"

"होतात तर. पुढच्याच महिन्यांत रामनवमीच्या उत्सवांत आहेत. एकदोन नव्हे-चांगलीं तीन आहेत !"

"मग मला कां नाहीं बोलवत साथीला ? बघा तर खरं, अशी झक्क साथ करीन !"

"बाजी, तूं आलास तर आमचीं नाटकं पूर्वी कधीं झालीं नव्हतीं अशीं होतील. आमच्या गांवचं नांव होईल ! पण तुझी बिदागी आमच्यासारख्या छोट्या गांवकऱ्यांना पेलायची नाहीं. आमचा एक ठरलेला बिडा असतो !"

"तुम्ही द्याल ती फूल ना फुलाची पाकळी उत्सवाचा प्रसाद म्हणून मी घेईन. बिदागीसंबंधीं माझी कोणतीहि अट नाहीं. वाटल्यास तुम्ही मला कांहीं देऊहि नका; पण मला एकदा तुमच्या तिकडे वाजवायचं आहे. तुमच्या गांवाबद्दल मीं पुष्कळ चांगलं ऐकलं आहे. मग बोला, देतां का आमंत्रण ?"

बाजी इतक्या आपुलकीनें बोलायला लागला तेव्हां गांवची संमति घेऊन कळवितों असें सांगून पत्ता घेऊन मीं त्याचा निरोप घेतला. नाहींतरी बाजीला आणायचें आमच्याकडे कितीतरी आधींपासून घाटत होतें; पण हिशेबांत जमत नव्हतें. माझ्याकडून वरील घटना कळल्यानंतर मंडळी एका पायावर तयार झाली. त्याच्या दुर्गुणाचा गांवाला उपसर्ग पोहोंचूं नये म्हणून त्याला–सात दिवस तालमीचे आणि तीन नाटकांचे, असे—दहा दिवस संभाळायची भयंकर कामगिरी माझ्याकडे आली. आणि नाइलाजानें कां होईना, ही सार्वजनिक जबाबदारी पार पाडणें माझें कर्तव्य होतें. ती मला नाकारतां येणें शक्य नव्हतें. सर्वांना त्याच्यापासून सावध राहाण्याचे गुप्त हुकूम सुटले. ज्यांच्या घरांत तालमी होत त्यांना तर विशेष ताकीद देण्यांत आली आणि अशा कडेकोट बंदोबस्तांत बाजी शिरधोणकरला निमंत्रण गेलें. बाजीनें तें आनंदानें स्वीकारलें. ठरल्या दिवशीं येण्याचें वचन दिलें.

परंतु ठरलेल्या दिवशीं कांहीं बाजी आला नाहीं. गांवांतली सर्व लहानथोर मंडळी डोळ्यांत प्राण आणून त्याची वाट पाहात होती. पेटीवाला प्रतिवर्षाप्रमाणें चार दिवस आधीं हजर होता. ज्यांनीं बाजीला पाहिलेंच नव्हतें अशी तालप्रेमी मंडळी सकाळपासून ठाण मांडून बसली होती. रात्रीं ११ वाजेपर्यंत बाजी आला नाहीं. त्याअर्थी आतां तो येत नाहीं; त्यानें थाप दिली असा अर्थ करून घेऊन मंडळी निराश झाली. 'आमचा जुनाच तबलजी बरा होता. विनाकारण आम्ही याच्या नादाला

अनुक्रमणिका

लागलों', म्हणून पुढच्या तजविजेचा विचार करूं लागली; पण दुसऱ्या दिवशीं बाजी आला. म्हापशाला तो मला भेटला होता तसा प्रफुल्लित मला तो दिसला नाहीं. त्याचे डोळे खूप खोल गेले होते. कसली तरी चिंता त्याला ग्रासत असल्याचें स्पष्ट दिसत होतें. असेल नाटकांच्या जागरणामुळें! म्हणून मी दुर्लक्ष केलें. गांवांत लगेच बातमी पसरली. हां हां म्हणतां मंडळी जमा झाली. आमची 'सौभद्र' नाटकाची तालीम जोरांत चालली होती. आपले तबले बाजीनें पेटीच्या सुरांत लावून घेतले. मध्यावर आलेली तालीम आम्हीं मोडली नाहीं. तिथूनच साग्रसंगीत सुरू करावयाचा बेत केला. आणि जणुं प्रत्यक्ष प्रयोगाचाच दिवस आहे अशा भावनेनें मीं कृष्णाच्या पदाला आरंभ केला. "तस्करा हाऽऽऽऽऽऽऽतीं द्विज गोऽऽ" बाजीनें आपल्या नेहमींच्या चोरट्या नजरेचे कटाक्ष विजेरीच्या झोतासारखे सभोंवार फिरवले, माझ्याकडे पाहात आजवर मला संमोहांत टाकणारें तें चोरटें स्मित केलें, उजव्या हाताच्या बोटांवर डाव्या हातांतल्या डबींतली पावडर शिंपडली, माझी लय लक्षांत घेतली आणि–उन्हानें रंगलेल्या पावसाची सळसळ अशी एकदम सर यावी, तशी–फाड फाड एक मुखडा मारून समेवर येत अलगदपणें त्यानें धुमाळीचा ठेका सुरू केला. 'धीन् धीन् धा तीन्। धीन् धा त्रक धीन् धीन् धा धीन्.' इतका गोड, इतका मुलायम, इतका स्पष्ट आणि गोंडस ठेका आमच्या गांवांत तत्पूर्वी वाजला नव्हता. त्या मोहक ठेक्यानें भोंवतालची मंडळी देहभान विसरली. बाजी, त्याचीं व्यसनें, त्याचा तो कधीं न पाहिलेला भयानक दुर्गुण सारें सारें विसरली. त्या गोड ठेक्यानें आम्हां सर्वांभोंवतीं नादाचें एक वलयच निर्माण केलें. स्फटिकाचे मोती ओवळावे तशा त्या ठेक्याच्या मात्रा ओवळत होत्या.

तो दिवस आम्हां सर्वांनाच एक धुंद दिवस गेला. पूर्वीं कधीं न अनुभवलेली एक भारदस्त अशी नवी अनुभूति आम्हांला लाभली होती. प्रवेशांच्या बाबतींत, पदांच्या बाबतींत बाजी कांहीं चांगल्या सूचनाहि करीत होता. बाजीच्या या सद्गुणांच्या झगझगाटांत—शिवाय तो एवढा मोठा कलावंत आमच्यांत प्रत्यक्ष मिळून मिसळून वागतो यांतच आम्ही दिपून गेलों होतों. इतरांच्या पदांच्या वेळीं बाजीचें तें जिवाला चटका लावणारें वादन ऐकत मी त्याच्याजवळच बसून होतों. सुभद्रेचीं पदें तर त्यानें बेसुमार रंगून वाजविलीं. "किती किती सांगूं" 'वद जाऊं कुणाला" ओ हो हो हो! लोक स्तब्ध झाले होते. वेडे झाले होते.

तालीम संपली. बाजीची रात्रीची जेवणाची व्यवस्था आनन्दाकडे होती. त्याला बरोबर घेऊन जातांना तिठ्यावरच्या दुकानांत सिगरेटचें पाकीट घ्यावें म्हणून मी कोटाच्या खिशांत डावा हात घातला आणि पाहातों तों माझ्या खिशांतले पांच रुपये नाहींसे झाले होते. मी बाजीसमोरच सगळे खिसे तपासले. त्याच्याकडे एका डोळ्यानें पाहात मोठमोठ्यानें स्वतःशींच चारपांच वेळां पुटपुटलों देखील—"आं, माझी पांच रुपयांची नोट काय झाली? या खिशांत तर ठेवली होती मीं!" पण बाजीनें एका शब्दानेंहि 'काय झालें' असेंहि विचारलें नाहीं. मला राग आला. मीं त्याला जरा बाजूला काळोखांत आडोशाला नेलें. त्याचे दोन्ही खांदे माझ्या पंजांनीं आवळले. त्याच्या त्या चोरट्या दृष्टींत दृष्टि रोखली आणि त्याला गदगदां हालवत दबक्या पण जोरकस स्वरांत म्हणालों—

"बाजी, पैठणचा इतिहास विसरलास?

बोल, माझ्या खिशांतले पांच रुपये तूं घेतलेस कीं नाहीं ! बोल!"

प्रथम तो साफ 'नाहीं' म्हणाला; परंतु त्याचे खांदे मी इतक्या जोरांत आवळले होते, कीं आपल्या खांद्यावरचे माझे हात दूर करायला देखील त्याला हात वर उचलेनात. माझ्या पहिल्या दणक्यानेंच तो हतबल झाला होता. पुन्हा मी तितक्याच टामपणें म्हणालों–

"बोल बाजी, पांच रुपये तूं घेतलेस हें कबूल कर! मला खात्री आहे. चारचौघांना जमविण्याच्या भानगडींत मी पडणार नाहीं. कारण त्यामुळें मीच तोंडघशीं पडणार आहें; पण मी तुला अशा रीतीनं जायबंदी करीन कीं कुठंहि खूण न ठेवतां तुला तबल्यांतून निकामी करून टाकीन! बोल..."

माझे हे शब्द ऐकतांच मात्र तो चरकला. त्याच्या खांद्यांत बहुधा कळ येऊं लागली होती. मी आणखी कांहीं पुढें बोलणार तोंच तो म्हणाला—

"माझे खांदे सोडा. उद्यां पुन्हा तालीम वाजवायचीय मला. मी घेतलेत तुमचे पांच रुपये!"

"केव्हां?"

"मघाशीं सुभद्रेचं 'बद जाऊं कुणाला' म्हंटलं तेव्हांच; पण मी तुमच्या पाया पडतों. आतां गडबड करूं नका आणि मजजवळ ते पैसे परत मागूं नका. माझ्या विटांगींतून ते कापून घ्या!"

"कारण?"

"कारण विचारूं नका. आणि मी तें तुम्हांला सांगणार नाहीं. मी पायां पडतों तुमच्या. तुमच्याजवळ तरी अशी गोष्ट करायला नको होती मी. पण......"

तो खालीं वाकला आणि त्यानें घट्ट माझे पाय धरले. मला कसेंसेंच झालें. एवढा मोठा आकाशाएवढा कलावंत हा. माझे पाय धरतो. आणि यःकश्चित् पांच रुपयांसाठीं! मीं त्याला वर उचलला आणि म्हटलें—

"एवढा मोठा देवाघरचा सद्‌गुणी माणूस तूं बाजी. अशी चोरी कां करतोस?"

एवढेंच बोलून मी मुकाट्यानें त्याला जेवणाकरितां घरीं घेऊन गेलों.

पुढले जवळजवळ पांच दिवस डोळ्यांत तेल घालून मी त्याला जपत होतों. माझ्याशिवाय अन्य गांवकरी देखील त्याच्या अंवतींभवतीं फेर धरून होतेच. त्यामुळें कसलीच तक्रार निर्माण झाली नाहीं. बाजी मात्र अधिकाधिक भयानक दिसत चालला होता. कसली तरी उग्र बेचैनी त्याला छळीत होती. झाली गोष्ट विसरून जाऊन मीहि पुन्हा बाजीच्या तबल्यांत विलीन झालों होतों. नाटक उद्यांवर आलें असल्यानें त्याच्या स्थितीकडे लक्ष द्यायला मला वेळ नव्हता. त्या दिवशीं रात्रीं दहा वाजेपर्यंत रंगीत तालीम झाली असल्यानें ज्यांच्या घरीं तालीम होती त्यांच्या घराच्या बाहेरच्या ओट्यावरच मी नि बाजीनें झोपायचें ठरविलें. रात्रीं अकरा साडेअकरा वाजेपर्यंत उत्सवाच्या कामांची वांटणी करून मंडळी घरोघर निघून गेली. घरवाल्यानेंहि घराचा मुख्य दरवाजा बंद करून अडसर घातला. बाजी बाजूच्याच सोप्यावर डोकेमिटून पडला होता. मला वाटलें, दिवसभराच्या श्रमांनीं त्याला झोंप लागलेली असावी. मीं त्याला हांक देखील मारली नाहीं. कूस परतून मीहि थोड्याच वेळांत डाराडूर झोपीं गेलों.

साधारण तीनच्या सुमाराला बाजीनें मारलेल्या एका भयानक किंकाळीनें मला खडबडून जाग आली. मीच कशाला, तो सगळा वाडाच जागा झाला होता. 'काय झालं? कोण किंचाळलं?' म्हणून हातांत काकड्याचे दिवे घेऊन जो तो त्या घराच्या दिशेनें येत होता. त्या घरांतील सर्व मंडळीहि कंदील घेऊन बाहेर आली होती. ती विचित्र भयानक किंकाळी ऐकून माझें तर काळीजच उडालें होतें. यापूर्वी तशी किंकाळी मीं कधींच ऐकिली नव्हती. काळीज धडधडत्या स्थितींतच मी बाजीजवळ जाऊन बसलों. तो घामानें नुसता डबडबला होता.

"बाजी, काय झालं तुला? एवढ्या मोठ्यानें कां किंचाळलास? पाणी हवंय का तुला?"

त्यानें मान हालवून नको म्हटलें. घरांतील पोक्त बाई 'कॉफी करून आणूं का' विचारूं लागली, त्यांनाहि तो नको म्हणाला. आणि मग उठून बसून सगळ्यांकडे पाहात हंसत म्हणाला—"कांहीं नाहीं; कांहीं नाहीं. जा तुम्ही सगळींजणं. माझ्यामुळें तुम्हां सर्वांना उगाचच त्रास झाला. माफ करा मला. मला... मला एक भयानक स्वप्न पडलं...!" लोक त्याला 'मनीं वसे तें स्वप्नीं दिसे'; जागरणानें पित्ताशय वाढतो त्यामुळें स्वप्नें पडतात; एवढीं आमचीं नाटकें झालीं, कीं एरंडेल घेणें' वगैरे उपदेश करून जसे आले तसे निघून गेले. घरवाल्यानेंहि पुन्हा नीट अडसर घातला. पुन्हा सगळीकडे शांत झालें. मी अजून बाजीच्या जवळ बसलों होतों. तो भयानक भेसूर दिसत होता. पुन्हा पुन्हा चेहऱ्यावरील घाम पुसत होता. मी त्याला सिगारेट दिली. मीहि एक घेतली आणि त्याची आधीं पेटविण्याकरितां काडी पेटवून त्याच्या चेहऱ्याकडे नेली. बापरे–त्याच्या डोळ्यांचीं काळीं वर्तुळें खोल विहिरीसारखीं दिसलीं मला. मी सहानुभूतीनें म्हटलें—



**हो, हो, नक्कीच एक तर तो शार्क मासा किंवा 'लांडगा' तरी असावा**

"काय झालं बाजी, एकदम कां किंचाळलास तूं! कसलं स्वप्न पडलं तुला?"

क्षणभर तो स्तब्ध झाला. त्याची दृष्टि अवकाशांत लागली. मी पुन्हा म्हटलें "काय होतंय बाजी तुला! डॉक्टरला बोलवूं या का?" त्यानें एक दीर्घ सुस्कारा सोडला आणि म्हणाला–"गेले पंधरा दिवस मला झोप नाहीं."

"म्हं! गेले सहा दिवस तर तूं इकडेच आहेस. आमच्या तालमी तर कधीं रात्रीच्या नसतातच. त्यामुळें तुला जागरण व्हायचं कारण नाहीं!"

"जागरण असतं तर बरं झालं असतं. अशी तळमळ तरी लागली नसती. आणि असं आज अंगांत आलं तें तरी आलं नसतं. लोकं धांवत आलीं नसतीं."

"काय बोलतोस तूं! तुझी तळमळ कसली! आणि हें अंगांत येण्याचें काय प्रकरण!"

माझ्या प्रश्नाचें उत्तर देण्याकरितां त्यानें बैठक नीट केली. आसनमांडी बदलली; पण एकाएकीं श्वास कोंडल्यासारखा केवढा तरी वेळ छाती फुगवून लांब हात करून हातांच्या पंज्यांच्या विचित्र हालचाली त्यानें सुरू केल्या. काळ्या रात्रीला देखील एक स्वयंप्रकाश असतो; आणि नको असलेलें भीतिकारक तेवढें त्या प्रकाशांत अगदीं स्पष्ट दिसतें. माझ्या अंगावर भयाचा कांटा उभा राहिला. काय करावें मला कळेना. क्षणभर घरांतील माणसांना मोठ्यानें हांका माराव्या असेंहि मला वाटलें. त्याच्याजवळून दूर होऊन मी सोफ्यावर बसलों. बाजी, बाजी, अशा दबक्या आवाजांत हांकाहि मारल्या. बाजी आतां आपले पंजे जोरजोरानें एकावर एक चोळत होता. जळती सिगरेट त्यानें तशीच खालीं ठेवली होती. आतां मात्र माझ्यानें राहवेना. मी दरवाजा ठोठवावाच या निश्चयानें उठलों आणि मी तो जाऊन ठोठावणार इतक्यांत एखाद्या रवंथ करीत असलेल्या गुरासारखा फोंफों श्वास सोडीत बाजी म्हणाला—

"थांबा, तुम्ही घाबरूं नका. इथं माझ्याजवळ येऊन बसा. मला तुम्हांला कांहीं सांगायचं आहे."

अंगांत उसनें अवसान आणीत मी बाजीच्या जवळ जाऊन बसलों. त्याला लागलेली धाप संपली तेव्हां तो म्हणाला—

"माझ्यावर एक उपकार करतां का? मला पहांटे माझ्या घरीं जाऊं द्या. रात्र पडेपर्यंत नाटकाची साथ करण्याकरितां मी पुन्हा हजर राहीन."

"पण कां? नाहीं तर मी असं करतों, आत्तांच्या आत्तां जाऊन कांहीं गांवच्या मंडळींना जमवतों. ते कांहींतरी उपाय करतील. तुला जायचंच असलं तर एखाद्या गाडीबिडीची व्यवस्था करतील!"

"छे छे! तसं नको. मला तशा रीतीनं जायचंच नाहीं. मला एकट्यानंच जायचंय आणि तेंहि कुणालाहि न कळवितां."

"अरे पण असं कशाला?"

आपला भकास झालेला चेहरा माझ्या चेहऱ्याच्याजवळ आणीत घोगऱ्या आवाजांत तो म्हणाला—

"चोरी करण्याकरितां. समजलांत? चोरी करण्याकरितां! या हातांनीं उद्यां जर कांहीं थोडं तरी चोरलं नाहीं तर उद्यां तबला वाजणार नाहीं. गेले पंधरा दिवस मला ती संधि मिळालेली नाहीं. म्हणून पंधरा दिवस माझ्या डोळ्याला डोळा नाहीं. एक क्षण देखील मी झोपलों नाहीं. सत्तरीला कांहीं दिवस मी दारूच्या नशेंत काढले; पण इथं तुमच्या प्रतिष्ठित समाजांत मला तें जमायचं नाहीं. म्हणून म्हणतों मला पहाटे जाऊंच द्या. मी शक्य तों सायंकाळपर्यंत परत येतों."

माझे रोम रोम थरारले. काय बोलावें मला कळेना. माझे हातपाय कापायला लागले. आयुष्यांत कधीं असल्या विचित्र माणसाशीं गांठ पडली नव्हती. कधीं ऐकलेंहि नव्हतें. तशा स्थितींत मीं धीर सोडला नाहीं. मी म्हणालों—

"पण पांच दिवसांपूर्वी तूं माझे पांच रुपये चोरलेस. आणि पंधरा दिवस संधि नाहीं मिळाली असं कसं म्हणतोस?"

"तुमचे पांच रुपये चोरले तेव्हां मला कोण आनंद झाला होता. मी त्या दिवशीं सुखानं झोपलों असतों. माझे आठवड्याभराचे ताप संपले असते; पण...पण तुम्ही आपल्या विलक्षण ताकदीनं मला दबवलंत. मागें एकदां मला तुम्ही सोडवलं होतं, तेंहि उपकार होतेच. त्यामुळं ती माझी चोरी मी तुमच्याजवळ कबूल केली. आणि ती कबूल केल्यामुळंच माझं तें कर्म नासलं. फुकट गेलं."

"म्हणजे?"

"मी कबूल केलं नसतं म्हणजे कदाचित् तुम्ही मला चारचौघांना जमवून एखाद्या माडाला बांधून चामडी फुटेपर्यंत यथेच्छ बडवलं असतं, तरी तें चाललं असतं. तशा स्थितींत त्या रात्रीं मी सुखानं झोपलों असतों; पण कबूल केल्यानं माझ्या कर्माचं फळ मला मिळालं नाहीं. तुमचे ते पांच रुपये मी परत केले नाहींत. दिदागींतून घ्या असं म्हणालों. वाटलं त्यामुळं तरी कांहीं होईल; पण तसं झालं नाहीं. आणि त्या रात्रींहि मला झोप आली नाहीं.

तसं मला कुणी दिलेलं चालणार नाहीं. कुणाची धर्माची भीक नको आहे मला. या तबल्यावर रोजची वीस रुपये कमाई आहे माझी. पैसा मी नबाबासारखा उडवतों. मी कमवीन; मी उडवीन. मुंबईला गेलों, पांचशें रुपये देऊन अमीर खाँसाहेबांचा गंडा बांधला. खाँसाब मोठा देवमाणूस. तबल्याशपथ! त्यांनीं प्रत्यक्ष शिकवलेलं मला कांहीं आलं नाहीं. तसं तें कधींहि येणार नाहीं; पण दुसऱ्या दिवशीं त्यांनी दुसऱ्या एका शिष्याला शिकवितांना बाहेर उभं राहून मीं चोरून ऐकलं. तें तसंच सही सही खाँसाहेबांना वाजवून दाखवलं. खाँसाब म्हणाले, 'बाबा, तुम्हांला विद्या चोरायची










संवय. तुम्ही इथं राहूं नका. तुमच्या गंड्याचे पैसे परत घेऊन जा.' तिथंहि त्यांच्या एका मुसलमान शिष्याचे पैसे चोरले. तो खून करीन म्हणाला. खाँसाहेब मध्यें पडले. त्यांनीं प्रकरण मिटवलं. मी परत आलों; पण जिथं जिथं त्यांच्या शिष्यांनीं वाजविलेलं ऐकलं, तें तें चोरलं. तें सगळं लक्षांत आहे. तें काय आहे मला सांगतां येणार नाहीं; पण त्यांनीं तें बरोबर नाहीं असं म्हणावं मात्र–त्याच वेळीं या हाताचीं बोटं कलम करून टाकीन. तसं कधीं होणार नाहीं.

अनेक नाटक कंपन्या फिरलों. सगळ्यांना माझ्या तबल्यानें मोहिनी घातली; पण हातांच्या दुसऱ्या गुणानें घात केला. कुठंच टिकलों नाहीं. चोरणं आणि मार खाणं ही माझी स्फूर्ति ठरली. पोट जाळायला मी कधींच चोरणार नाहीं. मी तसला चोर नाहीं. मी हें कां करतों मला कळत नाहीं; पण तें घडलं नाहीं तर मात्र माझीं सारीं इंद्रियं आकुंचन पावतात आणि माझ्या अंगांत येतं. माझे हात शिवशिवतात, माझी छाती लाल लाल होते. श्वास कोंडतो. मग मी मिळेल तें आणि मिळेल त्याचें चोरतों. तें अमुकच असावं असा निर्बंध नाहीं. तो उपकारकर्ता असेल, मित्र, वैरी, स्त्री, पुरुष, लहान मूल, कुणीहि असेल. त्याचं मी चोरणार. माझं काम झालं कीं माझे वळवळणारे हात शांत होतात. तें होईपर्यंत माझ्या अब्रूची, आयुष्याची कशाकशाचीच मला पर्वा वाटत नाहीं.

सगळीकडे थकलों म्हणजे शेवटीं घरीं जाऊन चोरतों. आईचे, वहिणीचे, भावजयीचेहि कुणाचेहि आणा, दोन आणे आणि एक पैसा देखील. एक आणीबाणीचा मार्ग म्हणून मी तो सुरक्षित ठेवलाय. आणि नाइलाजानं आतां तिथंच जायचं मला !"

बाजीची ही विचित्र कथा ऐकून मी थिजलों होतों. हतबुद्ध झालों होतों. त्याला काय उत्तर द्यावें मला कळेना. बरें, त्याला जा म्हटलें आणि रात्र पडेपर्यंत तो नाटकाला येऊं शकला नाहींतर ! ऐन वेळीं कुणाला शोधायचं ? एखाद्या वेळीं हा मनस्ताप शमन करण्यासाठीं नशा करून तो कुठें अडकला बिडकला तर... तसं मीं त्याला स्पष्टपणें बोलून दाखविलं; पण तो उसळून म्हणाला—

"नाहीं नाहीं. तसं होणं शक्य नाहीं. तुम्हीं माझी अब्रू काढलीत, हजारों लोकांसमोर माझी शोभा केलीत, मला मारझोड केलीत, वाटेल तें केलंत तरी हरकत नाहीं. एकदां बाजीनं असा शब्द दिला, कीं प्राण गेला तरी या तबल्याच्या बाबतींत दिला शब्द मी मागें घेणार नाहीं. कारण तबला हें माझं दैवत आहे. पैठणला मी मार खाल्ला पण कबूल झालों नाहीं. सांगली त्यांना सांपडली पण माझं काम झालं. त्या रात्रीं ठरल्याप्रमाणं मी तबला वाजवला. माझं हें काम वेगळं आणि तबला वेगळा. माझं काय वाटेल तें होईल, पण दिला शब्द मोडून मी तबला वाजविला नाहीं तर मात्र त्याच दिवशीं हा बाजी–बाजी उरणार नाहीं, तर त्याचं शवच तुम्हांला दिसेल. माझी ही गोष्ट तुम्ही कुणाला सांगणार नाहीं असा मला विश्वास आहे !"

कोंबड्यानें पहिली बांग दिली तशी गांवच्या चर्चच्या घंटेचा घण असा महानाद त्या भयाण किर्र आसमंताला कापीत दाही दिशांना फांकला. बाजी उठला, त्यानं आपला सदरा अंगांत घातला. खिशांतून सिगरेट काढून पेटविली, चपला पायांत सरकविल्या आणि— "येतों मी सायंकाळपर्यंत. तुम्ही कसलीच काळजी करूं नका !"

एवढं सांगून त्या मित्र अंधारांत आपलें संकल्पित भयंकर दिव्य करण्याकरितां झपाझप पावलं टाकीत तो दिसेनासा झाला. आपल्या जादुगार हातांत चैतन्य आणण्याकरितां अमृत-वल्लीच्या शोधासाठीं तो धांवला होता.

तो गेल्या दिशेकडे मरगळलेल्या दृष्टीनें मी पहातच राहिलों. पहांटेचा तो संधिकाल मला अधिकच भिववूं लागला. एका अदृश्य भीतीचें भूत माझ्या दृष्टीसमोर वाढूं लागलें. माझे डोळे उगाचच भरून आले ज्या नियतीनें बाजीच्या हातांत लाख लाख जीवांना संमोहित करणारी जादू ठेवली त्याच नियतीनें त्याच्या त्याच हातांत एक किळसवाणी नि भयंकर उपद्रवी अशी नागडी शक्तीहि ठेवली. मी माझे डोळे त्या दिशेकडून वळविले आणि शरिराची मुटकुळी करून कुशीवर झोपलों. कसल्याहि तऱ्हेचा संपर्क आतां मला नको होता.

बाजी कुठें गेला, केव्हां गेला हें मी कुणाला सांगितलें नाहीं. फक्त कोणत्या तरी एका स्वराचा तबला कमी होता तो आणण्याकरतां तो जाऊन येतों म्हणाला एवढेंच मी गांवकऱ्यांना सांगितले. दुसऱ्या दिवशीं अगदीं नाटकाच्या वेळेपर्यंत तो आला नाहीं तेव्हां मात्र सगळ्यांचींच धाबीं दणाणलीं होतीं. त्याचा

रात्रंदिन आम्हां युद्धाचा प्रसंग...!




गृह आघाडी · (HOME FRONT)

तपास लावण्याकरितां सायकलस्वार सुटलेहि होते. मला मात्र खात्री होती. जसजशी नाटक सुरू व्हायची वेळ जवळ येत चालली तसतसा आंतून मी थोडासा बावरलों होतों; पण बाजी आला. अगदीं नमन सुरू व्हायच्या आधीं पांच मिनिटें कां होईना—आला. मी रंगपटांत रंगून बसलों होतों आणि त्यालाहि सगळे तबले सुरांत लावायचे असल्यानें तो मला भेटूं शकला नाहीं; पण "वंदन त्या ईशा" या नमनाच्या पदाचा ठेकाच इतका डौलदार वाजूं लागला, कीं सगळ्यांनाच एका नव्या नशेची उर्मि चढली. इतक्यांत सभेपासून सभेपर्यंत एक जबरदस्त मुखडा मारून जमलेल्या अफाट गर्दीकडून बाजीनें वाहवा घेतली. त्यावेळीं मला नक्की वाटलें, बाजीचें काम झालेलें आहे. आणि म्हणूनच तबलाहि वाजतो आहे. त्याच्या मोकळ्या मोकळ्या हातांनीं आतां नाना तऱ्हेचीं 'चक्रदार परणें' चौफेर उधळतील. त्याच्या चाटीच्या नादानें सारा समुदाय उन्मत्त होईल. साऱ्या दुनियेला तो आतां आपल्या नादांत सामावून टाकील. त्या बेहोषींत लोक त्याला पूजतील.....

......आतां त्याला सुखानें झोप येणार आहे. गेल्या पंधरवड्यांतली त्याची जीव जाळणारी ती भेसूर अशांति संपली आहे...!



अनुक्रमणिका

पालक वर्गास, साहित्यिकांस
टीकाकारांस व प्रकाशकांस
'चिंत्य' वाटावेत असे हे परखडपणें
मांडलेले सुविचार...

# बाल वाङ्मय

## एक चिंतन

—बाळ सामंत



सांप्रत महाराष्ट्रदेशीं बालकांविषयींचा एक नवा जिव्हाळा, नवी जाणीव नवी जवळिक दिसून येत आहे ही संतोषकारक घटना होय. बाल-रंगभूमि, बालचित्रकला, बालशिक्षण आदि नवें वाक्प्रचार आजकाल सर्वत्र रूढ होत आहेत. घरींदारीं त्याची चर्चा होत आहे. याच संदर्भात बाळवाङ्मयाची चर्चा करण्याचें ठरविलें आहे. सर्वप्रथम बाळ आणि बाल या दोन्ही शब्दांतील सूक्ष्म भेदाची चर्चा करणें अप्रस्तुत ठरणार नाहीं. बाल हा संस्कृत शब्द मोटा फसवा शब्द आहे हें वाचकांच्या ध्यानीं यावें. बालचे अनेक अर्थ संभवतात. मूर्ख, अजाण, भाबडा या अर्थाबरोबरच केस हाहि एक लोकप्रिय अर्थ विचारांत घेतला जावा. नापिकमंडळींच्या शास्त्रासंबधीचें जें वाङ्मय तें बालवाङ्मय असाहि अर्थदोष या वाक्प्रचारापासून संभवतो. यामुळें आम्ही प्रस्तुत विवेचनांत बाल्वाङ्मय हा झिजवट-सपक शब्द न वापरतां बाळवाङ्मय—हा बलदंड—बाळबोध मराठी शब्दप्रयोग विवेचनांत अंतर्भूत करण्याचें ठरविलें आहे. बाळ या शब्दाला जी अस्मिता आहे, ती बाल या शब्दाला नाहीं. बाळगोपाळ, बाळगुटि, बाळबाळंतीण, बाळहरडा, आदि शब्दांत जें वजन आहे तेंच वजन या नव्या शब्दाला यावें. "बाळा कां झोप येईना-बाळा जो जो रे, बाळ बघा बाळ, आदि लोकमान्य बाळ काव्यांतील माधुरी आतां तरी प्रतीत व्हावी. शब्दांचा चपखल उपयोग जर त्यास अर्थाची घनता कशी चढते याचें हें आगळें उदाहरण.

मराठी भाषेंत बाळवाङ्मयाला आज जें उधाण आलेलें दिसत आहे तें फसवें नटवें आहे. लोकवाङ्मयाच्या संशोधिका कु. चंडिका पुराणिक यांच्या नव्या संशोधनानें एक गोष्ट स्पष्ट झाली आहे कीं मराठींत खरेंखुरें जातिवंत बाळवाङ्मय लिहिलें जात नाहीं. याबाबत पूर्वसूरींचें कार्य लक्षणीय. बोरक् जमातींतील एक थोर संशोधक फादर टेरियर मौलविन यांचा तर्क असा आहे कीं मराठींतील अडुगलं मडुगलं, सोन्याचं कडुगलं—ही बाळकविता—बोरक् आदिवासींच्या कथेंतून उत्क्रांत होऊन आली असावी. अडुगलं-मडुगलं या कर्णकटु शब्दोच्चारावरुन ही द्राविडी संस्कृतीची आर्यांनीं केलेली उसनवारी असावी असा जो तर्क कु. चंडिका पुराणिक यांनीं मांडला त्याला डागर विद्यापीठाच्या मानववंशशास्त्राच्या प्राध्यापिका डॉ. शरावती बर्वे यांनीं दुजोरा दिला आहे. बोरक् आदिवासींचीं डोकीं तपासण्याचा त्यांना प्रसंग आला—त्यांना कांहीं जुन्या बोरक् कवट्या सांपडल्या—त्या कवट्यांचा आकार आर्यांच्या मडुगलेंसारखा (मडुगले > मडुग > मडुक > मडक > मडकें—असा अपभ्रंश) आहे हें त्यांनीं सप्रयोग सिद्ध केलें. डॉ. शरावती बर्वे यांनीं "बोरक्च्या कवट्या आणि आर्यांचें मडुगलें" या विषयावर हिंडेन्बुर्ग विद्यापीठांत जो विद्वत्तापूर्ण सखोल प्रबंध वाचला त्यावरच त्यांना डॉक्टरेट देण्यांत आली. भारतीयांची मडकें करण्याची कला प्रत्यक्ष सजीव कशी होती हा त्यांचा दावा युरोपीय शास्त्रज्ञास मान्य होण्यासारखा नसला तर चिंत्य आहे.

### कालचें बाळवाङ्मय

वरील विषयांतर किंचित पाल्हाळिक वाटलें तरी अप्रस्तुत नाहीं. कारण कु. चंडिका पुराणिक आणि डॉ. शरावती बर्वे यांच्या बाळवाङ्मया-विषयींच्या मौलिक सिद्धांताचा या लेखास पूरक म्हणून बराच उपयोग झाला आहे. प्राचीन मराठींतील परंपरेनें आलेलें बाळवाङ्मय हें अपौरुषेय वाङ्मय होतें—अलिखित होते असा त्यांचा दावा आहे. "चांदोबा चांदोबा भागलास का—निंबोणीच्या झाडामागें लपलास का

—हें अमर बाळगीत आमच्याकडील शिकंदराच्या स्वारीच्या वेळीं ग्रीकांनीं पाठ करून नेलें आणि तें साऱ्या जागतिक वाङ्मयांत आलें हा जो सिद्धांत आज रूढ झाला आहे त्याला रशियन लोकसाहित्याचे एक संशोधक बोलोव्हास्की यांनीं पाठिंबा दिला आहे. मानव आणि चंद्र यांचें हें तादात्म्य–गागारीन आणि टिटोव्ह या अंतराळ–वीरांना बालवयांतच चंद्राला गवसणी घालण्याची स्फूर्ति देऊं शकलें असें ते म्हणतात. रामचंद्राला चंद्राचा बालपणी जो ध्यास लागला त्याच्या बुडाशीं रामायणकाळीं अंतराळवीर होते काय हा नव्या संशोधनाचा विषय व्हावा. प्राचीन मराठींत ग्रंथाचा प्रसार झालेला नसल्यामुळें बाळकथांचा प्रसार म्हाताऱ्या माणसांकरवींच होत असे. तोंडाचें बोळकें झालें आहे अशी मंडळी बाळकवाङ्मयाविषयीं आपुलकीनें प्रचार करीत. बोळकें आणि बाळकें यांचा परस्पर कांहीं संबंध आहे काय हा प्रश्नहि याठिकाणीं सुचणें अपरिहार्य आहे. बाळकांच्या तोंडाचें प्रथम बोळकें असतें म्हणजे बोळकें आणि बाळकें यांचा अन्योन्य निकट संबंध दृढ व्हावा. त्या काळांत बोळकें झालेली मंडळी बाळकांना भुताखेतांच्या गोष्टी सांगून रमवीत असत असा दाखला आहे. शिवरायास राजमाता जिजामाता भुतांच्या गोष्टी सांगूनच त्याच्या अंतःकरणांत विरश्री निर्माण करती झाली अशा प्रकारची नवी माहिती नुकतीच उपलब्ध झाली आहे. (पहा वडगांवचे जगदाळे घराण्याचा पत्रव्यवहार—आणि राणे शकावलि) मराठेशाहींत भुताटकीचे वाडे असावेत अशी माहिती मिळाली आहे ("शिवकालीन वाडे आणि गढ्या—" लेखक मोरेश्वर चांदवडकर—). या भूताटकीच्या वाड्यांत वावरल्यामुळें तत्कालीन लहान बाळकांना बाळपणींच शौर्याचें बाळकडू मिळालें होतें. ("आयुर्वेदांतील बाळकडू ही औषधि आतां लुप्त झाल्यासारखी आहे. बाळवाङ्मयापेक्षां मुलांना बाळकडू पाजलें तर त्यांची उन्नति अधिक सपाट्यानें होईल—" आयुर्वेद आणि बाळरोग—लेखक वैद्य पंचाननशास्त्री कवडे) सांप्रत तरुण पिढींत शौर्याची आवड संपल्याचें दिसत आहे याचें कारण हीं भुतंखेतें बाळवाङ्मयांतून अदृश्य झालीं आहेत—या संदर्भांत रहस्यकथाकार भाऊराव वसईकर यांनीं भूतबंगला–भूतचेष्टा आदि नामांकित भूतकथा लिहून हें उपेक्षित वाङ्मयदालन समृद्ध करण्याचा प्रयत्न केला. त्यांच्याकडे उच्चभ्रू टीकाकारांनीं ढुंकूनहि पाहिलें नाहीं. मराठी वाङ्मयांत कंपूशाही—गटबाजी यांना केवढा जोर चढला आहे हें अल्पांशानें प्रतीत व्हावें.

### "तांब्यांचीं बाळगीतें"

मराठी बाळकें सांप्रत अति चौकस झाली आहेत असें महाराष्ट्राच्या मॅादाम मॉटेसरी कु. बाळूताई किरकिरे (वय वर्षें ६१) यांनीं आपल्या 'मराठी बाळकें एक अभ्यास' विद्वत्ताप्रचुर ग्रंथांत जो दावा मांडला तो खरा असावा. कारण या विद्वत्ताप्रचुर ग्रंथास सरकारी ग्रंथस्पर्धेतील चरित्र–विभागांतील तिसरें बक्षिस विभागून मिळालें होतें. प्राचीन भारतांत लहान बालकांसाठीं ग्रंथिक वाङ्मय होतें असा पुरावा नुकतेंच गडप्पा येथें झालेल्या संशोधनावरून समजतें. एखादें पुस्तक पिढ्यान् पिढ्या मुलांसाठीं वापरतां यावें अशी जबरदस्त पुस्तकें मौर्य कालांत होत असें चिनी प्रवासी चांग टू वांग यानें आपल्या प्रवासवर्णनांत लिहून ठेवलें आहे. भारतांतून परत जातांना ताम्रपटावर लिहिलेली बाळगीतें तो चीनमध्यें घेऊन गेला. कविवर्य तांबे—काव्यचर्चा या ५०० पृष्ठांच्या प्रचंड ग्रंथांत डॉ. गो. ल. डाळिबे यांनीं तांब्यांचीं बाळगीतें या प्रकरणांत या ऐतिहासिक योगायोगाचें गंमतीदार विवेचन केलें आहे तें जिज्ञासूंनीं मुळांतच वाचून पाहाण्य सारखें आहे. ताम्रपटावरील गीतें हीं जड त्यामुळें चामड्यावर—चर्मपत्रावर गीतें लिहिलीं जावीं असा एक वाद निघाला—पण भारतीयांच्या सोवळ्या ओवळ्याच्या कर्मठ कल्पनांमुळें या कल्पनेला फारसा पाठिंबा मिळाला नाहीं.

### गोड बाळवाङ्मयाची गरज

साधारणपणें वय १ ते ४ पर्यंतचीं बाळकें दिसेल ती वस्तु तोंडांत टाकण्याचा प्रयत्न करीत असतात यासाठीं या वयाच्या बाळकांना गोड बाळवाङ्मयाचा पुरवठा व्हावा. अमेरिकेंत सिनसिनाटी युनिव्हर्सिटींत या विषयावर डॉ. चाईल्ड यांनीं गेलीं कित्येक वर्षें संशोधन केलें आहे. ते म्हणतात या वयांत बाळकांना प्रत्येक गोष्ट आत्मसात उर्फ भस्मसात करण्याची अनिवार हौस असते आणि त्यांतून वाङ्मयहि सुटत नाहीं. युद्धजन्य परिस्थितींत सोनें-तांबेंसारख्या धातु वापरणें राष्ट्राला परवडणार नाहीं—यास्तव—ऑफसेट पेपरप्रमाणें चॉकोलेट पेपरचा शोध लावण्यांत कॅडबरी येथील प्रयोगशाळा गर्क आहे. १ ते ४ वर्षांच्या मुलांना सकस व्हिटामिन बी युक्त वाङ्मयाचा पुरवठा करण्याला यामुळें यश येईल. आजच्या बाळवाङ्मयांत सकस वाङ्मयाचा फार अभाव आढळतो या टीकाकारांच्या अजाण टीकेला यामुळें सणसणीत चपराक बसणार आहे. यापुढें परीकथांच्या गोळ्या, पौराणिक गोष्टींचे लाली पप्पा (हा एक लोकप्रिय खाद्यप्रकार), ऐतिहासिक गोष्टींचीं बिस्किटें—मुलांना एकाच वेळीं अभ्यासाला आणि खाण्याला देतां येतील. यामुळें आमच्या आळशी वाचकांची फारच पंचाईत होईल याची आम्हांस जाणीव आहे. बंडू चाकोलेटसाठीं हट्ट करतो, बेबीला बिस्किटें पाहिजेत, अशी वारंवार तक्रार करतां येणार नाहीं मात्र या नव्या कल्पनेचा आणखी एक तोटा म्हणजे असलें गोड वाङ्मय प्रौढांना हि खाण्याची नव्हे वाचण्याची चटक लागेल—यासाठीं "फक्त मुलांसाठीं" अशीं लेबलें लावून सरकारला कायद्यानें त्यावर कांहीं निर्बंध घालावे लागतील.

### वजनदार वाङ्मयाची गरज

साधारण वय वर्षें सहापर्यंत बाळकांचा स्वभाव अत्यंत निरागस आणि निष्पाप असतो असें बाळूताई किरकिरे म्हणतात तें मान्य करण्यास हरकत नसावी. चिनी आक्रमणाच्या वेळीं बाळूताईनीं "फाडू किंवा खाऊ" या नांवाचें वाङ्मयीन समरगीत लिहिलें होतें, तें मुलांच्या वाङ्मयीन अपेक्षा व्यक्त करणारें आहे. एकतर फाडून तरी टाकूं किंवा खाऊन तरी टाकूं—(चिनी शत्रूलाहि हें विधान बरोबर लागू पडावें—"जिंकू किंवा मरूं" या पेक्षा अधिक चपखल!) समोर आलेलें कोणतेंहि वाङ्मय फाडून तरी टाकूं किंवा खाऊन तरी टाकूं ही एक ईर्षा बाळकांच्या मनांत घर करून राहिलेली असते.—यामुळें अल्लाउद्दीन, उर्वशी, तिलोत्तमा यासारखीं चावट मासिकें आम्ही आमच्या मुलांसमोर ठेवलीं, मात्र सौभाग्यवतीच्या इशाऱ्यास किंवा आरडाओरड्यास न जुमानतां आमच्या तीन मुलांनीं या तीन चावट मासिकांचें तीन तेरा केलें. शृंगारिक आणि चावट मासिकांबाबत महाराष्ट्रांतील लहान मुलांना किती चीड आहे हें आम्ही आमच्या कोंबडीगल्ली साहित्य मंडळाचे अध्यक्ष मामा बारगीर यांना कळवतांच त्यांनीं एक खास पत्र काढून आपलें समाधान व्यक्त केलें. कारण दिवाळीच्या सुमारांत कोंबडीगल्लींतल्या कोणत्याहि सभ्य घरांत अल्लाउद्दीन, उर्वशी आणि तिलोत्तमा यांसारखीं अश्लील सद्भिरुचिहीन—




अनुक्रमणिका

चावट मासिकें दिसल्यास आम्ही आमच्या कोंबडीगल्ली साहित्य-संभेमार्फत तुमच्या घरावर मोर्चा आणूं असें मामांनीं कळविलें होतें. त्यामुळें आमच्या घरांतील मुलांनीं त्यांच्या या पत्रकाला सक्रीय पाठिंबा दिल्याचें वर्तमान कळतांच त्यांनीं लागलीच पत्रक काढून आनंद व्यक्त केला. याचा अर्थच असा कीं चावट–आणि विशेषतः हलकेंफुलकें वाङ्मय आमच्या मुलांना एकदम नामंजूर आहे. मराठी वृत्तपत्रांचा दर्जा खालावला आहे. आणि त्यामुळें मराठी वर्तमानपत्रहि त्यांच्या तडाक्यांतून सुटत नाहीं. शिवराळ अग्रलेखाच्या त्यांनीं चिंध्याच केल्या म्हणून समजा. यासाठीं मुलांच्या समोर चांगलें वजनदार वाङ्मय नेहमीं आदर्श म्हणून ठेवलें पाहिजे. आमच्या कोंबडीगल्लींतील नवकवि कुंदा चंदावरकर (कुंदा–हा मुकुंदाचा स्त्रैण अपभ्रंश) आजकाल बाळगीतें करूं लागला आहे. या बाळगीतांचा संग्रह प्रकाशित करण्याचा त्याचा मानस आहे. मी त्याला म्हटलें—मुकुंदा तुला पुस्तकच प्रसिद्ध करायचें असलें तर, तर त्याला चांगलें जाड पुठ्याचें—जाड ड्राईंगपेपर असलेलें काढ. नाहींतर आमचीं पोरें त्याची दशा करतील. मुलांच्या वाङ्मयाला मातब्बर प्रकाशकांनीं जुन्नर येथें होणारा चिवट हातकागद वापरावा. कारण त्यामुळें खादी आणि ग्रामोद्योगाला उत्तेजन मिळेल. (ही कल्पना कों. ग. सा. स. चे अध्यक्ष मामा वारगीर यांना आवडली असून त्याला पाठिंबा देणारे पत्रक ते लवकरच काढणार आहेत) आणि दुसरं असं कीं एका पुस्तकासाठीं—(कोण प्रथम 'वाट लावतो') अनेक पोरांचीं भांडणें झालीं तरी जुन्नरी कागद त्यांच्या बापाच्यानें फाटणार नाहीं–आणि पुस्तक अभंग राहील. माझ्या टेबलावर ज्ञानेश्वरी, व्यायाम ज्ञानकोश ग्रंथसूचि, लेनिनचीं व्याख्यानें इत्यादि ग्रंथसंग्रह आहे. माझीं मुलें (आणि बायकोसुद्धां) या श्रेष्ठ ग्रंथाच्या वाटेला जात नाहींत. कारण त्यांना ठाऊक आहे कीं त्यांतील एकेक ग्रंथराज त्यांचा सहज कपाळमोक्ष करावयास समर्थ आहे. त्यामुळें त्यांच्या वाटेला कुणी जात नाहीं.

### सचित्र पुस्तकें-एक विचार

बाळकांचीं पुस्तकें सचित्र असावीत असें एक मत प्रचलित झालें आहे. या विषयावर कांहीं मनमोकळे विचार मांडणें वाजवी ठरावें. आजकाल मुलांच्या चित्रकलेला उत्तेजन देण्यासाठीं कांहीं मंडळी प्रयत्न करीत आहेत. याबद्दल अभिनंदन. बालचित्रांच्या प्रदर्शनानें एक गोष्ट सिद्ध झाली कीं नामांकित चित्रकार आणि बालचित्रकार यांची मनोभूमिका जवळजवळ एकच आहे. आडव्यातिडव्या रेघोट्या, वेडेवाकडे रंग—यांच्या कसल्याहि मिश्रणानें किती अपूर्व चित्र निर्माण होऊं शकतें या चित्रकारांनीं सिद्ध केलें आहे. उलट मोठ्यांच्यापेक्षां बाळांच्या रेघोट्या अधिक सुसह्य आणि रेखीव असतात असा अनुभव. जातिवंत कलेला वयाचें बंधन नसतें हेंच खरें. आज महाराष्ट्रांतील मुलें चित्रकलेच्या बाबतींत अधिकाधिक चोखंदळ होऊं लागलीं आहेत. माझ्या तीन वर्षे वयाच्या चलाख मुलानें माझ्या ऑफीसच्या फायलीवर पेन्सिलीनें रेघोट्या ओढल्या आणि मला म्हणतो—"पपा—ही बघा मॉडर्न आर्ट!" वाचकांना ही अस्सल थाप वाटण्याचा बराच संभव आहे, पण माझ्या घरीं चित्रकला कशी पाणी भरतेय हें त्यामुळें सिद्ध व्हावें. तस्मात् मुलांना कोणतीं पुस्तकें द्यावींत हा प्रश्न खरोखरच विचारार्ह आहे. महाराष्ट्रांतील अध्यापनक्षेत्रांतील एक चिकित्सक विद्वान प्राध्यापक नंदकुमार पांगे एम्. ए. यांनीं नुकतीच पुण्यांतील सदाशिव पेठेंतील मुलांच्या वह्यांची आणि पुस्तकांची पाहणी केली. या पाहणीवरुन त्यांना असें आढळून आलें कीं शेंकडा ४० मुलांनीं आपल्या वह्यांवर मास्तरांचीं चित्रें काढलीं आहेत. (गुरुजनांविषयीं केवढा हा आदरभाव) आणि शेंकडा पंचाहत्तर मुलांनीं आपलीं क्रमिक पुस्तकें चितारून ठेवलीं आहेत (आम्ही क्रमिक पुस्तकें आकर्षक केलीं हा कांहीं प्रकाशकांचा दावा यामुळें खोटा पडावा ना!) विशेषतः इतिहासाचीं पुस्तकें फारच चिताडलीं गेल्याचें आढळून आलें. औरंगजेबाचे डोळे फोड, नूरजहानला मिशा काढ, वॉरन हेस्टिंग्जला साफ काळा कर (आजच्या विद्यार्थ्यांत राष्ट्रप्रेम, इतिहासप्रेम नाहीं असें म्हणणाऱ्या लोकांच्या डोळ्यांत चांगलें अंजन पडावें!). परवाच्या चिनी आक्रमणाचा निषेध म्हणून कांहीं राष्ट्राभिमानी मुलांनीं आपल्या भूगोलांतील चीनविषयींचा 'चॅप्टर' टरकावली (काय हें देशप्रेम!!) प्रा. नंदकुमार पांगे एम्. ए. यांच्या संशोधनामुळें एक गोष्ट स्पष्ट दिसते कीं आमच्या ८ ते १२ वयाच्या मुलांमध्यें जाज्वल्य चित्रकलाप्रेम आहे. यासाठीं क्रमिक पुस्तकांच्या प्रकाशकांना एक सूचना करावीशी वाटते—ती म्हणजे त्यांनीं पुस्तकांत अधूनमधून कोरीं पानें टाकावीत. वाटल्यास २०० पानांच्या पुस्तकाची चक्क १० रुपये किंमत ठेवावी—पण १०० पानें मजकूर आणि १०० पानें कोरीं असें प्रमाण ठेवल्यास फार उत्तम. कथाकादंबऱ्यांच्या किंमतीपेक्षां पुस्तकांच्या किंमती तुलनेनें फारच कमी आहेत—याचें कारण आमच्या प्रकाशकांचें शिक्षणविषयक उदार धोरण. (काय ही लालसा—! शिक्षणाची!)

### बाळगीतें : कांहीं सूचना

सांप्रत विद्यार्थ्यांमध्यें—वय तीन ते तेरापर्यंत सिनेसंगीताचें अनिवार प्रेम निर्माण झालें आहे. याला तोडीस तोड म्हणून गेय बाळगीतांचा प्रसार करावा अशी एक सूचना करण्यांत येते. सांप्रत 'गायन जाहलें उदंड' असा प्रकार आहे. सिनेगीतें, भक्तिगीतें नाट्यगीतें, भावगीतें–समरगीतें–घरोघर गीतें. मध्यंतरीं समरगीतांनीं उच्छाद मांडला होता. बारशापासून बाराव्यापर्यंत प्रत्येक समारंभाला समरगीतें म्हणावींत असें आवाहनयुक्त पत्रक आमच्या कों. ग. सा. स. अध्यक्ष मामा वारगीर यांनीं काढलें होतें. अशा परिस्थितींत गेय बाळगीतांचा अधिक प्रसार केल्यास महाराष्ट्राच्या शांततापूर्ण जीवनाला धोका येण्याचा संभव आहे असें मला तरी वाटतें. बाळूताई किरकिरे म्हणतात, गेय ही मानवाची सहजसिद्ध भावना आहे. डॉ. शरावती बर्वे यांना वोरक् जमातींतहि आदिवासी मुलें गानप्रिय आढळली. "निसर्गाचा



अनुक्रमणिका

तो धुंद आविष्कार पाहून, मन हेलावलें आणि शहरी संस्कृतीचा क्षणभर तरी उबग आला" असें त्या आपल्या प्रवासवर्णनांत नमूद करतात. कु. चंडिका पुराणिक यांच्या मतें जागतिक लोकसाहित्यांतील कांहीं कथासंकेत बाळगीतांमधून जोपासले गेले आणि त्याची इतर भाषांत आणि संस्कृतींत देवाणघेवाण झाली. या संशोधकांचें म्हणणें चिंत्य असलें तरी सांप्रत महाराष्ट्रीय पालकवर्गाची शोचनीय, दयनीय अवस्था लक्षांत घेता गेय बाळगीतास उत्तेजन देणें ठीक होणार नाहीं.

## थोडेसें बाळनाट्याबाबत

मराठींतील बाळनाट्य अगदींच सपक, बटबटीत आहे अशी तक्रार आहे ती खरी मानावी. आमच्या कोंबडी–गल्लींतील एक उत्साही शिक्षिका लीला धामणकर यांनीं बालरंगभूमीचा एक प्रयोग करून पाहिला. त्यांनींच लिहिलेल्या बाळनाट्याचे त्यांनीं जाहीर प्रयोग गल्लीच्या गणेशोत्सवांत करून दाखविले. अध्यक्ष मामा बारगीर म्हणाले–– "लीलाताईंचा हा नवा प्रयोग म्हणजे बाळरंगभूमीचें क्षितिज उंचावणारा आहे. या प्रयोगाच्या वेळीं इतर कोणत्याहि कार्यक्रमाचे प्रसंगीं गडबड करणारीं बाळकें शांत राहिलीं आणि कांहीं आपोआप झोपी गेलीं यांत या प्रयोगाचे आगळेंच आणि यश सिद्ध व्हावें. नाटकांत जागोजाग विनोद असूनहि एकहि मूल हंसलें नाहीं यावरून अभिनय आणि संवाद यांची रस्सीखेच दिसली. पात्रनिवड आणि प्रकाशयोजना दुबळी असल्यामुळें नाटकाचें नेटकेपण फक्त जाणकारांच्या लक्षांत आलें. एक समर्थ ठसठशीत प्रयोग म्हणून लीलाताईंचें अभिनंदन आणि प्रेक्षकांनीं कौतुक केलें नाहीं म्हणून विषादयुक्त असमाधान."

बाळनाट्याच्या अनुभवावरून माझें प्रामाणिक मत मांडतों. तें पुढीलप्रमाणें. मुलें नाटकाला झोंपतात. किंवा पालकांना बटाटेवड्यासाठीं, वेफर्ससाठीं भंडावतात, हा अनेक वर्षांचा अनुभव. दुसरी गोष्ट मुलांना मोठ्यांचा अभिनय पेलत नाहीं आणि स्वतःचेंच विडंबन आवडत नाहीं. यासाठीं हे प्रयोग उत्तेजनार्ह असले तरी त्याला मर्यादा रहावी. माझा अनुभव असा आहे कीं नाटक पाहून आल्यानंतर घरीं मुलांनीं चादरीचे पडदे केले, पार्कर इंकची शाई जमिनीवर सांडून त्याच्या गालमिशा लावल्या, मुलींनीं आईच्या पातळांची वाट लावली, आणि म्हातारा दिसण्यासाठीं माझा चष्मा नाकावर चढवला आणि नंतर फोडून मला वीस रुपयांचा गंडा बसला. नाटकाचें नांव सिंहबादचीं साहसें व त्यासाठीं समुद्राचा परफेक्ट दिसण्याकरितां दिवाणखान्यांत दोन बादल्या पाणी रिचविलें. बाहेर ज्या वेड्यावाकड्या गोष्टी मुलें पाहतात त्याचें अनुकरण करण्याचा तीं प्रयत्न करतात हें महाराष्ट्राच्या मॉंटेसरी कु. बाळूताई किरकिरे यांचें विधान मला तंतोतंत पटलें.

महाराष्ट्रांतील बाळवाङ्मयाविषयीचें जें त्रोटक विवेचन पालक वर्गास, साहित्यिकांस, टीकाकारांस आणि प्रकाशकांस उद्बोधक नच वाटलें तरी चिंत्य वाटावें. आजकाल प्रत्येक गोष्ट चिंत्य असते. चिंतामणीपासून अणुबॉम्बपर्यंत प्रत्येक गोष्ट चिंत्य आहे. त्यामुळें "बाळवाङ्मयाविषयीं कांहीं थोडें" वाचकांसमोर परखडपणें–(हल्लीं प्रत्येक विचार 'परखड' झाला आहे हें वाचकांच्या ध्यानीं यावें) मांडले आहेत त्याबद्दल क्षमा व्हावी.





—सि नि क्

*...वाटलं मनांत चिखल साचलेला आहे. पाऊस, धूसर प्रकाश, सुसाट वारा, वीज चमकली आणि त्या प्रकाशांत...होय, कमळच दिसलें...!*

दुर्गाबद्दल मला प्रत्येकजण सांगत होता. तिच्याविषयीं व्यक्त होणाऱ्या प्रतिक्रियेमधून तिची मनावर उमटावी अशी एकसंध आकृति. कांहीं तयार होत नव्हती. एक मात्र खरें कीं आमच्यापैकीं ज्यानें ज्यानें तिला पाहिलें तो तो तिच्यावर लुब्ध होता. सतत् तिचें रूप आठवावें आणि अविरत तें मनांत घोळवावें असा नाद एकदां तिचें दर्शन घेतलेल्यांना लागला होता....

वसंता तर म्हणत होता, 'ती बसमधून जातांना त्या बसखालीं आपल्याला मरण ओढवलें तरी आपण स्वतःला भाग्यवान समजूं'. टेनीसपटु अवधूत उद्गारावयाचा, 'छे, ती खेळायला आली काय किंवा पहायला आली काय;—आपल्याला वाटतें कीं तिच्याबरोबरच्या नजरेच्या खेळांत आपण सदा हरतोंच...

—तसं मीं एकदोनदां तिला पाहिलं होतं. नजर खिळवून ठेवण्यासारखं किंवा वृत्ति विथरवून टाकण्यासारखं तिच्यांत कांहीं आहे असं मला मुळींच वाटलं नाहीं.
एकतर असं कीं निव्वळ गोरीपान माणसं मला आवडत नाहींत. दुसरें असें कीं सुंदरीला लांब सडक केंस नसले तर ती मला सुंदरच वाटत नाहीं. दुर्गा पांढरी दिसायची आणि तिचे दाट कुरळे केंस आखूड होते ...

—निमनुष्य बेटावरून चालल्यासारखा दुर्गाचा डांबरी रस्त्यावरचा पदक्षेप असायचा. पण त्यांत घाई नसायची किंवा संथपणा बुद्धयाच आणला आहे असें नाहीं वाटायचें. 'दुनिया झुकती' आहे आणि ती



आपल्यामुळेंच याची जाण तिच्या हालचालींना डौल आणून होती इतर छान दिसणाऱ्या तरुणींत आपल्या लावण्याचा अभिमान असा आविष्कृत झालेला माझ्या पाहण्यांत नाहीं हें कबूल केलें पाहिजे...

दुर्गांत एक बाब मला अभावानें जाणवली. यालाच तिचे चाहते वैशिष्ट्य म्हणतात. मला तसं वाटत नाहीं. दुर्गा कमालीची साधी राहावयाची. रूपगर्विता झालेल्या तिच्या व्यक्तिमत्त्वास हा पोषाख फसवा करत होता असें मला जाणवायचें. विशेष अलंकार परिधान केलेले नाहींत आणि अंगावर सदा पांढऱ्या रंगाचेंच साधें पातळ अशी ही युवती 'दुनिया कुछ नही' चा तुच्छ आव—भाव बाळगून आहे याचा अर्थ काय ?

—दुर्गाच्या नामसंकीर्तनांत मी कांहीं केल्या सुस्वर होत नाहीं हें जेव्हां तिच्या प्रेमिकांच्या ध्यानांत आलं तेव्हां त्यांनीं माझा नाद सोडला; नव्हे मला टाकलं. मधून मधून तिच्या निमित्तानं झालेल्या भानगडी टवाळखोरांच्या कंपूंत खदखदावयाच्या पण दुर्गाची असपास चाहूल लागतांत सगळे तथाकथित पुरुष थंड पडायचे.—यामुळें मात्र माझें तिजबद्दलचें कुतूहल जागृत झालें. आस्था चाळवली गेली...

तशी माझी युवकांत ख्याति कांहीं कमी नव्हती. परन्तु ती वेगळ्या संदर्भात-मजबद्दल सहानुभूति बाळगणारे मला चक्क कार्तिकस्वामी म्हणत. त्यामुळें त्या 'गुलू गुल बोलण्यांत' किंवा त्या 'प्यार की बातें' मध्यें मला लेखीं कुणीच धरत नसावे. मात्र माझी दृष्टि कुणीकडे वळली तर त्याची साश्चर्य दखल घेतली जाई...

एके दिवशीं मी माझी गहिरी नजर दुर्गावर फेंकली, रोखली. माझ्या त्या कटाक्षानं तिला पुष्कळ गोष्टी सुनवाव्या असं मला मनोमन वाटत होतं : 'असं, असं, तुजकडे कुणी पाहणार नाहीं, मला तुझ्यांत जें दिसतं तें इतर कुणाला दिसणार नाहीं. भोगाकरितां चटावलेल्या सगळ्यांच्या नजरा केवळ तुझ्या यौवनावर झेपावतात. तुझ्यांत तुझं यौवन तेजाळणारं दैवी असं कांहीं तरी आहे. तें अक्षय आहे. तें मला दिसत आहे. तेंच मी तुझ्यांत पाहत आहे. तें ज्या वेळेस तूं पाहशील तेव्हां खऱ्या अर्थानें तूं स्त्री होशील.' परन्तु मी तिच्याकडे पाहत आहे हें तिच्या गांवींदेखील नव्हतें. माझ्या दृष्टीनें हा कांहीं साधासुधा पराभव नव्हता. मी अतिशय अस्वस्थ झालों आणि मला कांहींच दिसेना...

एकदां मी नदीचा पूर पाहावयास मुसळधार पावसांत पुलाकडे निघालों. दगाळून आणि अंधारून आलं कीं माझ्या चित्तवृत्ति उत्तेजित होतात; आणि प्रत्यक्ष विजा कडाडून पाऊस रपरपूं लागला कीं पाय घरांत ठरत नाहीं. वास्तविक उनाड वारा, गर्जणारी वीज आणि स्वैर पावसानें साऱ्यांच्या मनांत धडकी निर्माण केली होती. जो तो भ्याला होता, भ्याली नव्हती फक्त......

—माझ्या प्रथम लक्षांत आलेंच नाहीं, निळ्या रेनकोटांत कुणीतरी पाठमोरें उभें होतें. रेनकोटच्या डोक्यावरच्या भागावरून कुणीतरी स्त्री असावी हें उघड होतें आणि त्यामुळेंच...बेफाट वारा आणि आंवळून टाकणारा पाऊस यांच्या झालेल्या युतानें एकीकडे सारी अवनी न्हाऊन निघत होती तर दुसरीकडे मानवी कृत्रिमत्तेचे सारे पाश तुटत होते. झकपक पाश्चात्त्यांच्या संस्कृतीचे पाईक फजित पावन झाले होते आणि निसर्गावर मात करण्याच्या बढाया मारणारा मानव भीतीनें संरक्षणाचा आश्रय करून होता...अशा वेळेस एक स्त्री बिनधोक पुलावर उभी आहे म्हणजे चेष्टा आहे कीं काय ? मुक्त प्रकृतीची ती वर्षाऋतूतलीं ऐन रंगांत आलेलीं विलासितें बिनदिक्कत पाहावयास आलेली ही स्त्री नक्कीच त्या विद्युल्लतेच्या नाट्यांतील असावी...

—मी तिच्याजवळ आल्याचें तिच्या लक्षांत आलें असावें...तिनें वळून पाहिलें. ती दुर्गा होती ! फक्त तिचें तोंड दिसत होतें. मजकडे पाहतांच तिनें बारीक स्मित केलें. त्यावेळीं मला तें 'मुखकमल' असल्याचा प्रत्यय मिळाला. तिचा पांढरा रंग मला त्यावेळेस तेजोवलयांकित वाटला. मग तो पाऊस, तो धूसर प्रकाश, सुसाटत असलेला वारा, मधून मधून चमकणारी वीज आणि तिचें मुख...वीज पुनश्च चमकली. तिची एक काळीभोर बट तिच्या पाण्याच्या थेंबानं नटलेल्या कपाळावर वाकली होती. मला वाटलं कीं तिनं नेहमीं त्या पेहरावांत आणि त्या संदर्भातच वावरावं. किती आगळ होतं तें दृश्य किती आवाहन होतं यांत ..भासत होतं कीं शुभ्र आकाश त्या पुलावर अवतरलं आहे......
पाऊस कोसळतच होता. विजा कानठळ्या बसवत होत्या. जीव मुठींत धरल्यागत पुलावर तुरळक हालचाल होती. माझ्या डोळ्यांपुढें दुर्गा त्या स्मितासहवर्तमान होती;–तिनें पाठ फिरवली तरी...पंधरा वर्षांनंतर तिचं तें चित्र मनावर तसेंच टवटवीत आहे. तिचं नांव आणि त्या चित्राचं माझ्या मनांत समीकरण झालेलं आहे. तिचं नांव उच्चारतांच तो प्रसंग माझ्या मनश्चक्षूसमोर येतो आणि चक्राकार बनून फेर धरतो. असं अनुभवतों कीं मी मर्त्य असलों तरी दुर्गाचें तें मनावरचें चित्र कधींच पुसलें जाणार नाहीं—

—आज दुर्गा दिसली. पंधरा वर्षांनंतर दिसत होती. बसच्या रांगेत उभी होती. पुढें सरकतांना वाटलें कीं तिची चाल हातांतल्या पिशवीनें उजवीकडे कलली आहे. नेहमीं प्रसंगावर आपल्या भावनांचा आरोप करणाऱ्या मजसारख्यास वाटलें कीं तिला जीवनाचें ओझें झालें आहे. पिशवींत तिची पर्स आणि रेनकोट होता. होय, तसाच निळ्या रंगाचा. प्रथम, पूर्वीप्रमाणेंच अवतीभोवतीच्या जगाची तिला फारशी दखल नाहीं असें वाटलें पण नंतर आढळलें कीं मधून मधून ती मागें वळून पाहत आहे. परंतु ती नजर सर्वांना ओलांडून जात होती. कुणाला स्पर्शत नव्हती. काय पाहत होती? कसला वेध होता? मी तिच्याकडे पाहत होतों आणि मला वाटलें कीं माझी नजरहि तिच्या आसपास घुटमळत आहे पण तिला स्पर्शत नाहीं. तिच्या गळ्यांतलें गाठवलेलें मंगळसूत्र उठून दिसत होतें. केंसरचनेंत मुळींच फरक नव्हता. ते तसेंच होते... देहहि स्थूल झाला नव्हता...तिच्या पदर घेण्याच्या पद्धतींत मात्र बदल झाला असावा...लांब पदर होता आणि तो वरचढ न राहिलेल्या वक्षांना आवर घालण्याचा वृथा प्रयत्न करत आहे असें भासले—

—असें भासलें आणि मी कमालीचा चरकलों. पंधरा वर्षांपूर्वी माझ्या मनानें केवळ पुलावरची दुर्गाची छबी साठवली नव्हती...आणखीनहि कांहीं टिपून घेतलें होतें...तें आतांच मनाच्या पृष्ठभागावर कां आणि कसें आलें ? रांगेतला माझ्यामागचा मित्र म्हणत होता, 'ओळखलंस कां दुर्गास ? हिनं नवऱ्याला टाकलं कां नवऱ्यानं हिला टकलं असं लोक कुजबुजतात...पण बेट्या, अजूनहि चमक आहे हं.' माझ्या मनांत कालवाकालव सुरू झाली. भूतवर्तमान ही एकमेकांत शिरलीं. खटकूं लागलं कीं मनांत चिखल सांचलेला आहे. कितीतरी आठवणी त्यांत रुतल्या आहेत. डोकावून पाहूं लागलों तेव्हां मात्र वाटूं लागलं कीं मनाच्या चिखलांतून कांहीं तरी बाहेर येत आहे......होय, कमळच होतें—पुलावरची ती रेनकोटांतली सस्मित दुर्गा मजपुढें होती......








चोर बाजारांतील
एक नवी चीज

*श्री. शामराव निळकंठ ओक यांचे 'चोर बाजारांतील चिजा' हें पुस्तक प्रसिद्ध झाल्यानंतर वाङ्मयक्षेत्रांत विलक्षण खळबळ उडाली होती. कालांतरानें ती शांतहि झाली; पण आतां नव्या जोमानें नव्या चिजा निवडून ते विस्तारीत आहेत...*

# जुळ्या भावांची करणी

वकीलसाहेब, तुम्हीच मला न्याय मिळवून द्या. ही माझी पाठ बघा, काठीचे वळ आहेत, फार मार बसला मला, मी गरीब माणूस. कोर्टांत न्याय मिळत नाहीं महाराज.

म्हणजे बघा, आम्ही दोघे भाऊ आवळे जावळे, पण मी शपथेवर सांगतों कीं माझा जन्म घटकाभर तरी अगोदर झाला, मी थोरला आहें. मी वडील भाऊ, मोतीचंद लहान. जन्मपत्रिकाच सांगेल, कीं मी हिराचंद मोठा अन् तो धाकटा.

पण आम्ही दोघे दिसायला सारखे. मी नि तो नालायक मोत्या, इतके हुबेहूब एकमेकांसारखें, कीं हा कोणचा अन् तो कोणचा हें कुणाला ओळखूं येऊं नये. मी माझ्या मुलखांतल्या टोकरण गांवचा महाजन आहें सरकार, नि इमानदार असामी आहें. मीं खरं सांगतों आहें.

दोघे भाऊ वयांत आलों तेव्हां गांव सोडून या प्रांतांत आलों. इकडचे लोक बावळट, माहीतच आहे आपल्याला. गांवांत इसारपेठेंत दुकान घेतलं दोघांनीं, गोलबावडीजवळ. पण मोतीचंद बेइमान निघाला. त्यानं माझ्याशीं झगडा केला, आम्हीं दोघांनीं फारकत घेतली. त्यानं आपल्या वह्या घेतल्या, भांडींकुंडीं घेतलीं नि दुसऱ्या रस्त्यावर सावकारी सुरू केली, त्या खेडवेशीच्या बाजूला. हो, आमच्या भांडणांत हातघाई झाली होती. पण त्याची टोपी उडाली ती कांहीं मीं नाहीं उडवली. मीं टोकरणचा महाजन, मीं खोटं कशाला बोलूं? मोतीचंदानंच लबाडी केली, एक नंबरचा झूट बोलणारा इसम तो.

आतां आमच्या दोघांतला मोतीचंद कोण अन् हिराचंद कोण हें नुसतं पाहून कुणालाहि सांगता येत नव्हतं. पण इसारपेठेंतले लोक —निसंतान होवोत बेटे—आम्हाला चोर म्हणायचे. नाना प्रकारांनीं बदनाम करायचे, पण आपल्याला आपला धंदा बरा. मीं थोडा गहाणवटीचा व्यवहार करून कुणाला भांड्याकुंड्यावर तर कुणाला पिकावर नाहीं-तर बैलाजनावरावर कर्जाऊ पैसा देत होतों. गोलबावडीपासून खेडवेशीपर्यंत माझी गिऱ्हाइकी होती, एकजात नालायक लोक सारे. थोडा व्याजबट्टा करीत होतों, माफक दमडीरुपयाला पैसा रोज, कधीं जास्त नाहीं, पारसनाथ साक्षी आहे. मी गरीब माणूस. सारा पैसा आहे आतां मोतीचंदाकडे—त्याचे पोरगे बाटगे निघोत! पोरी रंडक्या होवोत! बेचिराख होवो त्याचं घरदार! मी नवस करीत असतों त्यासाठीं वकीलसाहेब.

वांधा निघाला तो असा. इसारपेठ आम्ही दोघांत वाटून घेतली होती. वेशीच्या आंतला वाटा माझा, बाहेरचा मोतीचंदाचा. वेशीबाहेर जहागिरदाराची इस्टेट नि वाडा होता. तो माणिकराव जगनाडे, साऱ्या मुलखाचा दारूबाज नि बाहेरख्याली. मोतीचंदानं त्याला कर्ज दिलं, असेल दहा हजार पंधरा हजार, मला काय ठाऊक? रक्कम मिळाली कीं जहागिरदार कागद करून द्यायचा, किती रक्कम नि कशासाठीं, कधीं पर्वा केली नाहीं त्यानं. गांवांत मी पै पाव आणा करून धंदा करीत होतों, पण मोतीचंदाला एकट्या जहागिरदाराचं सर्वांत मोठं कुळ मिळालं होतं. कांहीं कष्ट नव्हते, त्याच्या वाड्याच्या देवडीवर जाऊन रक्कम द्यावी, दिवाणजीच्या हातीं जहागिरदाराच्या सहीचा कागद घ्यावा. सोपा व्यवहार.

जशी मुदत भरली तशी मोतीचंदानं रक्कम भरपाईची मागणी केली, पण जहागिरदारानें त्याला शिवीगाळ करून हांकून दिला. पण मोतीचंदानं दावा लावला कोर्टांत, कर्ज-रोख्यांचे कागदपत्र दाखल केले रीतसर, नि जहागिरदारावर डिक्र्या मिळवल्या, अगदीं सरकारी सहीशिक्यानिशीं. मग मोतीचंदानं शेतामागून शेताचा कबजा घेतला, आंबराई, विहिरी सगळ्यांचा ताबा घेतला नि आपले वेशीबाहेरचीं दुसरे देणेकरी रयत म्हणून जमिनी करायला लावले. जहागिरदाराचा बराचसा जमीनजुमला हा काबीज करून बसला. तें पाहिल्यावर जहागिरदार तापला, त्यानं मोतीचंदाला लाखोली वाहिली, पण करतो काय? मोतीचंद हंसत होता नि आणखी हुकुमनामे मिळवीत होता, नि आणखी शेतांचे कबजे.

फाल्गुनाच्या महिन्यांत वेशीबाहेर एका पाथरवटाकडे मीं वसुलीला चाललों होतों (त्यानं मागें गांवांत येऊन माझ्याकडून कर्ज नेलें होतें.) माझ्यापुढें कांहीं अंतरावर मोतीचंद चालला होता, पण मीं मागून येतों आहें हें पाहिल्यावर तो वळून उभ्या पिकांत शिरून नजरेआड झाला, कारण आमच्यांत वैमनस्य होता, आम्ही एकमेकांचीं तोंड पाहात नव्हतों. मी पुढें चालत जहागिरदाराच्या वाड्याजवळच्या चिकूबागेवरून चाललों होतों. तिन्हीसांजाची वेळ होती, रस्त्याला चिटपाखरूं नव्हतं.









अनुक्रमणिका



मराठी
रांगडें प्रेम

आंतरभारतीय
प्रेमा
तुझा
रंग
असा!





गुजराती
हळवें प्रेम

पंजाबी प्रेमाचें रांगडें

अनुक्रमणिका






हिंदी
'सुतळी' प्रेम
कर्नाटकी संगीत प्रेम
राजस्थानी
जबरी प्रेम


घोषवाक्यांची 'आणीबाणी'
कृति करा
आपले कर्तव्य
GOLD BOND
GOLD BONDS
सोने द्या
संरक्षण रो
विकत घ्या
अन्ननाश करूं नका
अन्न म्हणजेच
कढाईतील दालमोळा
तुमच्या धनाची राष्ट्राला गरज आहे

अनुक्रमणिका

जुळ्या भावाची करणी | पान १०९ वरून

एकाएकीं तिघेचौघे धटिंगण माझ्या अंगावर धावून आले, तोंडाला फडकीं बांधलेले अन् हातांत काठ्या घेतलेले. "हा पहा साला मोतीचंद, मारा!" म्हणून मला धरून ते बडवायला लागले. मी हातापाया पडलों तरी सोडीनात, मीं रस्त्यावर पडलों तरी मारीतच राहिले, नि म्हणत होते काय तर "घे वेश्या मोतीचंद, व्याज घे पुरतं मोजून, हें घे." मी ओरडून सांगतों आहे, कीं अरे, मी मोतीचंद नव्हे—हिराचंद आहें, तरी मारायचे नि शिव्या द्यायचे थांबेनात. अखेर माझ्या तोंडांतून शब्द फुटेना, तेव्हां ते गेले.

पण मीं त्यांना ओळखलें होतें. एक होता लहान्या चकरे, जहागिरदाराचा मोतद्दार, दुसरा होता संभ्या दारवान, तसाच निवृत्ती सोवळेकरी पण होता, नि चौथा बुध्या काशीद. सगळे जहागिरदाराच्या वाड्यावरचे नोकर. मी शपथेवर सांगेन—पण आतां तशी शपथ घेऊन झाली सुद्धां, नि माझी गरीबाची अब्रूहि गेली.

ते चौघे मारेकरी हंसतखिदळत निघून गेले, तेव्हां माझा भाऊ मोतीचंद पिकामधून बाहेर आला, अन् मी मेलों असं समजून आक्रोश करायला लागला. पण मीं डोळे उघडून पाणी मागितलं, तेव्हां त्यानं पाणी आणून मला पाजलं नि मला पाठीवर घेऊन आडरस्त्यानं गांवांत आणलं. त्यावेळीं माझ्या भावाचा दयाळूपणा पाहून माझं मन कळवळून आलं, नि मी वैर विसरून गेलों.

पण साप तो मरेपर्यंत सापच, आणि खोटा तो जन्मभर खोटा. भावावर विश्वास ठेवण्यांत माझी चूक झाली, त्या बेइमान मोतीचंदाशीं मी बेसावध राहिलों हा अगदीं मूर्खपणा झाला माझा. त्याच्या घरीं त्यानं मला नेल्यावर मला थोडा आराम वाटला, तेव्हां मीं त्याला झालेली हकीकत सांगितली. तो म्हणाला "ते मलाच मारणार होते यांत संशय नाहीं. पण कोर्ट न्याय देईल, सरकार इनसाफ करील, बरा झाल्या-बरोबर तूं खटला भर."

मागें आम्हीं टोकरण गांव सोडल्यानंतर तिकडे एकदां कडक दुष्काळ पडला होता. त्यावेळीं आमची विधवा आत्या मुलुख सोडून आमच्याकडे राहायला आली होती. आम्हां दोघां भावांत झगडा झाला तेव्हां थेरडीनं मोतीचंदाची बाजू घेतली होती, नि तेव्हांपासून

दी १५/१६



रात्रंदिन आम्हां युद्धाचा प्रसंग...!

अंडी-टमाटे, फेक
(HAND-GRENADES)

ती त्याच्याकडेच राहात होती. आतां त्यानं मला तिच्या ताब्यांत दिलं, कारण तिला जडीबूटी, औषधपाण्याची माहिती होती. मार खाऊन रक्तबंबाळ नि क्षीण अवस्थेंत मी असतांना मला दोन दिवसांनीं तापहि आला, मनांत म्हटलं याचाहि हिशेब जहागिरदाराकडून वसूल करून घेईन.

इसारपेठेंतले लोक बेअकली खरे, पण साक्षीदार म्हणून फार लायक. वकील जें बोलायला सांगेल तें कोर्टांत न डगमगतां बोलतील. मी ठरवलं कीं मिळतील तेवढे साक्षीदार खरेदी करायचे, तेहि असे कीं नुसत्या लहान्या, संभ्या, निवृत्ती नि बुध्याविरुद्धच नव्हे तर खुद्द जहागिरदाराविरुद्धहि बेशक हवी ती साक्ष देतील. त्यांना काय पढवायचं तेंहि मीं नक्की केलं, कीं स्वतः जहागीरदार घोड्यावर बसून त्या चौघांना घेऊन माझ्या अंगावर आला, मला मारायचा त्या लोकांना त्यानं हुकूम दिला, इतकंच नव्हे तर माझ्याजवळचे दोनशें रुपये देखील त्या लोकांनीं लुटून घेतले. ती दोनशें रुपयांची रक्कम कर्जफेडीपोटीं पाथरवटानें मला दिली होती आणि साक्ष देण्यासाठीं पाथरवटाच्या कर्जांत कांहीं सूट देण्याचेंहि मीं ठरवलें. शिवाय त्यानं मला मार बसल्याचें दुरून पाहिलें, पण भीति वाटल्यामुळें तो जवळ आला नाहीं, अशी समक्ष साक्षीदाराची कामगिरीहि त्यालाच द्यायचा बेत रचला.

हा सगळा आराखडा मीं मोतीचंदाला सांगितला, तेव्हां तो म्हणाला ठीक डाव रचला आहे, आतां लौकर बरा होऊन हिंडाफिरावला लाग. आजारीपणामुळें माझा जीव अगदीं हलका झाला होता, तेव्हां मीं भावाला प्रांजळपणानं साक्षीदारांचीं नांवं सांगितलीं, माझे ऋणकोच होते सगळे, पण तें जहागीरदाराला माहीत नव्हतं नि कोर्टालाहि ठाऊक नव्हतं. माझा ताप बरेच दिवस हटेना, तो थांबला त्यानंतर पोटदुखी लागली, इतकी कीं मला वाटलं मीं यांतून उठत नाहीं. मला कल्पना नव्हती कीं मला दवापाणी करणारी ती बुढ्ढी, ती माझी आत्या, ती हडळच मला कांहींतरी वेडंवाकडं पाजीत होती. मी बिछान्याला खिळलेला असतांनाच मोतीचंदानं मला सांगितलं कीं माझं घर बंद केलं आहे नि किल्ली, वह्या नि घरांतली रोकड पण माझ्या स्वाधीन केली, जमिनींत पुरलेली रक्कमदेखील—कारण मला चोरीचं भय वाटत होतं, घरफोडीची भीति होती. खरं सांगतों साहेब, पैसा असा थोडा होता घरांत, फारतर दहावीस रुपये असतील. मी पडलों गरीब माणूस, नेमीनाथ साक्षी आहे.

एका रात्रीं माझा आजार पुन्हा उलटला. तोंपर्यंत मीं मोतीचंदाला कसा दावा लावायचा, कोण साक्षीदार बोलवायचे, तें सगळं सांगून टाकलं होतं, अन् त्यानं पण सारी व्यवस्था चोख केल्याची खात्री दिली होती. थोड्या दिवसांनीं मला जरा बरं वाटायला लागलं, तेव्हां मी मोतीचंद कुठें आहे म्हणून चौकशी केली. आत्या म्हणाली कीं तो एका कज्जासाठीं जिल्ह्याला गेला आहे. पुन्हा मीं दवा घेऊन झोपीं गेलों, इतकी गाढ झोप लागली कीं खूप उशिरापर्यंत जागाच झालों नाहीं. डोळे उघडल्यावर लक्षांत आलं कीं घरांत कांहीं आवाज ऐकूं येत नाहीं. हांका मारल्या, कोणी ओ देईना, म्हातारीदेखील येईना. तेव्हां धास्ती वाटली, म्हटलं काय झालं आहे कुणास ठाऊक.

उठलों नि काठी घेऊन हलके चालत चालत घराच्या बाहेर पडलों. गोलबावडीच्या चौकांत आलों. आंग ठणकत होतं, नि दर पावलाला मीं त्या जहागिरदाराला शिव्याशाप मोजीत होतों. पहिल्या प्रथम मीं जानू सुताराला हांक मारली, कारण साक्षीदारांच्या यादींत त्याचं नांव पहिलं घातलं होतं. मीं म्हटलं, "काय रे जान्या, झाली का सगळी तयारी ? अन् कोर्टांत काय बोलायचं तें ठाऊक आहे ना ?"

जानू म्हणाला, "म्हणजे काय ? अन तुम्ही कुठून आलांत हिराचंद शेट ?"

मीं म्हणालों, "मी बिछान्यांतून उठून आलों. जहागिरदाराच्या करणीनं पडलों होतों खितपत इतके दिवस. माझा भाऊ मोतीचंद कुठं आहे ? साक्षीदारांची सारी तरतूद तो करणार होता. तुम्हा लोकांना माहीत नाहीं सारं ठरलेलं !"

जानू म्हणाला, "भले शेटजी ! आम्हांला काय विचारतां ? माझी साक्ष झाली, मला पैसे मिळाले, नि कोर्टाच्या हुकमानं जहागिरदारानं मोतीचंदाकडून लुटलेले पांचशें रुपयेहि त्याला मिळाले नि शिवाय वर पांचशें नुकसानभरपाईचे—मोतीचंदाला मारझोड करण्याबद्दल."

माझ्या डोळ्यापुढें तर अंधेरीच आली तें ऐकून. ती गोलबावडी गरगरा फिरल्यासारखं झालं नि तिच्याजवळचं जांभळीचं झाड डोक्यावर पडतं आहेसं वाटलं. मी काठीवर रेलून कसाबसा उभा राहिलों नि म्हणालों, "नाहीं नाहीं ! कांहींतरी बडबडूं नकोस. जहागिरदाराचा मार बसला तो मला. मी खटल्याची तयारी करायला आलों आहें. माझा भाऊ मोतीचंद कुठें आहे ?"

पण जानू सुतारानं नुसती मान हालवली. एक बाई ओरडली, "हें काय खोटेपण ? जहागिरदाराचं वैर तुमच्याशीं कुठें होतं शेठजी ? भावाला मार बसला त्याचा फायदा तुम्ही लुटायला बघतां काय ? मेल्या या सावकारांना कांहीं लाज असावी !"

मी ओरडलों, "महावीराशपथ—गोमटेश्वराशपथ सांगतों, मार मला बसला. मरेमरेतोंपर्यंत ! अरे इसारपेठवाल्यांनो, सरळसरळ काय तें बोला, साक्षीचे पैसे द्यायला तयार आहें मी." मला चक्कर आल्यासारखं झालं, मार खाऊन नि आजारीपणानं शिणलों होतों अगदीं.

मग जांभळीच्या झाडाखालीं बसून अर्जी नि पत्रं लिहून देणारा रामभाऊ पुढें आला नि म्हणाला, "आज मारपीट झाल्याला एकेचाळीस दिवस झाले, अन् खटल्याचा निकाल लागल्याला सहा दिवस. तुमचा भाऊ मोतीचंद याला मारून जहागिरदाराच्या लोकांनीं लुटल्याचं शाबीत झालं, सर्वांच्या साक्षी झाल्या, मीं देखील साक्ष दिली. साहेबांनीं कोर्टांत मोतीचंदाच्या बाजूनं निकाल दिला. मोतीचंदाला कोर्टांत दोनदां भोवळ आली होती मार खाल्ल्यामुळें, त्याला मॅजिस्ट्रेटसाहेबांनी बसायला खुर्चीदेखील दिली





सगळ्या वकिलांसमक्ष. मग आतां शेटजी, तुम्ही कशाला बोंब मारतां ? काय मंडळी, मी म्हणतों तसं झालं कीं नाहीं सगळं ?"

जानू सुतार म्हणाला, खरं आहे. मी तिथं होतों. मोतीचंदाला दिलेल्या खुर्चीवर एक लाल गादी होती हेंदेखील आठवलं आहे मला."

रामभाऊ म्हणाला "जहागिरदाराची नाचक्की झाली कोर्टाच्या निकालामुळें, अन् त्याच्या रागाला भिऊन मोतीचंद घरदार बंद करुन मुलखाला निघून गेला आहे. त्यानं आम्हांला सांगितलं कीं तुम्ही अगोदरच पुढें गेलांत, तुमच्या दोघांत समेट झाला नि तुम्ही आतां गांवींच धंदा सुरूं करणार म्हणून. अन् आतां तुम्ही गेलांत तरच बरं, कारण जहागिरदारांनीं निर्धार केला आहे कीं तुमच्यापैकीं कोणी सांपडेल त्याला झाडाला उलटा टांगून चिंचेच्या फोकांनीं चामडी लोंबेपर्यंत मारायचा. खटल्या-बद्दल मी सांगतों तें खरं कीं खोटं तें या साऱ्या लोकांना विचारा, पांचशें रुपयांच्या भरपाई-बद्दलसुद्धां."

मी म्हणालों, "पांचशें रुपये ?" तेव्हां किसन धोंगडे म्हणाला, "हो, पांचशें, मींही साक्षींत तितकेच सांगितले."

मी कळवळून सुस्कारा टाकला, मीं दोनशेंच म्हणालों होतों पण त्या चांडाळ मोत्यानं पांचशें वसूल केले !

नि मग एक नवाच भीतीचा गोळा माझ्या पोटांत उठला नि धडपडत मी मोतीचंदाच्या घराकडे धांवलों. माझ्या बिछान्याखालच्या पेटींत धुंडाळून पाहिलं, तों माझ्या बह्या, पैसा अडका कांहीं नव्हतं तिथें. माझा भाऊ म्हणवणाऱ्या त्या मोतीचंद सैतानानं सारं लुटून नेलं होतं. तसाच धावत माझ्या घराला गेलों. कवाडं उघडून पाहतों तों घर रिकामं. उंदीर-घुशी तेवढ्या वावरत होत्या तिथं.

त्या क्षणाला माझं डोकं फिरलं. अंगावरचे कपडे फाडून मीं गोल्यावडी चौकांत आलों, सरकारच्या इनसाफाला शापीत नि भावाच्या नांवानं ठणाणा करीत धावत सुटलों. वेडाच्या भरांत माझ्या बह्या गेल्याचंहि ओरडत राहिलों. मी विहिरींत उडी टाकायला निघालेला पाहिल्यानंतर लोकांच्या ध्यानांत आलं कीं मी खरं बोलतों आहें. शिवाय फाडलेल्या कपड्यां-तून माझ्या अंगावरचे माराचे वळहि त्यांना दिसले.

जानू सुतारानं मला आवरलं नि सर्वांना माझ्या पाठीवरचे वळ दाखवले. अन् तो पोट धरधरुन हसूं लागला. तो ओरडून सांगत होता तें सगळ्यांनीं ऐकलं—गोल्यावडीपासून तों खेडवेशीपर्यंत. "अरे कोल्हीं भांडलीं, नि हा कोल्हा मात्र सांपळ्यांत अडकला ! खरोखरच मार याला बसला नि कोर्टानं दिलेले पैसे घेऊन पळाला याचा भाऊ ! सावकार, खाशी गोष्ट झाली पोराबाळांना सांगायला—कोल्होबांचा झगडा ! अन् बह्या पण गेल्या. अरे हिराचंदाचे ऋणको, कर्जदार, देणेकरी, ऐका, याच्या बह्या नष्ट झाल्या !"

साऱ्या इसारपेठेंत एकच गिल्ला झाला, कीं हिराचंदाच्या हिशेबबह्या नाहींशा झाल्या ! मी पागलपणानं स्वतःच बोलून गेलों होतों, आणि गांवभर लोक हंसत सुटले. पुष्कळांनीं मला शिविगाळ करायची सुरसुरी भागवून घेतली, कोणी माझ्यावर दगड टाकले, शेणमार केला, अखेर मी लोळून त्यांच्यापुढें शरण गेलों.

तेव्हां रामभाऊ अरजीवाल्यानं त्यांना आवरलं. तो म्हणाला, पोलीस चौकशीला आले तर उगीच बलामत येईल. तो मला खराब भाषा वापरुन म्हणाला, "हिराचंद, सावकार म्हणून तूं कधीं कुणावर दया केली नाहींस, माझ्या भाच्याचा बैल पंधरा रुपयां-साठीं जप्त करुन नेलास, तरी मी तुझ्यावर दया करतों. अरे कुणाकडे एखादं मरतुकडं गधडं असलं तर घेऊन या, सावकाराची पाठवणी करायला. हा गांवांत आहे असं जर का जहागिरदाराला कळलं तर उगीच खून पडेल, नि मग पोलीस येतील अन् साऱ्यांना उपद्रव. त्यापेक्षां याला घालवून देणं बरं."

किसन धोंगडे म्हणाला "दगडू बेलदाराचं एक गाढव मरायला घातलं आहे तें आणूं या धरुन." पोराटोरांनीं तें गाढव आणलं, त्याच्यावर लोकांनीं मला जबरदस्तीनं शेपटीकडे तोंड करुन बसवलं नि सगळ्या लोकांनीं हुर्यो उडवून मला देवठाण वेशीच्या बाहेर काढलं अखेर लोक परत गेले त्यासरशीं मीं धावपळ करीत आपल्या बंगल्याकडे आलों आहें वकीलसाहेब.

खटला तर निकालांत निघाला आहे. पण आपण मला इनसाफ मिळवून द्या. मार मीं खाल्ला, भरपाई घेतली मोतीचंदानं. आतां मला साक्षीदार मिळणार नाहींत, जखमा भरुन येतील, अन्याय मात्र कायम राहील. अशा परिस्थितींत मीं काय करावं ? निदान एवढं तरी करान, कीं मला झालेला अन्याय तुम्ही लिहून साहेबाला कळवा, निदान छाप्या पेपरांत जाहीर करा. जगाला माहिती करुन द्या कीं मी हिराचंद, टोकरण गांवचा महाजन फशीं पडलों, नि तो हरामखोर, माझा जुळा भाऊ मोतीचंद, तो देणखाऊ, कमअस्सल, सुवर बेइमान भडवा फायदा लुटून गेला !









—पद्माकर गोवईकर

**क**रकरीत संध्याकाळ झाली. प्रकाश फाटून अंधार वर आला. विस्कटलेल्या कौलारांतून अंधाराचा एक एक किरण आंत सांडला, तरी बधीर दुर्गी तशीच बसून राहिली होती. विचारांचा प्रचंड पाळणा तिच्या मस्तकांत गरगरा फिरत होता. काष्ठ झालेल्या तिच्या मनाला आग लागल्यासारखें झालें होतें. गेले दोन दिवस तिला सारखें वाटत होतें की, भाईला पत्र टाकावें. मला मारून टाकण्यासाठीं तरी तिकडे घेऊन जा. किती दिवस झाले. बायकोच्या मुठींत गेलाय् नुसता. मी आहे कां मेलेय् चौकशीसुद्धां केली नाहीं. किती ओंगळ आयुष्य जगायचें! म्हणे सहा महिने आक्काकडे रहा आणि सहा महिने माझ्याकडे. वहिणीचा भार झालाय्. ढकलून द्या म्हणावें सगळ्यांनीं मला. इकडे आलें कीं इकडे राबायचें, तिकडे गेलें कीं वैनीचा त्रास... सकाळचा स्वयंपाक मी करतें म्हणे, संध्याकाळचा तुम्ही करा. संध्याकाळीं फिरायला जायचें असतें ना नवऱ्याबरोबर! नखरेबाज मेली! दुर्गीला ताण असह्य झाला. या पिंजऱ्यांतून सुटावें, जाचांतून मुक्त व्हावें, या विचारानें तिचें मन रडूं लागलें.

श्रीधरला भेटायला मिळायचें म्हणून तरी ती आक्काकडे राहण्याचें पसंत करीत असे. आतां तेंहि नाहीं. नुसत्या आठवणी उरल्या होत्या त्याच्या. एका शिशिरानें तिचें आयुष्य निष्पर्ण केलें होतें. बटलेल्या आयुष्याला कांपरें भरवून श्री निघून गेला होता. कधींमधीं घर दृष्टीस पडे, तेंहि पडूं नये म्हणून तिनें स्वतःला कोंडून घेतलें होतें. आक्काच्या संसाराचें जूं गळा नललेल्या मानेवर मुद्दाम घेतलें होतें. सगळें आयुष्य आभाळून आलें होतें. नशिबाला महारोग झाला होता.

अंधार अंगाला चिकटला तरी ती तशीच बसून राहिली. तिला उठावेंसें वाटेना, दिवा लावावासा वाटेना. काळ्या बंबाळ अंधारांत कुजून जावें असें तिला वाटत होतें. सासर नाहीं, माहेर नाहीं अशा मुलीला जीवन नसतें आणि मरण नसतें, या विचारानें ती थरारून गेली...

डोळ्यांच्या खिडारांतून ती पाहात होती. ओल्या भिंतीवर एक काळी मुंगी भुरभुर धांवत होती. पाठीवर टरटरून आलेलें टेंगूळ घेऊन ती भुरभुर धांवत होती. तिला लहानपणचा प्रसंग आठवला. लाडवाच्या एका तुकड्याला चिकटलेली मुंगी तिनें लहानपणीं खाल्ली होती. आणि मग रडून रडून गोंधळ घातला होता. आई देवाहून आल्यावर म्हणाली होती, 'मुंगी खाल्ली कीं माणूस राजा होतो...' त्यावेळीं तिला पुष्कळ मुंग्या खाव्याशा वाटल्या होत्या. आतांहि तिला वाटलें, ती मुंगी खाऊन टाकावी. टचकन् दांताखालीं फोडावी. त्या विचारानें तिच्या अंगावर ओरखडे निघाले. तिला वाटलें, लक्तरलेलें आयुष्य पाठीवर घेऊन तुरतुर पळणारी आपणहि एक मुंगी आहोंत. तिनें पुन्हां भिंतीकडे पाहिलें. दारामागच्या सांदींतून एक पांढऱ्या पोटाची काळी पाल सरकत सरकत आली आणि तिनें चक्चक् आवाज करून ती मुंगी खाऊन टाकली. आपल्या गळ्याखालचा भाग हलवत, मोठ्या डोळ्यांनीं पाहात ती तशीच भिंतीशीं चिकटून राहिली....







*आयुष्य सरकतें. सावली सरकावी तसें. तंद्री पाणावते, आठवणींची कात मनांत सरकूं लागते. एकदां चालतांना त्यानें कमरेभोंवती हात घातला होता. आठवणीनें सारें शरीर हुळहुळलें.......*

---

दुर्गी भीतीनें उठली. फर्ररकन् काडी ओढून तिनें दिवा लावला. अंधाराला प्रकाशाचें कोड फुटलें. त्याच काडीनें तिनें चूल पेटवली. परातींत पीठ घेतलें आणि ओहोटलेल्या मनानें ती तशीच बसून राहिली.

हिरव्या–पिवळ्या जिभांनीं चुलीचा जाळ तव्याला चाटत होता. तव्याच्या गोल बाजूंनी असंख्य जिभा लवलवत होत्या. तवा तापत होता. नीट खरवडून न काढल्यामुळें त्यावर चिकटून बसलेलें पीठ जळत होतें. करपट वास सुटला होता. जळणाऱ्या पिठाचा धूर निघत होता...आणि दुर्गी चुलीपुढें परातींतल्या पिठांत बोटें खुपसून उगाच बसली होती. निखारलेली चूल वाया चालली होती. तवा तापून चालला होता. तिला कशाचीच चिंता नव्हती. डोळ्यांतली वेदना चुलींतल्या जाळावर ठेऊन ती विनचेहेऱ्यानें बसून राहिली होती...

"दुर्गे, मेले चूल जळून चालली आहे. बघत काय बसली आहेस...!" कोपऱ्यांत लुगड्याचा बोळा आणि पुढ्यांत पाण्याचा तांब्या ठेऊन बसलेली आक्का ओरडली, तशी दुर्गी संथपणें भानावर आली. जितक्या संथपणें ती भानावर आली त्याहून संथपणें तिनें परातींतल्या पिठांतून हात चाळवला. लहान मुलाच्या जावळांतून हात फिरवावा तितक्या हलकेपणानें तिनें पीठ सावडलें आणि हळूहळू ती त्यांत पाणी घालूं लागली. हाताच्या बोटांतून ओलें पीठ किळसवाणा स्पर्श करून पच्‌दिशीं वर येत होतें. पचक् पचक् आवाज करीत तिनें पीठ मळलें, आणि तापून निळ्या पारव्या झालेल्या तव्यावर रपकन् भाकरी टाकली. चर्रर आवाज करून भाकरी तव्याच्या उबेंत पडली. पुन्हा पीठ–मळणी......

पलीकडे आक्काच्या कारट्यानें भोकाड पसरलें होतें. दरिद्री लाडांत वाढलेलं तें कारटं वेळींअवेळीं वाटेल त्याचा हट्ट धरत होतें. त्याला आत्तां भेळ खायचें डोहाळें लागलें होतें...

"भेळेला एक आणा दे...अं ऽऽ हं ऽऽ हं ऽऽ! नाहीं तर दिव्याची काच फोडीन...अं ऽऽ हं ऽऽ अं ऽऽ!"

लोचटपणें तो रडत होता. एकच मुलगा असल्यानें आक्का त्याची समजूत काढत होती. त्याला पुन्हा पुन्हा चड्डी घालायला सांगत होती. पुन्हा पुन्हा हंसणाऱ्या राजपुत्राची गोष्ट पहिल्यापासून सांगत होती. शंकऱ्यानें कांहींहि ऐकायचें नाहीं असें ठामपणें ठरविलें होतें. हातांतली चड्डी फाटल्याठिकाणीं आणखी फाडत तो जमिनीवर टांचा घासत होता. बाहेर कुठून शिकून आलेल्या आयाबहिणीवरच्या शिव्या तो आक्काला देत होता. चिमणीच्या मंद उजेडांत चाललेल्या त्या विसंवादी दृश्याकडे दुर्गी मधूनच बघे. पुन्हा बुबळं आंत ढकलून ती भाकरी मळूं लागे...

शंकराचा लोचट हट्ट घालविण्यासाठीं आक्का दुर्गीला म्हणाली, "दुर्गे, बाई तुझ्या भाकरी झाल्या कीं शंकरला एक आण्याची भेळ आणून दे हं! तें बघ, ती भाकरी झाल्यावर जाईल आतां भेळ आणायला...!"

मघाशी होतें त्या दोन आण्याचें गोडें तेल आणलें. रात्रीं गिळायला तर हवें सगळ्यांना! त्या भेळवाल्याकडे ठेवा दुर्गीला आणि घ्या सगळे भेळ. संसार करतां येत नाहीं तर कशाला इतकीं पोरं...

× × ×

एकाएकी तिची नडगी खाजूं लागली. अलीकडे तिचें अंग फार खाजत होतें. रक्त बिघडलें होतें. दुर्गीनें हातांतलें उलथनें परातींत टाकलें आणि त्याच भाकरीच्या खरकट्या हातानें ती फराफरा नडगी खाजवूं लागली. हातानें खाजवून बरें वाटेना तशी तिनें उभ्या उलथन्यानें खाजवायला सुरवात केली. रक्त निघालें. ढपली निघाली, तरी ती तशीच चवीनें खाजवत राहिली...

आक्का चीड येऊन ओरडली, "एरंडेल घे एकदां, रांडे! किती अंग खाजवतेस. वाटेल तसं वागावं विटाळ पाळूं नये..."

× × ×

एकदा श्रीधरकडे बाहेरची असतांना आपण गेलों होतों. नको नको म्हणत होते तरी श्रीनें...

भाईनें तरी असं कां करावं? आपलं लग्न झालं कीं रमला संसारांत. पाठच्या बहिणीला कांहीं भावना आहेत कां नाहीं? बाबांच्या नंतर एक चिंधी तरी घेतली कां विकत? बाबा मरतांना मोठ्या नानभावीपणें त्यांच्या उशाशीं बसून सांगितलें, कीं दुर्गाचें लग्न झाल्याशिवाय मी लग्न करणार नाहीं. निदान स्वतःचें झाल्यावर तरी करायचें होतें. दुसऱ्याच्या दारांत तुकडा मोडायला लावला. आई मरतेवेळीं बाबा असेंच म्हणाले होते—बापलेक सारखेच—

"दुर्गे, कुठाय लक्ष? मेले भाकरी जळली कीं!"

चुलीवरच्या भाकरीचा कोळसा झाला होता. करपट दुर्गंधी सुटली. एक भाकरी जळली. म्हणजे संपलं! दुर्गीला रात्रीं जेवण नाहीं! पलीकडच्या गोखलेबाईनीं एक शेर ज्वारी दिली होती. तीसुद्धां दुर्गीकडे पाहून. दुर्गीवर त्यांचा फार जीव होता. सगळ्या जिवाच्या गोष्टी त्या तिला सांगत. स्वतःला मूलबाळ नसल्यामुळें त्या फार दुःखी होत्या. नवस देव-देवस्की करायला त्या दर मंगळवार, शुक्रवार बाहेर पडत. आपल्या जुन्या चेपल्या त्या दुर्गीला घालायला देत आणि तिला बरोबर नेत. त्या रात्रीं त्या तिला आपल्या घरीं ठेऊन घेत. चांगलें खायाला प्यायला घालीत. दुर्गी दुष्काळांतून उठल्यासारखी जेवायची. जेवणें झालीं कीं दोघी गप्पा करीत बसायच्या. अंधाऱ्या खोलींत खिडकीशीं बसून रात्र रात्र जागायच्या. जिव्हारी गोष्टी करीत पहाटेपर्यंत एक मेकींच्या खांद्यावर मान ठेवून रडायच्या. पहाट झाली कीं तांबड्या लाल










डोळ्यांनीं उठायच्या गरम गरम पाण्यानें आंघोळी करायच्या. चहा पिऊन दुर्गी पुन्हा आपल्या बहिणीच्या घरीं येई...त्या घराला जुंपून घेई.

भाकरीची चवड चुलीमागच्या कोपऱ्यांत लावून तिनें परातींत हात धुतला. जळक्या लाकडांनींच चुलींतले निखारे बाहेर ओढले. भस्सदिशीं त्यावर पाणी ओतलें. वाफ आणि राख ओल्या प्रकाशाला चिकटून बसल्या. चुलीवरच्या पिठल्याच्या पातेल्यांत राखेचा एक थर हलकेंच अंग पसरून पडला. परातींत खरकटीं भांडीं गोळा करून ती घासायला उठणार तेवढ्यांत इंदी आणि रजी बाहेरून खिदळत आल्या.

इंदू आणि रजनी आक्काच्या मुली. दोघी शाळेच्या होत्या. इंदी मॅट्रिकला होती रजनी नववीला. आक्काचे यजमान नाना—रिटायर्ड होऊन दोन वर्षं झालीं होतीं. कुठें तरी खाजगी टायपिंग करून ते पेन्शनीची तोंड मिळवणी करत. इंदीकडे पाहून तिचें शिक्षण त्यांनीं चालू ठेवलें होतें. अरबूज इंदी केव्हांतरी नोकरीला लागेल आणि फाटलेलीं आयुष्यं पुन्हा सांधता येतील या आशेनं आक्का आणि नाना दोघींच्या शाळेची काळजी घेत होते. स्वतःच्या इच्छा मारून त्यांना काय हवें नको पाहत होते. दोघींच्या पाठीवर झालेला शंकर एकुलता मुलगा त्यांच्या इच्छा मारायला हातभार लावत होता.

दुर्गीनें खरकट्या भांड्यांत हात ठेऊन एकदां इंदूकडे पाहिलें. तिचें काळीज तटतटून गेलें. श्रीधरनें दुर्गीला घेऊन दिलेलें पातळ इंदी नेसली होते. 'ती शाळेची आहे; असू दे तिला...' असं आक्का म्हणाली होती. बधिरलेल्या हातानें त्या दिवशी तें पातळ घडी मोडायला इंदीच्या हातांत ठेवलं होतं. इंदूच्या काटकोळ्या उंचीला तें थिटें पडत होतं, पण थिटं असलं तरी नवें होतें ना! दुर्गीला वाटलें, उठावें आणि याच खरकट्या हातानें इंदीच्या अंगावरचें पातळ फराफरा फेडावें. तें नवें करकरीत पातळ नेसावें आणि श्रीधरच्या नांवानें या घरांतून तिरडीवर आडवें होऊन बाहेर पडावें.

दुर्गीनें तीच दृष्टि उचलली आणि रजनीवर ठेवली. रजी आक्कासारखीच काळी होती, तरी इंदीपेक्षां बरी दिसत होती. लहान वयांतहि नको तिथून फुलत होती. तरी स्कर्ट घालत होती. तिचे मांड्यांपर्यंत उघडे दिसत असलेले पाय आणि स्कर्टवरच्या पोलक्यांतून वर डोकें काढणारी छाती बघून दुर्गीला किळस वाटली. मेलीला लाजहि वाटत नाहीं. गरिबींत बायकांचीं शरीरं कां उफाडतात? दुर्गीनें चटकन् आपल्या छातीकडे पाहिलें. छातीवर फाटलेल्या पदरांतून आंतल्या पोलक्याची पिन् निघालेली दिसली. एका छिद्राचा आधार घेऊन ती लोंबत होती. सरकलेल्या पोलक्यांतून आंतली बॉडी दिसत होती. तिला स्वतःचीहि किळस वाटली. उघड्या पाठीवरून पांढरी पाल चालल्यासारखं वाटलें. ती थरारून गेली. आणि खसकन् भांडीं उचलून परसदारीं गेली...

चिकट, गुळगुळीत सांड-पाण्यांत ती कितीतरी वेळ भांडीं घासत होती. चमत्कारिकपणें पायाला स्पर्श करणाऱ्या पाण्यांत उभं राहून तिनं भांडीं विसळलीं आणि दारांत ठेवलीं. ओंजळींत पाणी घेऊन घामेजलेली मान, तोंड तिनं स्वच्छ धुतली. जळजळणाऱ्या डोळ्यांवरून पाण्याचीं गार बोटें फिरवलीं. आसपास कुणी नाहीं असें पाहून तिनें मघां निघालेली पोलक्याची पिन काढली. पोलकें बाजूला सारलें आणि गार पाण्यानें थबथबलेला हात तिनें छातीवरून फिरवला. चमत्कारिक सुखाच्या कळा सोसत तिनें डोळे मिटून घेतले.

कालमापकांतून वाळू सरकावी तसा रात्रींतून अंधार सरकतांना स्पष्ट दिसत होता. ओल्या डोळ्यांनीं समोरच्या भिंतीकडे पाहात दुर्गी खिडकींत बसली होती. वाटत होतें कीं शेवाळल्या अंधाराच्या उंचच उंच भिंती आपल्याभोंवतीं भाईनें बांधून ठेवल्या आहेत आणि त्यांच्याआड्च आपण पिचून मरायचें आहे.

असें मुळूमुळू रडण्यांत अर्थ नाहीं हें माहीत असूनहि ती रडत राहिली. थोडा वेळ रडत राहिली. हें असेंच चालणार होते. तिचं लग्न होणार नव्हतें. भाई त्यांत लक्ष घालणार नव्हता आणि बहिणीच्या संसारांत राबून आपलं आयुष्य तिला असेंच फरफटत न्यायचें होतें.

वर चांदण्यांनीं भरलेलें आभाळ, समोर धूसर प्रकाशांत घरांचे वेडेवाकडे आकार आणि त्यावर भळाभळा वाहणारा अंधाराचा ओघळ! दुर्गीच्या मनाचा पीळ सळाखळा सुटला. डोळे कुठलीं कुठलीं चित्रं पाहूं लागले. दूर कुठेंतरी अंधाराच्या डोहावर तरंग उठवत एक कुत्रं वचा वचा ओरडत गेलें. वेदनेंतून वेदना जन्माला येते...

पोटांत खड्डा पडला आहे; भूक लागली आहे याची तिला जाणीव झाली. वांट्याला येईल तो तुकडा खाऊन सगळीं झोपीं गेलीं होतीं. दुर्गीची चौकशी करायला कुणाला वेळ मिळाला नव्हता. उशिरां आलेल्या नानांनींसुद्धां उरलेला चतकोर हातावर घेऊन खाल्ला होता. 'हरे राम, हरे राम' म्हणत त्यावर पाणी पिऊन त्यांनीं आपलें जीर्ण शरीर विटक्या गादीवर टाकलें होतें. नाना...

दुभंगलेल्या दृष्टीनें दुर्गीनें आंत वळून खोलींत पाहिलें. सारवलेल्या अधू प्रकाशांत फाटलेलीं आयुष्यं झोपीं गेलीं होतीं. आक्का, नाना, शंकऱ्या, नुसत्या गाठी गाठीच्या परकरावर झोपलेली ढांगळी, अरबूज इंदी, अस्ताव्यस्त फ्रॉक झालेली, झोपेंतच कराकरा दांत खाणारी रजनी ...विनकण्याचे विलविलीत, लवलवणारे किडे पडले होते





उमळून आलेल्या पोटानें ती उठली. कोपऱ्यांतला दिवा तिनें काढून टाकला. आणि हलक्या हातानें ती चुलीशेजारचीं खरकटीं भांडीं हात घालून चाचपूं लागली. कांहीं उरलें नव्हतें. भांड्याचा चिवट गार तळ हाताचे चावे घेत होते. तिनें पिठल्याच्या पातेल्यांत हात घातला. एक चमचाभर पिठलें शिल्लक राहिलें होतं. उजव्या हातानें तिनें पातेलें निपटून घेतलें आणि तो पिठल्याचा गार गिलावा तोंडाच्या भोंकांतून आंत सोडला. भांडंभर पाणी पिऊन ती पुन्हा हलकेंच खिडकीशीं येऊन बसली.

चांदण्याचा फिकट प्रकाश सगळीकडे पडला होता. लांबच लांब सावल्या पसरल्या होत्या; एकमेकींत गुंतल्या होत्या, आणि परस्परांना छेद देत होत्या......

आपलें आयुष्य एक सावली आहे. अगदी खोटं. खरें आयुष्य आपल्यांतून केव्हांच सरकून गेलें आहे. त्याची सावली आपण जगत आहोंत. आणि त्या फाटक्या सावलीचा पाठलाग आपण करतोंय...

तंद्री पाणावते, आठवणींची कात मनांत सरकूं लागते. आणि मग श्रीधर आठवतो. त्याची आठवण होऊन तिला हंसूं आलें. फाजील होता नुसता. एकदां चालतांना आधार द्यायला म्हणून त्यानें कमरेभोंवती हात घातला होता. त्या आठवणीनें तिचें सारें शरीर हुळहुळलें......

आयुष्याला चरा पाडून गेलेला श्रीधर! म्याड श्रीधर! भाईला जेव्हां आपले संबंध कळले तेव्हां मी नाहीं का साफ सांगितलं कीं, मी लग्न करीन तर श्रीशींच. त्यावर भाई डोळे बाहेर काढून ओरडला होता,

"श्रीधरशीं लग्न केलंस तर तूं मला मेलीस. आजपर्यंत एका कुंटिणीला वाढवलें असं समजेन..."

त्याच संध्याकाळीं श्रीधरची भेट झाली. मनाच्या पडक्या तटांतून येणाऱ्या हुंदक्यांनीं श्रीच्या छातीचा आधार घेतला,

"श्री, नाहीं रे, सहन होत मला. आपण पळून जाऊन या. खूप दूर दूर...जिथं भाई नसेल, नाना नसतील..."

श्रीधरचा बळकट पंजा मस्तकावरून फिरला.

"दुर्गा, ए, वेडे! वेडी आहेस का?"

"आपण लवकर लग्न करूं या..."

"अशा तिन्ही सांजचं नको बाई..." श्रीला सारी थट्टा वाटत होती.

"श्री, नाहीं रे, सहन होत..."

"करूं, लवकर लग्न करूं" काळीज फाडणाऱ्या आवाजांत श्री बोलला.

एकीकडे हा संवाद झाला आणि चार दिवसांनीं भाई श्रीधरपाशीं गरळ ओकला,

"श्रीधर, माझा मित्र म्हणून तुला सांगतो, आमच्या दुर्गीशीं लग्न करूं नकोस!"

"कां?"

"ती अपवित्र आहे!"

"म्हणजे कशी आहे?"

"आमच्या मेव्हण्यांशीं,—नानांशीं—तिचे संबंध आहेत..."

आणि मग सगळें आयुष्य फुटून फुटून गेलें. चार दिवसांनीं मशिदीकडच्या खाऱ्या विहिरींतून श्रीधरचें प्रेत बाहेर काढलें. श्रीधर गेला! आपण मात्र आयुष्याला चिकटून राहिलों. जातांना एका शब्दानें तरी विचारायचं होतंस, श्री! श्री!...







वेदना भरल्या शरीरानें दुर्गी रडूं लागली. घशांत पातळाचा बोळा कोंबून ती हुंदके आंतल्या आंत दाबत होती. डोळे भलभलतीं चित्रें पाहत होते. आठवणींचा जळवा आयुष्य शोषून घेत होता. बाहेर गडद रात्र थरथरत होती. तशाहि अवस्थेंत दुर्गीला वाटलें ही रात्र आपण आहोंत आणि हा अंधार श्रीधर आहे. ओल्या नजरेनें ती अंधाराच्या काळजांत बघत राहिली. रात्रींतून अंधार सरकत होता. प्रकाशाच्या ओढीनें लांबच लांब रात्र पुढें सरकत होती....

एकाएकी कुणाची झोप चाळवल्यासारखी वाटली. दुर्गीनें दचकून अंधाऱ्या खोलींत पाहिलें......

नाना आकाच्या बाजूला सरले होते. त्यांनी तिचा दंड धरला होता. तिला ते मागें रेटत होते. आका प्रतिकार करीत होती. हलक्या आवाजांत सांगत होती,

"अहो, असं काय करताय ? आज तिसरा आहे मला......"

दुर्गीच्या कपाळावर घाम आला. तिचीं बुबळं बाहेर आलीं. अंधारांतले तें चित्र गडद गडद होत तिच्या मनावर आदळलें. तिचें मन फुटून गेलें. पातळाचा बोळा घसा फाडत आंत जाऊं लागला आणि तिला जाणवलें कीं, नानांच्या वाळक्या हाताचा पंजा खवलेखवले असलेल्या कृष्णसर्पासारखा तिच्या दिशेनें पुढेंपुढें सरकतो आहे....



## पावन

**मधुकर कोसारे**

शब्दब्रह्म आकारीत  
निराकार तव रुप  
आठव आठव तव  
म्या गायिलेलें आलाप

टाळ मृदंगाच्या नादीं  
गुंतलेलें माझे मन  
भगा होवो जगन्नाथा  
जन्मा जन्माचे पावन

तव स्मृति चंदनाच्या  
उगाळ तूं माझ्या देही  
अनासक्त स्पर्शातून  
पावन पावन देई—!











*एकदां चाळींत भरली*
*इमरजन्सी सभा ।*
*तिला होता प्रचंड*
*तात्त्विक गाभा ॥*
*पण झाली चुळबुळ,*
*मतभेद, अविश्वास*
*आणि बोंबा ।*
*अशी या सभेची*
*झाली शोभा ॥*




**—जयवन्त दळवी**

वीस आक्टोबर १९६२ हा आमच्या पोपटलाल चाळीच्या इतिहासांतला महान् दिवस गणला जाईल याबद्दल मला स्वतःला तिळमात्र शंका नाहीं. त्या दिवशीं चीननें भारतावर पाशवी आक्रमण केलें. आणि सारा भारत देश अक्षरशः चवताळून उठला. हें सारें स्वाभाविक असेंच झालें. पण आपला देश खडबडून उठला आणि त्याबरोबर आमची चाळहि खडबडून उठली हें मात्र थोडेंसें अस्वाभाविक असें झालें. कारण उठणें ही क्रिया आमच्या चाळकऱ्यांना तेवढीशी स्वाभाविक वाटत नाहीं. तथापि त्या दिवशीं आमची पोपटलालची चाळ खडबडून उठली. हें ऐकायला नवल वाटलें तरी ते प्रत्यक्षांत घडलें हें खरें!

श्रुति आणि स्मृति यामार्फत चाळीचा जो वारसा लहानथोरांना ज्ञात आहे त्यावरून असें स्पष्टपणें म्हणतां येतें कीं या चाळींत कोणत्याहि एका मुद्दयासाठीं भाडेकरू कधींच एकत्र आले नाहींत. नळ आणि संडास या 'पब्लिक सेक्टर' मधल्या दोन संस्था. तिथें प्रथम ताबा मिळावा म्हणून कांहीं काळ कांहीं भाडेकरू एकत्र आले तरी तेथें ते मुद्दयाऐवजीं गुद्दयावरच येत. वास्तविक मुद्दे दोन असले म्हणजे दुमत होतें. सर्वांचा मुद्दा एकच असला म्हणजे वास्तविक एकमत व्हायला हवें. पण चाळींतला सिद्धान्त निराळा असतो. 'संडासांत जायला पाहिजे' किंवा 'नळावर पाणी पाहिजे' असा सर्वांचा एकच मुद्दा असतो. आणि तरीहि एकमत मात्र होत नाहीं. चाळींतल्या वातावरणाचा हा दोष आहे असें म्हणायला पाहिजे. असो.

तथापि असें सांगतात कीं, या चाळीच्या दीर्घ इतिहासांत, सर्व भाडेकरू एकत्र आल्याचा असा एक दाखला आहे. विसाव्या शतकाच्या सुरवातीला त्यावेळचे सारे भाडेकरू एकदां एकत्र आले होते. जनजागृतीसाठीं लोकमान्य टिळकांनीं सार्वजनिक गणेशोत्सवाची प्रथा पुण्यांत सुरू केली तेव्हां या चाळींत सार्वजनिक गणेशोत्सव सुरू करावा म्हणून सारे भाडेकरू पूर्वी एकदां (आणि एकदांच—) एकत्रित आले होते.

त्यावेळीं गोपाळराव रामदास, म्हणजे विद्यमान गुंडो रामदास यांचे पूज्य पिताजी, यांनीं आपल्या खोलींत एक सभा घेतली होती. त्यांच्या बारा गुणिले बारा या आकाराच्या खोलींत (उणे तीन गुणिले तीन मोरी) त्या काळीं सर्व भाडेकरूंची सभा कशी झाली याचें आतां अनेकांना नवल वाटलें तरी त्या काळांत तें नवल नव्हतें. या चाळींत एकूण तीन डझन खोल्या असल्या (त्यामुळेंच सर्वांचा एकमेकांशीं





अनुक्रमणिका

## लेखकांच्या नाना 'कळा'!

### शास्त्रीय लेखक



चहूबाजूला विखूरलेले
न्यूटन, रामन, मार्कोनी अन्
गॅलिलिओ, युक्लिड, फॅरडे
सज्ज तयांचे ग्रंथ ठेऊनी
अण्वीक्षेची करी समीक्षा
शास्त्रप्रचुर ह्या दंग लेखनी—
एके दिवशीं दाव विजेचा
शास्त्रज्ञाच्या कारण निधनीं.

छत्तीसाचा आंकडा असतो असें म्हणतात—) तरी त्या काळांत जवळ जवळ पंधरावीस खोल्या जवळ जवळ कायमच्या रिकाम्या असत. बाकीच्या खोल्यांत फक्त भाडेकरू असत, आणि तेच बाकीच्या रिकाम्या खोल्या भाड्याशिवाय वापरत असत. त्यानिमित्तानें खोल्या झाडल्या जातात म्हणून 'कृपा करून आसपासच्या खोल्या वापरा' अशी विनंती मालकातर्फे नेहमीं करण्यांत येई. त्या विनंतीचा मान ठेवण्यांत येत असे. प्रत्येकजण आजूबाजूच्या दोन खोल्या आपल्याच समजून वापरीत असे. ('त्याचवेळीं जर त्यांनीं आणखी दोन खोल्या घेऊन ठेवल्या असत्या तर काय धाड भरली असती? असें म्हणून आपल्या पूर्वजांवर अद्याप ठपका ठेवण्यांत येतो तो त्यामुळेंच! तसेंच आजहि चाळींतलीं पोरें आपल्या खोल्या सोडून दुसऱ्यांच्या खोल्यांतच अधिक खेळत बागडत असतात तीं त्यामुळेंच! कांहीं गुणदोष हे तिसऱ्या पिढींत उगवतात असा शास्त्रीय दाखला आहेच! असो!)

मुद्द्याकडे वळायचें म्हणजे रामदासांच्या खोलींत पहिली वहिली सभा पहिल्या वहिल्या मुद्द्यावरच आटपली आणि रसातळाला गेली. चाळींतल्या सार्वजनिक गणपतीचा आकार केवढा असावा या पहिल्या प्रश्नावरच एकमत होईनासें झालें. आणि प्रकरण भांडाभांडीवर आलें. गणपतीची मूर्ति नऊ इंचापेक्षां मोठी नसावी असें चिंतोपंत कामत यांचें मत पडलें, तर ती चांगली तीन फूट उंचीची असावी असें रामभाऊ खेडकर यांचें मत पडलें. तात्काळ दोघ गट पडले. दीड फूटावर समेट करा असें खुद्द रामदासांनीं सुचविलें. पण नऊ इंचाच्या वर सरकण्यास चिंतोपंत तयार होईनात आणि तीन फुटाच्या खालीं येण्यास रामभाऊ क़बूल होईनात. वर्षांकाठीं एकदां येणारा गणपति, तो सुद्धां चाळीमधल्या पोरांसारखा खुरटा खुजा दिसला तर काय गंमत राहिली! (हा टोला म्हणे चिंतोपंतांच्याच खुरट्या-खुज्या पोरांवर होता!) नऊ उंचीच्या गणपतीचें पोट मोठ्यांत मोठें म्हटलें तरी किती मोठें दाखवितां येईल? अशा गणपतीपुढें 'लंबोदर पितांबर ..' ही आरती म्हणून काय त्याची टिंगल करायची! गणपतीचें पोट एका मोदकाएवढें आणि त्याला नैवेद्य एकवीस मोदकांचा! आणि नऊ इंची गणपतीचा उंदीर काय जर्दाळू एवढा दाखवायचा? कांहीं बोलण्यामध्यें ताळतंत्र? हें रामभाऊंचें आर्ग्युमेंट!

लोकजागृतीसाठीं गणेशोत्सव करायचा. मोदकासाठीं नव्हे! आणि गणपति गणपति म्हणजे तरी काय? मातीची मूर्ति. अकरा दिवसांनीं पाण्यांत बुडवायची. भक्ति उदंड असावी. मूर्ति प्रचंड कशाला? मूर्तीच्या नांवानें आधीं मातींत पैसा आणि मग विसर्जनाच्या नांवानें पाण्यांत पैसा! हा चिंतोपंत कामतांचा व्यवहार!

शेवटीं वादंग माजून सभा तापली. सभा मोडण्यापूर्वीं थोडा वेळ अक्षरशः भांडाभांडी झाली. रामदासांच्या खोलींतलीं भांडीं उचलून (म्हणजे उचलण्यासारखीं-तांबे, ग्लासें.) तीं एकमेकांवर भिरकावण्यांत आलीं. शेवटीं सभा बरखास्त झाली तेव्हां रामदासांचा जीव अक्षरशः भांड्यांत पडला. त्यानंतर पुन्हा सभा झाली नाहीं. गणपति—उत्सवहि कधीं झाला नाहीं. फक्त या एकमेव सभेच्या वडिलार्जित आठवणी आजहि सांगितल्या जातात. आणि त्यावर कुणी अविश्वास दाखविला तर त्याची खात्री पटविण्यासाठीं आपल्या भिंतीवरील खड्डे गुंडे रामदास आजहि दाखवतात.

तीच सभा पहिली आणि अखेरची. त्यानंतर भाडेकरूंची सभा पुनः कधीं भरली नाहीं. वीज कपात, पाणी कपात—दुधांत नव्हे, (जिन्याची) पायरी कपात, (गॅलरींतली) दांडी कपात, (एरियलचा) बांबू कपात अशा किती तरी लहान मोठ्या कपाती झाल्या. त्यानंतर वाण्याची भाववाढ, रामाची पगारवाढ, पोरांची फीवाढ (आणि संख्यावाढ!), मुलींची वयवाढ अशा लहानमोठ्या वाढी झाल्या. पण भाडेकरू विचारविनिमयासाठीं कधीं एकत्र आले नाहींत. विनिमयाचाच विचार करतां करतां त्यांना कधीं विचारविनिमयाकडे लक्ष देतां आलें नाहीं. त्यानंतर पहिली सभा भरली ती चिनी आक्रमणानंतर!

त्या दिवशीं मध्यरात्रीं चाळीच्या गच्चीवर आणीबाणीची सभा भरली. अशा प्रकारची ती पहिलीच सभा. रामदासांच्या खोलींत भरलेल्या सभेंत फक्त दहा पंधरा दादलेच तेवढे हजर होते. ते काय करतील तें शिरसावंद्य मानण्याची त्यावेळची बायकांची प्रथा होती. पण नवऱ्यानें तोंड उघडतांच आपणहि मध्यें तोंड घालण्याच्या आधुनिक बायकांच्या प्रथेमुळें या गच्चीवरील सभेंत बायकाहि प्रचंड संख्येनें हजर होत्या.

'उत्तुंग आमुची उत्तर सीमा इंच इंच लढवूं' असें कवायती गीत गात उद्यां पहाटेला हिमालयाचीं उत्तुंग शिखरें गाठांवयाचीं आहेत अशा निकडीनें सारे भाडेकरू त्या रात्रीं गच्चीवर जमले. प्रश्न आणीबाणीचा असल्यामुळें सर्वांच्या तोंडावर पराकाष्ठेचें गांभीर्य होतें. विशेष म्हणजे सदर प्रश्नाचें महत्त्व चाळीच्या भैयालाहि पटलेलें दिसलें. कारण कधींहि कुणाच्या हातीं गच्चीची चावी न देणारा भैया त्या दिवशीं गच्चीचें दार उघडून बैठक खतम होईपर्यंत स्वतः जातीनें मौजूद राहिला. या आणीबाणीच्या काळांत शत्रूकडून पाणीपुरवठा तोडला जाईल म्हणून योग्य ती खबरदारी घेण्यासाठीं आपण टांकीच्या बाजूला खडा पहारा करीत आहे असा भैयानें बहाणा केला तरी या काळोखांत कुणी तरी बादलीभर पाणी उपसेल या भीतीनें तो पहारा करीत होता हें गंगूबाई तोडरमल यांनीं कधींच ओळखलें.

प्रस्तुत सभेचें अध्यक्षस्थान कोणीं स्वीकारावें

अनुक्रमणिका













अनुक्रमणिका

## रात्रंदिन आम्हां युद्धाचा प्रसंग....!




समर गीत
(WAR PROPAGANDA)

यावर वाद होऊन भांडण होईल असा अनेकांचा कयास होता. पण तो खोटा पडला. अध्यक्षस्थान कोणीं स्वीकारावें हा प्रश्नच निर्माण होण्याआधीं पां. कृ. पारधी यांनीं तें आधींच पटकावलें होतें. ते लवकर जेवले आणि सर्वांआधीं गच्चीवर जाऊन नागपाड्याच्या खड्या पारश्या-सारखे पाण्याच्या टाकीवर उभे राहिले. लोक वर येऊन पहातात तर टांकीवर पा. कृ. (चाळींत त्यांना पांखरूच म्हणतात.) खालीं उतरा म्हणणार कोण? आणि म्हटलेंच तर तो उतरला तर बरा. नाहीं उतरला तर काय करायचें? त्यामुळें पांखरूची अविरोध निवड झाली. शिवाय युद्धासारख्या राजकीय प्रश्नावर बोलण्याचा अधिकार आपला आहे असें त्यांचें स्वतःचें मत होतें. वर्तमानपत्रांतल्या जन-मनाच्या कानोशांत 'मंगळसूत्र असावें कीं नसावें?' या प्रश्नापासून तो 'विनोबाच पंतप्रधान कां?' या प्रश्नापर्यंत अनेक प्रश्नांवर त्यांनीं पत्रें लिहिलीं होतीं. (शीर्षकाच्या शेवटीं प्रश्नार्थक चिन्ह टाकलें कीं प्रश्न निर्माण होतो असा त्यांचा समज असल्यामुळें त्यांनीं आपल्या पत्र-लेखनासाठीं अनेक प्रश्न हातच्या मळासारखे निर्माण केले होते!) अनेक प्रश्नांना त्यांनीं वाचा फोडली होती. आणि पत्रांच्या जोरावर पत्रकार म्हणून त्यांनीं गल्लींत मान्यता मिळविली होती. त्यामुळें, अध्यक्ष होण्यास आपल्या तोडीचा अन्य माणूस शोधून सांपडणार नाहीं हें त्यांनीं गृहित धरलें होतें.

तथापि सभा होण्यापूर्वीं, सिनिऑरिटीच्या जोरावर सभेचें अध्यक्षपद आपल्याकडे चालून यायला हवें म्हणून अण्णाजींनीं सुरुवातीला थोडी कुरकुर केली. तें पद आपल्याकडे आपो-आप चालून येईल अशा कल्पनेनें ते दांत सुद्धां लावून आले होते. पण त्यांच्या शेजारींच बस-लेल्या त्यांच्या बायकोनेंच त्यांना प्रथम विरोध केला. अध्यक्षपद मिळवायला टांकीवर चढलेंच पाहिजे अशी तिची समजूत झाल्यामुळें तिनें अण्णाजींला विरोध केला. "या वयांत टाकीवर जमायचें नाहीं. उगी पाठ लचकली तर ती आणखी लाटण्यानें लाटणार कोण? चपात्याच लाटतां लाटतां आमची पाठ वांकली—" असें पुटपुटून तिनें मोडता घातला.

त्यानंतर पांखरूंनीं सभा सुरू केली. भारतीय संस्कृतींत हिमाल्याचें स्थान काय हें स्पष्ट व्हावें म्हणून त्यांनीं दहा पंधरा संस्कृत श्लोक उतरून आणले होते. ते अडळखत म्हणायला त्यांनीं सुरुवात केली. श्लोकांतल्या कांहीं जड जोडाक्षरांचा त्यांना उच्चार करतां येईना तेव्हां 'उगाच नाहीं संस्कृत भाषा मेली!' असें ते मनांतल्या मनांत म्हणाले. बहुतेकांना श्लोकांचा अर्थ कळा नाहीं. त्यामुळें त्या श्लोकांचा आणि हिमालयाचा कांहींहि संबंध नाहीं असें वाटून "मुद्द्याशीं या—मुद्द्याशीं या" असा अनेकांनीं गलका केला.

"प्रसंग आणीबाणीचा आहे—"

गलका करणाऱ्यांना पांखरूंनीं आठवण करून दिली.

"खरोखरच आणीबाणीचा प्रसंग आहे!"

असें श्रोत्यांतून कुणी तरी ओरडला, तेव्हां ही आणीबाणी श्लोकांशीं संबंधित आहे हें पांखरूंच्या ध्यानीं आलें. त्यांनीं बाकीचे दहा बारा श्लोक तसेच सोडून दिले आणि ते मुद्द्यावर आले.

"मित्र हो, राष्ट्रावर प्रचंड संकट आलें आहे. एकमेकांतलें अंतर विसरून आता सर्वांनीं एकमेकांच्या खांद्याला खांदा भिडवून जवळ आलें पाहिजे." असें अध्यक्षांनीं आवाहन केलें. ती पडत्या फळाची आज्ञा घेऊन अण्णाजींचा सुपुत्र सोनू रामदासांच्या मंदेच्या खांद्याला अक्षरशः खांदा भिडवून त्या काळोखांत तिच्याजवळ आला. त्यामुळें अण्णाजींच्या पत्नीच्या पुढाकारानें सभेंत कांहीं काळ गोंधळ माजला. अध्यक्षांनीं ताहाणावर जोरजोरानें पळी आपटून सभेंत शांतता प्रस्थापित करण्याचा प्रयत्न केला.

"जरा हळूं पळी आपटा! पळी मोडली म्हंजे हो?" अण्णाजीची बायको किंचाळली. (कारण पळी तिची होती!)

"प्रसंग कोणता गुदरला आहे. आणीबाणीचा प्रसंग आहे. आणि तुम्ही या इवल्याशा टिन-भर पळीचें काय घेऊन बसलांत?" खेडकर मास्तर बसल्या जागेवरूनच ओरडले. 'उत्तुंग आमुची उत्तर सीमा इंच इंच लढवूं' हें गीत शाळेंत शिकवून शिकवून त्यांचा आवाज साफ बसला होता.

"तुमच्या ताहाणाला काय होयाचें नाय म्हणून! आमची पळी फुटकन मोडेल!" अण्णाजींना बोलतांना त्रास झाला. अध्यक्षपद न मिळाल्यामुळें आतां आपल्याला तोंड उघडायचा प्रसंग येणार नाहीं अशा कल्पनेनें त्यांनीं आपल्या दांतांच्या कवळ्या काढून खिशांत ठेवल्या होत्या. त्या तोंडांत बसवून बोलावें म्हटलें तर बोलायला मिळेल कीं नाहीं या भीतीनें ओठांची फडफड करीत ते कसे तरी बोलले!

"हें तुझेंच कर्म. तूं पळी दिलीसच कशाला?" असें ते हलक्या आवाजांत बायकोला म्हणाले.

"तुम्ही अध्यक्ष होणार म्हणालात म्हणून दिली. आमचा गो काय कसला अपराध?" तीहि आपल्याच खोलींत असल्यासारखी बोलूं लागली.

"शुत्...शुत्—गप—गप—" शेजारच्या बायका ओरडल्या. त्यांतली एक अण्णाजीकडे बघून हंसली..

तिच्यावर नजरेचे जळजळीत निखारे टाकून अण्णाजीची बायको तोंडावर पदर घेत पुटपुटली, "ये तरी तूं आतां कांदे मागायला... मिऱ्या वाटीन डोकीवर..."

त्यानंतर सभेंत शांतता प्रस्थापित झाली. मग पांखरूंनीं आपल्या भारतीय जीवनांत हिमालयाचें स्थान किती महत्त्वाचें आहे तें समजावून दिलें आणि हिमालयाच्या रक्षणा-साठीं साऱ्या आबालवृद्धांनीं धांवून गेलें पाहिजे असें सांगितलें.

तें ऐकतांच, "पांखरूंनें सांगितलें म्हणून तुम्ही धांवाधिवायच्या फंदांत पडूं नका हां!" असा अण्णाजींच्या बायकोनें अण्णाजींना हळूंच कानांत सल्ला दिला.

त्यानंतर अध्यक्षांनीं खेडकर मास्तरांना पाचारण केलें. आणि उत्तर सीमेची परिस्थिति समजावून देण्याची विनंति केली. त्यामुळें खेडकर मास्तर हुरळून गेले. प्रौढांना शिकव






अनुक्रमणिका

ण्याची, त्यांच्या आयुष्यांत त्यांना प्रथमच संधि मिळाली होती. भूगोल आणि गणित हे त्यांचे आवडते विषय. त्यांनीं लगेच खिशांतून खडूच्या कांड्या काढल्या. खडूच्या कांड्या चोवीस तास त्यांच्या खिशांत असतात. धोतराची कनवटसुद्धां सैल होऊं नये म्हणून ते तेथें खडूची कांडीच लावतात. चाळीच्या संडासाच्या भिती ज्या त्रिकोण–चौकोनांनीं सजल्या आहेत त्याहि त्यांच्याच कृपेमुळें !

श्रोत्यांच्या हातापायांवर पाय देत (तीहि त्यांची पहिलीच संधि !) ते अध्यक्षांकडे गेले. सर्वांकडे गहन दृष्टीनें पहात त्यांनीं संवयीनें खडूवर फुंक मारली आणि मग "आपला भारत देश हा साधारणपणें त्रिकोणी आहे" असें सांगून ते टांकीकडे वळले. मग त्यांनीं टांकीवर हिंदुस्थानचा नकाशा काढला. हिमालयाच्या जागीं रेघोट्या मारल्या. आणि "हाच हिमालय आतां संकटांत आहे" असें त्यांनीं सांगितलें. "एकावर एक दहा चाळी उभ्या केल्या तरी हिमालयाची उंची भरणार नाहीं." असें त्यांनीं सांगतांच कांहीं म्हाताऱ्यांनीं तोंडावर पदर घेऊन "अब्बब्बब्ब" असे उद्गार काढले. ते उद्गार ऐकल्यावर खेडकर मास्तरांनीं केवळ संवयीनें नकाशाच्या बाजूला "व्हेरी इंपॉर्टण्ट" असें लिहून ठेवलें.

"हा नकाशा उद्या......" (वहीवर काढून आणा.) असें ते सांगणार होते. पण मध्येंच त्यांनीं जीभ चावली. हा पोरांचा वर्ग नव्हे हें वेळींच त्यांच्या ध्यानीं आलें. (टांकीवरला तो 'व्हेरी इंपॉर्टण्ट' नकाशा मात्र बरेच दिवस तेथेंच राहिला. पुढें कावळे आणि कबुतरें यांच्या संयुक्त प्रयत्नामुळें त्या नकाशाचा 'रिलीफ मॅप' झाला आणि हिमाच्छादित शिखरें उठावदार दिसूं लागलीं.)

त्यानंतर "कांहीं डिफिकल्टी आहे?" असें खेडकरमास्तरांनीं विचारतांच "सिट डाऊन–" अशी कोणीतरी काळोखांतून आज्ञा केली आणि खेडकर मास्तर खाली बसले.

त्यानंतर अध्यक्षांनीं चाफेकरांना पाचारण केलें.

"चाफेकर, आतां थोडे ठराव पटापट टाइप करून घ्या बघूं. तुमचा जरा मराठी टाइपरायटर आणा जा—"

"पण पानाचा हिशोब......" चाफेकर दांत कोरूं लागले.

"काय चाफेकर तुम्ही!...अहो पण... पण हें काम काय कोणाच्या घरचें आहे! राष्ट्राचें कार्य..." अशी अध्यक्षांनीं रदबदली केली.

"चला...उठा...उठा...आणा टाइपरायटर..." सर्वांनीं ओरड करतांच चाफेकर खालीं गेले आणि मुकाट्यानें टाइपरायटर घेऊन आले.

टाइपरायटरवर कागद चढवून त्यांनीं अध्यक्षांच्या तोंडाकडे पाहिलें.

"घ्या पटापट ठराव..."

ठराव पहिला—पोपटलाल चाळीच्या भाडेकरूंची ही आणीबाणीची सभा लाल चीननें भारतावर केलेल्या पाशवी आक्रमणाचा तीव्र निषेध करीत आहे. हें आक्रमण लाल चीननें मागें घेतलें नाहीं तर त्याचे गंभीर परिणाम चीनला भोगावे लागतील असा कडक इशारा ही सभा देऊं इच्छिते. त्याचप्रमाणें प्रयत्नांची पराकाष्ठा करून आपले जवान हिमालयाच्या शिखरावर लढत आहेत तें पाहून या सभेची छाती कौतुकानें फुगत आहे. जवानांना सर्व प्रकारचें साहाय्य देण्यासाठीं तमाम जनतेनें स्वार्थत्यागाच्या निर्धारानें उभें राहिलें पाहिजे अशी ही सभा सर्वांस कळकळीचें आवाहन करीत आहे."

चाफेकरांनीं हा ठराव टाईप करून देतांच अध्यक्षांनीं तो वाचून दाखविला. तो एकमतानें पास झाला.

ठराव दुसरा—पोपटलाल चाळीच्या मालकांस ही सभा अशी विनंति करीत आहे कीं त्यांनीं चाळीच्या नांवांतला 'लाल' हा शब्द तात्डतोब रद्द करावा. पोपट चाळ किंवा पोपटा वाला चाळ असें नवें नामाभिधान करावें. हा ठराव हातीं पडल्यावर आठ दिवसांच्या आंत मालकांनीं हा नांवांतला बदल घडवून आणावा. आणि चाळीवर नवीन नांव रंगवावें. तसें न झाल्यास 'लाल' हा शब्द सभेमार्फत खरवडून टाकण्याची मोहीम हातीं घ्यावी लागेल."

हा ठराव सभेपुढें येतांच नाटेकरांनीं उपसूचना सुचविली ती अशी—'याच वेळीं मालकांनीं चाळीचा जुना लाल रंग बदलून सबंध चाळीला नवीन रंग द्यावा.' या उपसूचनेंत आणखी एक दुरुस्ती सुचविण्यांत आली ती अशी—'नवीन रंग द्यावा' आणि 'चाळीला' या दोन शब्दांमध्यें 'आंतून आणि बाहेरून' असे शब्द घालावेत. या दुरुस्त उपसूचनेवर कांहीं काळ वादंग माजलें. कांहींच्या मतें खोल्यांना रंगसफेती लावून घ्यायला हाच काळ योग्य आहे. पण कांहींच्या मतें या

लेखकांच्या नाना 'कळा' :

अश्लीलवाले लेखक



पुरो पार्श्वदेशीं विवस्त्राकृतींच्या
उरोजें किती मस्त अन् अश्लील
लिहोनी कथा अन् निशीं मानसीच्या
सवत्रा करी आपणां रंगील
नशा जेधवां राजदंडे तयाची
कुणी वस्त्र फेडोनि उत्सारिली
तदा होऊनी माळ ती वैजयंती
दिसे मंदिरीं मूर्ति ती सांवळी

दुसऱ्या उपसूचनेंतून राष्ट्रप्रेमापेक्षां भाडेकरूंचा स्वार्थच जास्त उघड होतो. या वादांत कदाचित थोडा अधिक वेळ गेला असता तर एक मूळ ठरावाशिवाय दुरुस्त उपसूचनाच मंजूर झाली असती. पण मूळ ठराव टाईप झालेला आहे, तो पुनः पुनः टाइप करणार नाहीं असें चाफेकरांनीं बजावतांच उपसूचना बाजूला पडली. आणि अनायासें स्वार्थत्यागी पक्षाचा विजय झाला.

त्यानंतर आणखी एका ठरावान्वयें 'न्यू चायना मिल'चें नांव बदलण्यांत यावें, चायना ग्रास विकणाऱ्या गाडीवाल्यांना परमिटें देण्यांत येऊं नयेत, चिनी दंतवैद्याकडून दांत पाडून अथवा बसवून घेऊं नयेत, वाणीजनांनीं साखरेला चिनी हा शब्द वापरूं नये अशी विनंति करण्यांत आली.



अनुक्रमणिका

या स्ट्र-कार्याला आपल्या शक्तीनुसार आपलाहि हात लागावा या हेतूनें पास झालेले ठराव नाटेकरांनीं आपल्या हातीं घेतले आणि बारकाईनें वाचून काढले. "छे-छे! पहिलीच गॅली आहे वाटतें!" असें आपल्याशींच पुटपुटून त्यांनीं खिशांतलें पेन काढलें आणि पटापट अक्षरांवर रेघोट्या मारून समासांत प्रुफ करेक्शन चालू केलें. नाटेकर हे प्रणय पंढरी प्रेसमध्यें प्रुफ-करेक्टर होते. (ते फुल-कलेक्टर आहेत असें त्यांची बायको म्हणते तें तिला अक्षर-ओळख नसल्यामुळें!)

तें पाहून पांखरू एकदम भडकले.

"नाटेकर, सभेनें पास केलेल्या ठरावांत ढवळाढवळ करायचा तुम्हांला अधिकार नाहीं."

"ढवळाढवळ नाय वो करीत! पण केवढ्या करेक्शन आहेत! पयल्या गॅलींत सुद्धां आमच्या प्रेसमध्यें येवढ्या करेक्शन नाय गांवायच्या—"

तें ऐकतांच आणीबाणीची परिस्थिति असून सुद्धां सभा खळखळून हंसली.

त्यानंतर सभेच्या विनंतीवरून चाळीचा भैया, तळमजल्यावरचा कोळसेवाला आणि दाणेवाला वाणी यांनीं सभेसमोर उभे राहून शपथा घेतल्या. पाणीपुरवठा आणि वीज-पुरवठा सुरळीत चालू ठेवीन अशी भैयानें शपथ घेतली. कोळशांवर पाणी मारून किंवा वजनांत हात मारून कोळसा दिला जाणार नाहीं अशी कोळसेवाल्यानें शपथ घेतली. युद्धाचा फायदा घेऊन किराणा मालाचे भाव वाढवणार नाहीं अशी वाण्यानें शपथ घेतली. पण युद्धकाळांत बिलें नाटपेड ठेवणें परवडणार नाहीं ही पुष्टी त्यानें शपथेला जोडावी हें बहुतेक भाडेकरूंना आवडलें नाहीं.

त्यानंतर संरक्षण-निधीस मदत द्यावी असें पांखरूंनीं सुचविलें. इतकेंच नव्हे तर आपल्या हातरुमालाला गांठी मारून त्यांनीं रुमालाची तत्काळ झोळी केली.

"चला, लोक हो, उठा-उठा—"

ताबडतोब सर्वजण चुळबुळले. पण कोणी उठले नाहींत.

"पण जरा थांबा, थोडें थांबा—" धोंड उभें रहात म्हणाले.

"छे-छे! थांबायला वेळ नाहीं. उठा—ऊठा—"

"थोडें थांबा—" धोंड म्हणाले, "प्रत्येकाला पगारांतून नियमितपणें पैसे देणें बरें पडेल. त्याचा हिशोबहि चोख राहील. झोळींतल्या पैशाचा हिशोब नसतो—"

"तुम्ही माझ्यावर अविश्वास दाखवतां आहांत, धोंड!" पांखरूंनीं झोळीनें तोंड पुसलें.

"अविश्वास नाहीं. पण जरा थांबा. थोडें थांबा!"

"आतां थांबायला वेळ नाहीं. लवकर उठा-उठा!"

हा संवाद ऐकून सभेंतले लोक हंसले. कारण "उठा, लवकर उठा-" आणि "जरा थांबा, थोडें थांबा-" या संवादामागची पार्श्वभूमि त्यांना ठाऊक होती. पा. कृ. ची क्रॉनिक डिसेंट्री ('उठा, लवकर उठा-') आणि धोंडांचा बद्धकोष्ठ ('जरा थांबा, थोडं थांबा!) यांची त्यांना आठवण झाली.

एरव्ही धोंडांचा सबुरीचा सल्ला कोणी ऐकला नसता. पण सभेंत मात्र सर्वांनीं धोंडांना पाठिंबा दिला. त्यामुळें पां. कृ. ना झोळी पुनः खिशांत घालावी लागली. अर्थात् त्या बदल्यांत जवानांसाठीं कपडे आणि फराळ जमवण्याचा आदेश सभेनें पां. कृ. ला दिला.

शेवटीं जनजागृतीसाठीं ज्यानें त्यानें आपापल्या परीनें प्रयत्न करावेत असें ठरवून सभा बरखास्त झाली.

दुसऱ्या दिवशीं चाळभर 'अन्न द्या-वस्त्र द्या' अशीं हस्तलिखित पोस्टरें लागलीं. पां. कृ. चीं उत्साही पोरें खोली खोलीच्या दारावर जाऊन जुनीं वस्त्रें आणि फराळ जमवूं लागलीं. पुढें पुढें त्यांचा उत्साह इतका वाढला कीं 'अन्न द्या-वस्त्र द्या' या घोषणेऐवजीं तीं पोरें "अन्नदान-वस्त्रदान-दे दान सुटे गिराण" असें ओरडूं लागलीं. आणि त्या घोषणेवर विश्वास ठेवून गंगुबाई तोडरमल्ल यांनीं तर कांहीं न खातां उपास केला. आणि ग्रहण सुटण्याची वाट बघत बसल्या. पण सकाळपासून सुरू झालेलें गिराण रात्रीपर्यंत संपेना तेव्हां हें सूर्यग्रहण आहे कीं चंद्रग्रहण आहे हें त्यांना कळेना. शेवटीं पंचांगांत पाहून ग्रहणाचा योग नाहीं हें त्यांच्या लक्षांत आलें आणि फुकट कपडे दिले अशी त्यांना चुटपुट लागली.

दोनचार दिवस ही मोहीम चालू होती. महिन्याच्या मुलाच्या लंगोटापासून तो जुन्या नऊ वारी लुगड्यापर्यंत अनेक प्रकारचीं वस्त्रें पां. कृ. चीं पोरें जमवीत होतीं. पां. कृ. च्या पत्नी कृपाबाई यांनीं फराळाच्या पुड्या जमा केल्या.

कैसूअण्णा पहांटे चार वाजतां उठून आणि भसाड्या आवाजांत भूपाळी आळवून त्रास देतात म्हणून ते सर्व भाडेकरूंच्या शिव्या खात असत. पण सभा झाल्यापासून ते परमीट मिळाल्यासारखे वागूं लागले. चार वाजतां जाग येतांच "जिंकू किंवा मरूं" हें गीत म्हणत ते सर्व मजल्यावरील गॅलऱ्यांतून उघड तोंडानें फिरूं लागले.

"काय लावलीय कटकट अण्णा सकाळींच?"

"जनजागृति करतो आहे. सभेचाच निर्णय आहे!" असें सांगून अण्णा जिंकूं किंवा मरूंच्या निर्धारानें वरच्या मजल्यावर जाऊं लागले.

त्यानंतर पुढें काय झालें तें कोणालाच कळलें नाहीं.

"आमचे गड्डे आज आसामपर्यंत पोंचले असतील, उद्यां तेजपूरला जातील..." अशी पां. कृ. च्या तोंडची भाषा चार दिवस ऐकूं आली.

त्यानंतर थोडे दिवस पां. कृ. चीं पोरें खाव खाव करीत इतरांच्या खोलींत आलीं नाहींत हा ठळक फरक अनेकांच्या लक्षांत आला. आणि दुपारीं साऱ्या बायका सैंपाक आटपून झोपल्यानंतर कृपाबाईकडे एकाच आठवड्यांत दोनचारदां बोहारीण आली आणि पातेलीं-टोप देऊन गेली असा शोध कांहीं बायकांना लागला.

आणि त्यानंतर सभेनें चाळींत प्रथमच निर्माण केलेलें एकोप्याचें वातावरण पुनश्च गढूळ झालें.



## स्वप्न

निर्मला देशपांडे

शपथ सांगते, स्वप्न नव्हे ग!
सत्यचि मज गमलें,
स्वप्निं मीं श्रीहरिला वरिलें!
गळ्यांत माझ्या, स्वयें घातली
मणि-मंगल-माला
स्वप्निं मीं घनःश्याम वरिला!
अंग रंगलें हळदीनें अन्
लग्नचुडे भरले,
स्वप्निं मीं रंगनाथ वरिलें!
लग्न-सोहळा बघण्यास्तव गे
वऱ्हाड तें जमलें!
स्वप्निं मी बोहल्यावर चढले!
सदा-सुवासिनी मीरे लागी
स्वप्निं जाग आली
मीरा हरिसंगे गेली!










‘ही दिवाळी
आमच्या ग्राहकांस
व हितचिंतकांस
सुखसमृध्दीची
व आनंदाची जावो’



किर्लोस्कर

# किर्लोस्कर ब्रदर्स लिमिटेड

किर्लोस्करवाडी, जि. सांगली

TOM & BAY





अनुक्रमणिका



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास






—विजय तेंडुलकर

*“साहेब गणपती शपथ सांगतों,*
*लग्न झालंय माझं....*
*ती काळी का गोरी तें मीं काल रात्रीं प्रथम पाहिलं....*
*वांकड्या डोळ्यांनीं कुठं पाहिल्याचं कळलं तर*
*आई अजून डाग देईल....शपथ....साहेब....!*

एके दिवशीं मुंबईत मोठा सार्वत्रिक संप झाला आणि रेल्वे शेडमध्यें “काम बंद करा! काम बंद करो” असं ओरडत किंचाळत तो धांवत सुटला. कामगारांच्या हातांतलीं हत्यारं त्यानं हिसकावून घेतलीं, रेंगाळणाऱ्यांना हात धरून खेचलं, विरोध करणारांशीं झटापट केली आणि शेड बंद पाडली. वास्तविक त्याचा त्या संपाशीं कांहीं संबंध नव्हता. त्याचा राजकारणाशीं, कामगार-चळवळीशीं नाममात्रसुद्धां संबंध नव्हता. सबंध आयुष्यांत तो एवढा कधीं किंचाळला नव्हता, धांवला नव्हता, कुणाच्या कामाआड आला नव्हता. त्या दिवशीं काय झालं कोण जाणे, त्याच्या अंगांत संचारच झाला. झपाटल्यासारखं सारं घडलं. त्याच्या हातीं कांहीं उरलंच नव्हतं. त्याचा आवाज साफ बसला. अंग पार दुखून आलं. डोकं जड बधिर होऊन गेलं. डोळ्यांतली लाली दुसऱ्या दिवशीसुद्धां तशीच होती. दुसऱ्या दिवशीं सकाळीं नेहमींसारखा तो उठला. आईनं पाणी तापवलं होतं त्यानं आंघोळ केली. बायकोनं पुढं ठेवलेला चहा घेतला. तिनं तोंवर डबा बांधून पुढें ठेवला होता तो उचलला. पण त्याला कळेना, कुठं जायचं. कामावर जाण्याचा प्रश्नच नव्हता. कालच संप केला होता. संप बेमुदत असल्याची पुढाऱ्यांची घोषणा होती. मागण्या मिळाल्याशिवाय, अन्याय दूर झाल्याशिवाय माघार नाहीं असा कामगारांचा निर्धार होता—निदान तसं त्यानं कालच एका दैनिकाच्या अंकांत अगदीं ठळक टाइपांत छापलेलं वाचलं होतं. संध्याकाळच्या प्रचंड सभेंत ऐकलं होतं. खरं म्हणजे काल त्या दैनिकांतलं संपाबाबतचं सारं कांहीं त्यानं वाचलं आणि मगच त्याचं डोकं पेटलं. तो अन्याय, ती पिळवणूक वाचल्यावर त्याचं रक्त गरम झालं. दिवसाढवळ्या, राजरोस हा अन्याय, ही पिळवणूक मूठभर वाईट माणसं हजारों साध्याबगड्या, सरळमार्गी, कष्टकरी, गरीब लोकांवर लादत होतीं. त्यांना नाडत, बुचाडत होतीं. आणि कोणी कांहींच करीत नव्हतं. त्याला आश्चर्य वाटलं, या-आधींच कसं याविरुद्ध कुणी कांहीं केलं नाहीं? हें सारं कसं सहन केलं? जाणत्या पुढाऱ्यांनीं तरी हें कसं चालूं दिलं? पण मग त्याला स्वतःचा विचार सुचला. आपण हें सारं कसं सहन केलं? आपलीहि ही पिळवणूक होती, आपल्यावरहि हा अन्याय रोज, हरघडीं होत होता. तरीहि आपल्याला याचा दादपत्तादेखील नव्हता. रोज खच्चून काम करीत होतों. तंबाखूचे बार मारीत होतों. चहा ढोसत होतों. घरचा डबा फस्त करीत होतों. मिळतील ते पैसे उपकार झाल्यासारखे घेऊन आनंद करीत होतों, संपले म्हणजे आपलाच खर्च फार होतो असं समजत होतों, आईला बायकोला दोष लावीत होतों, उसनवारी करीत होतों आणि ती फेडतांना नवी उसनवारी करीत होतों. बायकोचं ॲबॉर्शन झालं तेव्हां जवळ दिडकी नव्हती. मग आणा व्याजानें मारवाड्याकडून कर्ज काढलं. तो खड्डा बुजवतां बुजवतां मला महिना उजाडला. नुसतं व्याज फिटतांनाच नाकीं नऊ येत. मध्यंतरीं पुन्हा बायकोला दिवससुद्धां गेले. आपण दोष नशिबाला देत होतों. पण दोष आपलाच होता. अन्यायाची, पिळवणुकीची जाणीव आपल्याला नव्हती. आपण बुद्दूसारखे जगत होतों. बस्स झाला इतउप्पर हा बुद्दूपणा. त्यानें खूणगांठ बांधली पेपर टाकून, अंघोळ कशीबशी उरकून, चहा ढोसून तो स्टेशनकडे पळत सुटला. वातावरण संपाचं होतं. घोळक्या घोळक्यानं लोक चर्चा करीत उभे होते. जो तो संप बोलत होता. गाड्या बंद पडणार, गिरण्यांवर दगडफेक चालली आहे, अशा बातम्या कानांवर पडत होत्या. लगेच परत घरीं

येण्याची बहुतेकांची तयारी दिसत होती. त्याचा उत्साह वाढला. त्याला चेव चढूं लागला. संप घडवण्यांत आपला हात आहे असं त्याला मनोमन उगीच वाटूं लागलं. संपाबद्दल तुच्छतेचे, कुचेष्टेचे उद्गार काढणाऱ्या चौघा इस्तरीवाल्यांना त्यानं शब्दांनीं खरपूस झोडून काढलं. लोकलमध्यें संपावर त्यानं भोंवतालच्या पंगत्या, कंटाळल्या मंडळीला एक छोटं लेक्चरच सुनावलं. अन्याय पटवून दिला. निदान कुणी विरोध केला नाहीं. त्याचा उत्साहच तसा होता. शेडच्या दाराशीं तो पोंचला तोंवर त्याच्या उत्साहाला अक्षरशः उधाण आलं होतं. तो फुरफुरत होता. मग पुढें जें घडलं तें घडलं. त्यालाहि अनपेक्षित असं. संध्याकाळीं मैदानावर प्रचंड सभा झाली होती. धन्यवाद देण्यांत आले होते. संप यशस्वी होणार असा पोलादी विश्वास उच्च स्वरांत बोलून दाखवण्यांत आला होता. गर्दींत पाय आंखडून बसून तें ऐकतांना त्याला केवढं धन्य वाटलं होतं. घरीं येऊन तो डाराडूर आणि तृप्त झोंपला; एखाद्या विजयी वीरासारखा.

पण आतां त्याचा प्रथमच गोंधळ उडाला. डबा घेऊन तो नेहमींसारखा घरांतून बाहेर पडला खरा, पण जायचं कुठं तेंच कळत नव्हतं. बसलेल्या आवाजाखेरीज कालचं कांहींच उरलं नव्हतं, आज काय करायचं तें सांगण्यांत आलेलं नव्हतं. सकाळच्या पेपरांत कालच्या संपाची, सभेचीं विलक्षण परिणामकारक वर्णनं आलीं होतीं; फोटोसकट. त्यांत सर्व रेल्वे वर्कशॉप्सवर काल कडकडीत हरताळ होता असं छापलं होतं तें त्यानं पुनः पुन्हा वाचलं होतं. अग्रलेखांतले लढाऊ कामगारांना दिलेले धन्यवाद त्यानं स्वतःला मिळाल्यासारखे घोळघोळून वाचले होते. त्यांतहि आज काय, उद्यां काय, यानंतर मागण्या मिळेपर्यंत पुढें काय तें कुठंच दिलेलं नव्हतं. वाचतांना त्याला त्याची गरजहि भासली नव्हती. वर्णनांनींच तो फुलून आला होता. पण आतां ती गरज भासली. तो स्टेशनवर गेला. वर्कशॉपचे कांहीं लोक गाडीसाठीं चोरून, संकोचून, उगीचच मधून मधून ओशाळे हंसत उभे होते. जावं कीं न जावं याबद्दल त्यांचाहि निश्चय ठरला नव्हता. त्याच्यासारखेच ते संवयीनं घरून निघाले होते, स्टेशनवर पोंचले होते. गाडीची वाट पहात होते.

एकजण म्हणाला, "साला संप बारगळला. निम्मे कारखाने म्हणे चालूच होते."

"कोण म्हणतो?" त्यानें चिडून विचारलं.

"आजच्या पेपरांत आहे." तो दुसरा म्हणाला. "हें बघ ना." त्यानें त्याच्याजवळचा पेपर काढून दाखवला. त्यांत संप फक्त पन्नास टक्केच यशस्वी झाल्याचं मोठ्या टाइपांत छापलं होतं. संपाचा अविचार न करण्याबद्दल राष्ट्रीय वृत्तीच्या हजारों कामगारांना मनःपूर्वक धन्यवाद दिलेले होते. संप चालू रहाणार नाहीं आणि बहुतेक कामगार कामावर जातील असं भाकित हमीपूर्वक केलेलं होतं. त्याचं रक्त गरम झालं. त्याला वाटलं कीं या पेपरचे तुकडे तुकडे करावेत. हा भांडवलशाही प्रचार आहे. सरकारचा कामगारद्रोही कावा आहे. कालच्या सभेंत हें त्यानं ऐकलं होतं. याची प्रचीति एवढ्या लौकर येईल असं त्याला वाटलं नव्हतं.

पण मग आणखीहि पेपरांमध्यें तशाच बातम्या वेगवेगळ्या शब्दांत होत्या. संप शंभर टक्के यशस्वी असल्याचं, त्याच्या जवळचा पेपर सोडला तर कुणीहि छापलं नव्हतं. त्यानं आवेशानं आपला पेपर काढला. सर्वांना दाखवला. बाकीचे पेपर भांडवलशाहीचे आणि सरकारचे हस्तक असल्याचं बजावलं. गाडी आली आणि इतरांबरोबर










अनुक्रमणिका

तो देखील गाडींत चढला. पण त्याला कळत नव्हतं. एकाच संपाबद्दल एवढं परस्परविरुद्ध कसं छापलं जाऊं शकतं! एकच संप शंभर टक्के यशस्वी आणि अयशस्वी कसा होऊं शकतो.

शेडच्या फाटकाशीं मोटा घोळका जमला होता. सगळे न बोलतां एकमेकांकडे पहात होते. घोटाळत होते. कुणी तरी एकानें फाटक्या स्वरांत ओरडण्याचा प्रयत्न केला "कामगार एकजुटीचा—" त्याला दोघाचोघांनीं चोरट्या आवाजांत साथ केली, "विजय असो–" आणि मग हें जें विनोदी झालं त्याला सगळेच खजील हंसूं लागले. घोषणा देणाऱ्यानं एकाला गांठून तंबाखूचं पान तयार करण्याला सुरुवात केली. चुनातंबाखू मळीत तो त्याला गांवच्या गोष्टी ऐकवूं लागला. मग वेळ भरूं लागली तशी एकेकजण इकडे तिकडे पाहून हळूच आंत सरकूं लागला. जाणाऱ्याचं पाहून नवे नवे धीट बनूं लागले. होतां होतां घोळका भराभर ओसरूं लागला. आंत रिता होऊं लागला. बरोबरचा म्हणाला, "साला चल. आपण पण आंत जाऊं या. संप ठार मेला. च्यायच्या संपाच्या..." तो राजरोस आंत निघूनहि गेला. बाहेर उभे राहून हें पहातांना तो आश्चर्यानं आणि उद्वेगानं तुडुंब भरून गेला. कालचं सारं कुठं गेलं त्याला कळेना. एका रात्रींत हा एवढा फरक कसा झाला त्याचा उलगडा त्याला होईना. काल संध्याकाळची भाषणांनीं दणाणणारी प्रचंड सभा त्याला एकाएकीं स्वप्नवत् वाटूं लागली. तिच्यांतलीं त्वेषपूर्ण भाषणं दूरच्या लाउडस्पीकरवरनं ऐकूं येणाऱ्या सत्यनारायणाच्या पूजेसारखीं कळाहीन, निःसत्त्व भासूं लागलीं. कालच्या दिवसांत केलं तें सारंच हास्यास्पद, फार भकास, फार अर्थहीन वाटूं लागलं. त्याच्या पोटांत पहातां पहतां खड्डा पडला. एक चमत्कारिक भीति त्यांत पहातां पहातां खळबळूं लागली, फुगूं लागली. घशांतले दगडासारखे आवंढे त्यानं कसेबसे गिळले. पडल्या खांद्यांनीं, खालमानेनं मग तो फाटकाआंत शिरला, काल ज्यांना त्यानं कामापासून परावृत्त केलं होतं त्या सर्वांसमोरून आपल्या कामावर हजर झाला. कुणी नुसतेच कटाक्ष टाकले तर एकदोघांनीं त्याला हांकारलं; एखादा मामुली प्रश्न केला— उत्तराची फारशी अपेक्षा नसलेला, त्याला वाटलं सगळे आपली कुचेष्टा करताहेत. आपल्याला मनोमन खद्खदा हंसताहेत. आपल्या कालच्या प्रकारांची आपल्या पाठीमागें टर उडवताहेत. त्याला घाम फुटला.



डोक्यांत कसनुसं झालं. पोटांत चीड आणि भीति पुन्हा खळबळूं लागली. त्याला वाटलं, जवळच्या त्या आगलाव्या पेपराची राखरांगोळी करावी. कुठें आहे लढाऊ कामगार? कुठें आहे संपाचा पोलादी निर्धार? यशाची शंभर टके खात्री कुठें आहे नि अन्यायाविरुद्ध चीड—ती तरी कुठें आहे? आपल्यांतसुद्धां नाहीं. कुणांतहि नाहीं. धडधडीत खोटं छापणाऱ्या त्या पेपराची त्याला मनस्वी चीड आली. त्याला वाटलं कीं यामुळें सगळं घडलं. त्यानं तो काढला आणि त्याचा चोळामोळा केला. त्यानं त्याला पुष्कळ बरं वाटलं.

दुपारीं जेवणाच्या सुटींत बोलवा उठली कीं संपांत भाग घेतलेल्यांविरुद्ध रेल्वे ॲक्शन घेणार आहे. नोटिसा निघणार आहेत. कुणी म्हणाले, इंक्रिमेंट्स् थांबवणार आहेत. कुणी इन्क्वायरीची बातमी आणली. कोण सस्पेन्शन म्हणाले. कुणी रिव्हर्शन. मग तोच विषय होता. खाणं फारसं झालं नाहीं. अर्धेच डबे बांधले गेले. कुणी खाल्लेच नाहींत. तो हें सारं ऐकत होता, पहात होता. अस्वस्थ होत होता. त्याला उगीचच वाटत होतं कीं हें आपल्याला उद्देशून चाललं आहे. पोट दवळून निघाल्यागत होतं. त्यानं डबा न खातां तसाच पिशवींत भरला. तो आपला ग्लासावर ग्लासं पाणीच पीत राहिला. ॲक्शन आलीच तर त्यांतून आपण सुटणं शक्य नाहीं हें त्याला आतां कळून चुकलं होतं. आपल्यावरच जास्त लक्ष जाईल असं त्याला नक्की वाटत होतं. आतां त्याचा त्यालाच तो फार मूर्ख, फार वेडा, फार बुद्दू वाटूं लागला. कारण नसतांना काय काय त्यानं केलं होतं! केवळ एका खोटारड्या पेपरांतल्या लिखाणाला बळी पडून. वास्तविक आपण बरं, आपलं काम बरं हा त्याचा बाणा होता. मिळेल त्या पैशांत जगण्याची त्याला संवय झालेली होती. त्याची मुळांत कसली तक्रारच नव्हती. सर्व कांहीं त्याला मान्य होतं. आणि तरीहि काल त्यानंच सर्वांत जास्त दंगा केला होता, काम बंद केलं होतं इतकंच नव्हे तर काम बंद पाडलं होतं. एखाद्या पुढाऱ्यासारखा तो काल वागला होता—कारण आणि लायकी नसतांना! आपलं चुकलं हें त्यानं पक्कं मान्य करून टाकलं. आतां दुसरं गत्यंतरच नव्हतं. स्वतःला त्यानं शेलक्या शिव्या देऊन घेतल्या. स्वतःवर म्हणून तो एकदां बाजूला थुंकलाहि. पण मग त्याच्या डोक्यांत आलं कीं माणूस अशा वेळीं निमित्तमात्रच असतो. सारं विधि–संकेतानुसार घडतं. होणारं चुकत नाहीं. आपलं हें असं व्हायचं होतं म्हणून तसं घडलं. कर्ज व्हायचं होतं म्हणून बायकोचा गर्भपात घडला. घडलं त्याला आतां इलाज काय? त्यानं ठरवलं कीं आतां फक्त एकच करायचं. त्याचा एक फेव्हरिट गणपति होता. त्याला रोज एक आण्याचा हार आणि पंचवीस प्रदक्षिणा घालण्याचं त्यानं ठरवलं. या प्रकरणाचा काय तो एकदां निकाल लागेपर्यंत तो असं करणार होता. त्या दिवशींच त्यानं याला सुरुवात केली. प्रदक्षिणा घालतांना आणि गणपतीपुढें अंग पसरून नाक घासतांना, केल्या मूर्खपणाबद्दल त्यानं त्याची दहा वार क्षमा मागितली. तूंच तार अशीं आर्जवं केलीं. पुन्हा असं करणार नाहीं अशी पुन्हां पुन्हां शपथ घेतली. तेव्हां त्याला पुष्कळ हलकं वाटलं. निघण्यापूर्वी देवळांतली घंटा बडवतांना तर तो चक्क आनंदी होता; हल्काफूल होता. त्यानं सगळा भार गणपतीवर टाकला होता आणि एक प्रकारें तो मोकळा झाला होता.

पण शेडमधलं वातावरण दिवसागणिक बिघडतच गेलं. नवनव्या भुमका उठत होत्या, पसरत होत्या. यानं चहाडी केली, त्यानं केली म्हणून कुजबुजते आरोप आणि दुस्वास होत होते. लिस्ट तयार झाल्याचं



अनुक्रमणिका

बोललं जात होतं. उद्यां नोटिसा येणार असे रोज कळत होतं. आणि कांहीं घडत नव्हतं. त्याच्याबद्दल कांहीं तरी विशेष उपाययोजना होईल असा कित्येकांचा—नि त्याचाहि—दाट कयास होता. कांहीं आपल्या संप करण्याची जिम्मेदारी त्याच्यावर टाकून मोकळे होण्याच्या तयारींत होते. तर कांहीं त्याला सरळ माफी मागण्याचा सुज्ञ सल्ला देत होते. प्रथम त्यानं हें फारसं लावून घेतलं नाहीं. अखेर जें व्हायचं तें होणार होतं आणि गणपतीची उपासना तो न चुकतां करीतच होता. पण मग हळू हळू यांतली भीति त्याच्या मनांत सरकली. आपला बांटा मोठा तेव्हां आपल्याला बहुतेक कामावरून काढूनच टाकतील असं त्याच्या मनानं घेतलं. आणि सस्पेन्शनची ऑर्डर हातांत पडली तेव्हां त्याला त्यांत अनपेक्षित कांहींच नव्हतं. गेल्या कांहीं दिवसांत त्याच्या कल्पनेंत अनेकवार ही ऑर्डर त्यानं घेतली होती. तरीहि ती अगदीं सुन्न झाला. क्षणभर दगड बनला. ती ऑर्डर खिशांत ठेवण्यालाहि त्याचं शरीर हलेना. अंग थंड पडतं आहेसं वटलं आणि पाय गुडघ्यांत लटपटले. कसाबसा तो ऑर्डर घेऊन घरीं आला. आतां कठीण असलं तरी आईला, बायकोला सगळं सांगणं भाग होतं. उद्यांपासून कामावर जावं लागणार नव्हतं. त्यानं मन कटीण करून सांगितलं आणि तसाच तडक तो निघून गणपतीकडे आला. त्याच्या पायावर त्यानं नेहमींहून अधिक डोकं घासलं, त्याला नेहमींपेक्षां जास्त प्रदाक्षिणा घातल्या—घंटा जरा जास्त बडवली. आणि कांहीं न सुचून मग तो देवळापुढल्या पायरीवरच बराच वेळ मुकाट बसून होता. पुढं आपलं काय होणार हा त्याला प्रश्न होता आणि त्याचं उत्तर त्याला कांहीं केल्या सुचत नव्हतं. डोळे उगीच सारखे भरत होते. अंधारांत त्यानं स्वतःच्या दोन मुस्कटांत देखील मारून घेतल्या. त्या दिवशीं आपला गाढवपणा झाला हें आतां त्याला पटण्याचं मुळींच शिल्लक नव्हतं. त्याचा ज्यांत अर्थाअर्थी संबंध नव्हता त्यांत तो मरायला कशाला जाऊन लुडबुडला होता? त्याचं फळ मिळणं त्याच्या दृष्टीनं अगदीं नैसर्गिकच होतं. हे कर्मभोग होते. ते टाळता टळणार नव्हते असं म्हटल्यावर त्याला ते सुसह्य वाटले. त्यानं बाजारांत जाऊन स्टोव्ह दुरुस्त करण्याचीं हत्यारं आणलीं आणि दुसऱ्या दिवसापासून घरोघर फेरी करून स्टोव्ह दुरुस्त करण्याचं ठरवून टाकलं. यांत तावेदारी नव्हती; संपाची भानगड असणार नव्हती आणि उत्पन्न तसं वाईट नव्हतं. सुटली तर सुटली नोकरी! नोकरीला त्यानं तुच्छतेनं एक हलकी शिवीदेखील दिली. त्याचा आत्मविश्वास वाढला. आपल्याला अवगत असलेल्या स्टोव्ह रिपेरीचा असा उपयोग होत असल्याचा त्याला अपूर्व आनंद होत होता. गणपतीला मनोमन वंदन करून त्यानं पहिला—शेजारचा स्टोव्ह रिपेअर केला. त्या पैशांनीं पेढे आणले आणि मित्रांना घरोघर जाऊन वाटले. आपण धंदा सुरू करत असल्याचं जाहीर केलं. त्याबरोबर, तावेदारी पुरे झाली वगैरे. मित्रांनीं पेढे चघळीत तो योग्य करीत असल्याचं सांगितलं तेव्हां त्याला केवढं धन्य वाटलं! आणि सगळे पेढे संपवून तो घरीं पोचला. आई-बायकोची चडफड त्यानें मख्खपणें कानाबाहेर टाकली. अखेर त्या अशिक्षित होत्या. त्यांना काय कळत होतं? दोन घांस खाऊन तो बिछान्यावर लोळला तेव्हां एका आत्मसुखांत तो तरंगत होता. त्याला पहातां पहातां झोंप लागली. स्वातंत्र्याचा आनंद मुळीं कांहीं वेगळाच होता.

दुसऱ्या दिवसापासून तो स्टोव्ह दुरुस्तीचा व्यवसाय उत्साहानें करूं लागला. गांवाच्या ठराविक वस्तींत ठराविक दिवशीं त्याचा फेरा त्यानं ठरवून टाकला. "करायचा का स्टोव्ह रिपेर स्टोव्ह" असं तो सडकेनं जातांना गालफडावर पंजा धरून उंच सुरांत ओरडायचा. प्रथम त्याला संकोच वाटला; पण मग मुळींच वाटेनासा झाला. उलट बरं वाटूं लागलं. तिकडे सस्पेन्शनच्या ऑर्डरा सर्व्ह केलेल्यांची इन्क्वायरी होणार असं बोललं जात होतं. शेडमध्येंच काम करणाऱ्या त्याच्या हितचिंतक गांववाल्यानं एकदां त्याला हें मुद्दाम भेटून सांगितलं. तो म्हणाला, माफी मागतील त्यांना लोअर ग्रेडवर पुन्हा देखील घेण्याची शक्यता आहे. तूं आतांपासून खटपट कर. जरा वशिले लाव. कमिटीवर अमूक तमूक साहेब आहे असं ऐकतों; त्याला घरीं गांठ आणि पाय धर त्याचे. थोडा रड. बायकोपोरं आहेत, उपाशी मरताहेत म्हण कीं काम फत्ते. किती तरी जण असं करणार आहेत. मग तूंच कां सोडतोस? कायम नोकरी काय रस्त्यावर पडली आहे? जातांना कपडे थोडे फाटके नि दाढी जरा वाढलेली ठेवायला मात्र विसरूं नकोस. आणि तेवढं रडायचं."

प्रथम थोडा राग आला, पण मग त्याला यांत अर्थ वाटला. सगळेच करणार तर आपण कां नाहीं करायचं? कायम नोकरीहि पुन्हा आयती मिळत असली तर उगीच नसत्या अभिमानापायीं सोडणं या दिवसांत वाईट. अनेकांना ती मुळांत मिळतच नाहीं; आपल्याला मिळाली. शिवाय आईबायकोची किटकिट ऊठबैस चाललीच आहे. बायकोचं बाळंतपण जवळ आलं आहे. बरं, माफी मागायला लाज कसली? चूक ही झालीच. घोडचूक झाली. भलत्या मार्गात शिरलों. भलभलतं केलं—अगदीं राजरोस. मग चुकलों म्हणण्यांत शरम कसली? दहादां म्हणूं. तेवढ्यानंच जर होणार असेल तर होऊं दे. त्यानं स्टोव्हच्या फेरीला एक दिवशीं रजा दिली आणि त्या कमिटीवरल्या साहेबाच्या घरीं तो सरळ गेला. दाढी थोडी वाढलीच होती. कपडे फारसे बरे नव्हतेच. बंगल्याच्या दाराशीं त्यानें हातांतली जळती चार मिनार टाकली आणि चेहरा दीनवाणा केला. साहेबाचे पाय त्यानें धरले. 'तुम्हीच आमचे अन्नदाते मायबाप' हें तोंडून सहजपणें निघून गेलं. साहेबानें त्याला जरा रागानंच उभं केलं, संपांत भाग घेतल्याबद्दल फायर केलं, तुला नोकरीवरून कां काढूं नये—तुझ्यासारख्यांना गोळ्या घातल्या पाहिजेत असं बरंच तो तावातावानें बोलला. हात जोडून त्यानं तें सारं लीनतेनं, हीनदीन चेहरा करून निमूट ऐकून घेतलं. साहेब बोलायचा थांबला तेव्हा त्यानं आपली चुकी सपशेल कबूल केली, हवं तर जोड्यानं मारा असं सांगून टाकलं, तोंडांत मारून घेतल्या, पुन्हा असं घडणार नाहीं असं तळमळून सांगितलं, राजकारण, कामगार युनियन यांच्याशीं आपला कांहीं संबंध नाहीं अशी ग्वाही दिली, आणि तुम्हीच जगवा किंवा मारा असं म्हणून तो पुन्हा साहेबाच्या पायांवर पडला. तेवढ्यांत कोणी

रात्रंदिन आम्हां युद्धाचा प्रसंग...!



हेरगिरी (SPYING)

मंडळी आल्यानं साहेबानं त्याला पाय घाईघाईनं मागं घेऊन तांतडीनं रजा दिली. "पहातों" एवढंच तो म्हणाला; पण त्याला तो एकच शब्द आशीर्वादासारखा किंवा अगदीं वरासारखा वाटला. त्याला पुन्हा खूप हल्कं वाटलं. आतां सारं साहेबाकडे सुपूर्द होतं. झगझग उरली नव्हती. साहेब बरा होता. नाटक बरं जमलं होतं, आशेला भरपूर जागा होती. साहेबाच्या बंगल्यांतून तो चोरटी शीळ घालीतच बाहेर पडला.

• परत येऊन तो जास्तच उत्साहानें स्टोव्ह दुरुस्तीच्या फेऱ्या करूं लागला. उधार उसनवाऱ्या करतांना 'पुन्हा सर्व्हिसवर जॉइन झालों कीं' असे वायदे वेधडक देऊं लागला. गणपतीची उपासना अधले-मधले खंड सोडले तर अजून चालूच होती; त्यांत साहेबाकडंहि वाजू वळकट करून ठेवली होती. गांववाल्यानें बातमी आणली, बऱ्याच जणांना रिव्हर्ट करून कामावर घेणार. तसे घेतच आहेत. त्यानें त्याची उमेद आणखीच वाढली. गणपतीपुढच्या प्रदक्षिणा त्यानें वाढवल्या. गणपतिस्तोत्र बायकोलाहि चालू करायला लावलं. विघ्न दूर होणं आतां अगदीं कांहीं दिवसांवर राहिलं होतं.

आणि एके दिवशीं त्याचा एक दोस्त त्याला भेटायला आला. त्यानें त्याला हॉटेलांत चहाला नेलं. दोस्ताचा चेहरा चिंताक्रांत दिसत होता. हॉटेलांत तो म्हणाला, "आपल्याला तसे फ्रेंड पुष्कळ आहेत पण खरा तूं एकटाच; म्हणून मुद्दाम तुझ्याकडे आलों. तूं आपल्याला हेल्प केली पाहिजेस. नाहींतर मामला फार वाईट आहे." भारावून त्यानं दोस्ताला तात्काळ वचन देऊनहि टाकलं कीं हेल्प दिली. मागशील ती हेल्प करीन. पुढं बोल. काय झालंय? दोस्तानं मग एक प्रकरणच ऐकवलं. त्याचं एका मुलीवर फार म्हणजे भलतंच प्रेम होतं. तिच्या-शिवाय त्याला जगणं अशक्य होतं. दोघांचे बहुतेक आदल्या जन्मीचे संबंध होते इतकीं दोघं एकमेकांसाठीं मरत होतीं. पण मुलीच्या मोठ्या भावाला हें मान्य नव्हतं. मुलीला वडील नव्हते आणि आई पण आजारी असे. त्यामुळें मोठ्या भावाची दादागिरी हवी तेवढी चालत होती. प्रथम दोघांच्या चोरट्या भेटी तरी होऊं शकत; पण त्याहि त्या दुष्ट भावानें बंद करून टाकल्या. बहिणीला घरांत बंदिवान करून टाकली. तिची शाळा तोडली. आणि आतां तो तिचं आणखी कुणाशीं लग्न करून देणार होता. तिला तो उपाशी ठेवतो आणि मरेमरेस्तोंवर मारतो असंहि तिच्या त्या प्रियकरानं यातनांनीं भरलेल्या घोगऱ्या सुरांत ऐकवलं. तो म्हणाला, तिच्या किंकाळ्या माझ्या एका फ्रेंडनं ऐकल्या. पण तिचा निश्चय कायम आहे. ती लग्न करील तर माझ्याशींच करील नाहींतर मरून जाईल. तसं लेटर तिनं मला मोठ्या हिकमतीनं पाठवलं आहे. आतां तूंच सांग, आपलं प्यार माणूस असं आपल्यासाठीं त्रास सहन करीत असतां मला कसं स्वस्थ वाटेल? कसं अन्न जाईल, कशी झोंप लागेल? ती त्या दुष्टाच्या कैदेंतून मुक्त होऊन माझ्याकडे येईपर्यंत मला मुळींच चैन पडणार नाहीं. तसं झालं नाहीं तर मी मरेन. मी सुइसाइड करीन. आणि त्यानं कांहीं गोळ्या त्याला खिशांतून काढून दाखवल्या. या घेतल्या म्हणजे पांच मिण्टांत डेथ येतो असं हलक्या सुरांत बजावलं. आपल्या यातनांचं, त्याहूनहि त्या अश्राप मुलीवरच्या अन्यायाचं, जुलूम जबरदस्तीचं, तिच्या पिळवणुकीचं एवढं परिणामकारक चित्र मित्रानं रंगवलं कीं तें ऐकून तो हलून, गुदमरून गेला. त्याचं माथंच गरम झालं. काय म्हणून त्या मुलीचा हा छळ? मित्राच्या आणि तिच्या उदात्त प्रेमांत विघ्न घालण्याचं त्या हरामखोर भावाला काय कारण? तिला पसंत नसलेल्या कुणाशीं तिचं सक्तीनं लग्न लावण्याचा त्याला काय अधिकार? समजावयाचं, धमक्या द्यायच्या, एखादी थोबाडींत वाजवली, पुरेशी होती. पण तरी तिचा निश्चय राहिला म्हटल्यावर किंकाळ्या मारीपर्यंत मुलीच्या जातीला मारहाण काय म्हणून? उपासमार काय म्हणून? हा भाऊ कीं कसाब? त्याचं रक्त उसळूं लागलं. मित्रानें त्याला, मुलीची मुक्तता करण्याचा प्लॅन ऐकवला. त्यानें त्यांत लागेल ती हेल्प करण्याचं तात्काळ कबूल केलं. ठरवाठरवी झाली. आणि त्या रात्रीं सिनेमाला जाण्याची थाप आईला आणि बायकोला मारून तो घरांतून बाहेर पडला. ठरल्याप्रमाणें दोघांनीं सर्व कांहीं केलं. पण आयत्या वेळीं जरासा घोटाळा झाला. मुलीच्या खोलींत तिला बोलावण्यासाठीं तो शिरला आणि तिनें ओरडा केला. माणसं धांवलीं. दिवे लागले. त्याला धरण्यांत आलं. मित्र खालच्या खालीं पळाला. मुलीच्या भावानें त्याला बेदम पिटलं. पोलिस कम्प्लेण्ट दिली. सकाळीं अकरा वाजेपर्यंत तो पोलीस चौकीवर होता. मारानं अंग आंबलं होतं. कपडे फाटले होते. डोकं विलक्षण जडशीळ झालं होतं. डोळे जागरणानं तांबारले होते. इन्स्पेक्टरनं त्याला विचारलं, "मुलीचा नि तुमचा कांहीं संबंध होता काय?"

तेव्हां बऱ्याच वेळानं प्रथमच जाग आल्यासारखा तो खडबडून म्हणाला, "नाहीं, साहेब. कांहींएक संबंध नव्हता—गणपतीशपथ नव्हता! ती काळी का गोरी तें पण मी प्रथम काल रात्रीं पाहिलं. आपल्याला पोरीबाळींत कांहीं इंटरेस्ट नाहीं, साहेब—लग्न झालंय आपलं. वांकड्या डोळ्यानं कुठं पाहिल्याचं कळलं तर आई अजून डाग देईल, शप्पथ! आपण बरं कीं आपलं काम बरं असा आपला बाणा, साहेब. कुणाच्या अध्यांत नसतों का मध्यांत नसतों; खोटं कशाला सांगूं? पण काय भूल पडली कुणास ठाऊक, करून बसलों नसता गाढवपणा. म्हणजे चकवाच घडला बघा. झपाटल्यासारखं झालं सगळं. मी माझा राहिलोंच नाहीं. आणि आतां ही गेट पहाण्याची भलती पाळी आली. गाढव आहें साहेब मी! दहा गाढव आहें!" तो स्वतःच्याच तोंडांत फडाफडा भडकवून घेऊं लागला. आणि एकीकडे, केवळ रडलं तर भागेल का पाय पकडावेत त्याचा विचारहि करूं लागला.

कोणे एके काळीं सुवर्णपूर नामक नगरीमध्यें धनपाल नामक एक वैश्यपुत्र राहात होता. सरस्वतीचा आणि त्याचा जरी मुळींच परिचय नव्हता तरी लक्ष्मी मात्र त्याच्या सदनांत पाणी भरीत होती. एवढेंच नव्हे तर इंद्रलोकींच्या अप्सरांगत यौवनानें रसरसलेल्या अशा सहा सौंदर्यखनी कामिनींचें त्याचें अतःपूर मोठें नामांकित होतें.

परंतु असा हा श्रीमंत जसा नसावा तसा होता.

धनपालाची श्रीमंती आणि त्याचा कद्रूपणा यांत मोठी चुरस होती. जवळ इतकें धन असूनहि क्षुल्लकसा जरी खर्च करण्याचा प्रसंग उद्भवला तरी धनपालाच्या मार्जाराक्षांत अश्रुमौक्तिकांचा नुसता मळा पिके, धन अगदीं पुरवून पुरवून आणि केवळ आवश्यक तेवढेंच खर्च करण्याकडे त्याचा कल होता.

जी गत धनाची तीच त्याच्या अंतःपुरांतील सहा स्वर्गतुल्य अप्सरांचीहि! स्वतःला अगदीं राहवलेंच नाहीं तरच त्यांच्यावर अनुग्रह करून तो त्यांच्या रूपायौवनाचा आस्वाद घेई. हा आस्वादसुद्धां मोठ्या काटेकोरपणें नि तोलूनमापूनच घेतला जाई.

आपलें कनक आणि आपल्या कांता यांचा त्या वैश्यपुत्र धनपालला मोठा अभिमान होता. त्यांना तो आपल्या प्राणांपलीकडे जपत असे. हाडाचा सांठेबाजच असल्यामुळें या गोष्टी वापरण्यापेक्षां जतन करून ठेवण्याकडेच त्याचें अधिक लक्ष असे.

एकूण धनपाल हा मोठा सुखी प्राणी होता.

परंतु फक्त धनपालच सुखी होता. कारण वरकरणी देखावा कांहींहि असला तरी धनपालाकडून अगदीं अक्षरशः 'शिधा' पद्धतीनुसार मिळणाऱ्या परिमित, अल्प सुखामुळें त्याच्या या सहा सौभाग्यवती अंतर्यामीं असंतुष्टच होत्या. कोषागारांतील कनक आणि अंतःपुरांतील अंगना यांच्याकडे पाहाण्याची समदृष्टि त्यांना बऱ्याच वेळां खटकत, खुपत असे.

हें असेंच पुढेंहि अनंतकाळ चालू राहिलें असतें. परंतु दरम्यानच्या काळांत सौराष्ट्राहून आलेल्या चिंताजनक वर्तमानामुळें बिचारा वैश्यपुत्र धनपाल कमालीचा अस्वस्थ नि गलितगात्र होऊन गेला. त्याचा तेथला व्यापार मोठा भरभराटीचा चालला होता. परंतु तोच आतां उत्तुंग नगाधिराजावरून ढळलेल्या शिलाखंडाप्रमाणें झपाट्यानें घसरणीस लागला होता. तो थांवरण्यास धनपालाचे तेथले अडते असमर्थ ठरले होते. त्यांचा कांहींहि उपयोग न होतां त्यांच्यासाठीं खर्चिलेलें धनपालाचें धन लघुछिद्र घटांतील उदकाप्रमाणें व्यर्थ चाललें होतें.

या एकूण परिस्थितीमुळें तो वैश्यपुत्र अगदीं संत्रस्त होऊन गेला होता. अखेर आपणच तेथें गेल्याविना तरणोपाय नाहीं हें त्यानें ओळखिलें. म्हटलेंच आहे, 'मरणावगुंठनात् स्वर्गदर्शनम्!' म्हणजेच स्वतः मेल्याखेरीज स्वर्गलाभ नाहीं. तेव्हां त्या धनकद्रू धनपालानेंहि प्रवासखर्चाच्या प्रचण्ड मरणयातना सहन करून सौराष्ट्रास जाण्याची तयारी केली.

प्रवासास निघण्यापूर्वीची रात्र त्यानें आणखी एकवार [illegible]रौप्यमुद्रिकामापनांत नि षड्कामिनीचिंतनांत घालविली. मग सुवर्णपुरांतील आपल्या साऱ्या संपत्तीची देखभाल करण्याची जबाबदारी आपला भागीदार व मित्र विश्वासगुप्त याजवर आणि सहा सहधर्मिणींची जबाबदारी देवकी नामक चौसष्ट वर्षांच्या वृद्ध, जुन्या अंतःपुररक्षिकेवर सोंपवून निश्चिंत होत्साता तो मन दृढ करून सौराष्ट्रदेशीं प्रयाण करता झाला.





अनुक्रमणिका

*धडधडत्या काळजानें तिनें आपल्या हाताची मूठ उघडली;*
*आणि तिला आश्चर्याचा धक्काच बसला.*
*तिच्या तळहातावर मोठ्या दिमाखानें खिकाळत होती ती.*



— डॉ. कु. दमयंती सरपटवार, एम्. ए., पीएच्. डी.

सुवर्णपूर ते सौराष्ट्र हा प्रवासमार्ग अत्यंत तापदायक व बहुविध अडचणींनीं भरलेला असल्यामुळें वैश्यपुत्रोत्तमाचा मागोवा घेण्याएवजीं त्याच्यामागें येथें त्याच्या षड्कामिनींनीं गजबजलेल्या अंतःपुरांत काय नवल वर्ततें याच्याच मागावर आपण राहाणें अधिक उचित.

धनपालाच्या प्रयाणानतर बरेच दिवस झाले. परंतु त्याची अनुपस्थिति त्याच्या अंतःपुरास विशेष जाणवली नाहीं. नाहींतरी त्याच्या अंतःपुरांतील त्या सहा देशच्या सहा सुंदरींना जें 'सुख' मिळत असे तें अगदीं मर्यादितच असे. म्हटलेंच आहे, भडकलेल्या वन्हीवर शीतलोदकाचा एक बिंदू टाकला काय अथवा मुळींच टाकला नाहीं काय, दोन्ही सारखेंच! तद्वत् त्या सहाजणींचा दिनक्रम पूर्ववत् चालू राहिला. खावें, प्यावें, हंसावें व शांत झोंपीं जावें. धन्याच्या आज्ञेनुसार तैलरंजित नेत्रांनीं देवकी त्यांच्यावर देखरेख करी. वयाची साठी ओलांडलेल्या त्या वृद्धेला आतां कुठल्याहि अधिकउण्याचा हव्यास नव्हता. आपलें कर्तव्य बजावीत नि या वयांतहि मन मोहविणाऱ्या आपल्या ऐन यौवनांतील मधुमधुर स्मृतींत रममाण होण्यांत ती कालव्यतीत करी.

एकूण धनपालाच्या अंतःपुराचा हा दिनक्रम आणखीहि अनेक दिवस अगदीं असाच शांतपणें चालू राहिला असता. पण...

ती प्रभात उजाडली!

आदल्या रात्रीं उष्मा करीत असल्यामुळें त्या चारुगात्रींना निद्रादेवी लौकर प्रसन्न झाली नव्हती. त्यांतच मध्यरात्रीपासून प्रासादांत कसली तरी गडबड चालल्याचे आवाज होत होते. त्यामुळें त्या सहाजणींचा सतत निद्राभङ्ग होत होता.

सकाळीं त्या अंमळ उशिरानेंच जाग्या झाल्या. उठल्याबरोबर सेवकांसाठीं त्यांनीं टाळ्या वाजविल्या. दालनांतील घंटेची दोरी जोरजोरानें ओढली. पण आश्चर्याची गोष्ट म्हणजे कुणीच आलें नाहीं. त्याचप्रमाणें या समयीं पाकशाळेंतून नेहमीं जो क्षुधा प्रदीप्त करणारा स्वादगंध येई तोहि आज येत नव्हता. सारें कसें अगदीं शांत शांत होतें!

धनपालाच्या स्त्रियांना हा सारा प्रकार जाणून घेण्याची फार इच्छा होती. परंतु आजवर त्या ज्या आज्ञाधारक वातावरणांत वाढल्या होत्या त्यानुसार स्वतः होऊन कांहींहि करणें शक्य नव्हतें. असें स्वतःच्या जबाबदारीवर कांहीं करणें हें उद्धटपणाचें होय असे संस्कार त्यांच्या मनांवर झाले होते. त्यामुळें देवकी स्वतः तिथें येईपर्यंत एकमेकींच्या मुखांकडे आलटून पालटून पाहाण्यापलीकडे त्यांनीं कांहींहि केलें नाहीं.

अखेर देवकी आली. तिलाहि एकूण प्रकार कांहींच उमजेना. तेव्हां त्या साऱ्याचा शोध करण्यासाठीं ती बाहेर प्रासादांत हिंडूं लागली.

बराच वेळ झाला तरी देवकीचा पत्ता नव्हता. चिंता आणि क्षुधा यांमुळें त्या अंतःपुरांतल्या अंगना अस्वथ होऊन गेल्या.

शेवटीं एकदांची देवकी अंतःपुरांत शिरली. या वृद्धपणांतहि एरवीं ताठ चालणाऱ्या तिचे पाय आतां मात्र लटपटतांना दिसत होते. तिनें जी वार्ता आणली होती ती कमालीची भयंकर होती.

धनपालाच्या प्रयाणानंतर आपल्या मनाशीं जोपासलेला बेत धूर्त विश्वासगुतानें त्या रात्रीं तडीस नेला होता. मोठ्या धोरणीपणानें आदल्या रात्रीं त्यानें धनपालाच्या सेवकांस दूर केलें होतें. त्यानंतर आपल्या हस्तकांकरवीं धनपालाच्या प्रासादांतील जडजवाहीर, सोनेंनाणें आदि बहुमोल गोष्टी तसेंच मद्य, खाद्यपदार्थ वगैरे लुबाडून विश्वासगुप्त कुठल्या कुठें गुप्त झाला होता.

तेव्हां आतां धनपालाच्या त्या भल्या मोठ्या प्रासादांत केवळ सहा रसरसलेल्या रमणी आणि एक वाळलेली वृद्धा एवढाच परिवार उरला होता. आपल्यावर कोसळलेल्या त्या संकटानें त्या अगदीं हतबल होऊन गेल्या होत्या. क्षुधेनें व्याकूळ झाल्या होत्या. आधार कुणाचाच नव्हता. स्वामी दूर देशांतरास गेलेला. त्याला निरोप पाठवायचा म्हणजे अपरिमित धन खर्चावयास हवें. शिवाय एवढें करुनहि तो निरोप त्यास दोन मासानंतर केव्हां तरी मिळावयाचा.

अशा या चमत्कारिक, असाहाय्य आणि शोचनीय परिस्थितींत त्या साऱ्याजणींनीं कसाबसा एक दिवस काढला. क्षुधा आणि चिंता यांनीं त्या अगदीं संत्रस्त होऊन गेल्या होत्या.

अखेर या प्राप्त परिस्थितींत नुसतें गप्प बसून चालावयाचें नाहीं हें जाणून त्या सहाहि जणी एकत्र जमल्या आणि या संकटांतून कांहीं मार्ग निघतो का, हें पाहाण्यासाठीं विचारविनिमय करूं लागल्या.

त्या सहाजणींत लवंगलतिका ही वयानें सर्वांत लहान व धनपालाच्या अंतःपुरांतील अगदीं अलीकडची भरती होती. सम्राट सौरसेनाच्या आवडत्या नाटकशाळेची ती एकुलती एक कन्यका होती. तिच्या आईच्या हट्टामुळें सौरसेनानें लवंगलतिकेच्या विवाहाचा बेत जाहीर केला. आणि भावि लाभाच्या प्रलोभनानें धनपालानें दशमासांपूर्वींच तिच्याशीं विवाह करुन तिची आपल्या षष्ठपत्नीपदावर स्थापना केली होती. परंतु आपल्या मूलभूत स्वभावानुसार धनपालानें अद्यापि स्वतःस पुनीत केलें नव्हतें. पट्टीचा आस्वादक ज्याप्रमाणें एखादें आम्रफल त्यास मुळींच हात न लावतां तें उत्तम प्रकारें पक्व होईपर्यंत तसेंच जपून ठेवून देतो तद्वत् धनपालहि लवंगलतिकेस न हाताळतां तिच्या यौवनाची कलिका पूर्ण विकसित होण्याची वाट पाहात होता. असो.

यापुढें जो कांहीं संवाद आपणास ऐकावयास मिळणार आहे त्यांत तिच्या तोंडच्या उद्गारांनीं









आपणांस धक्का बसूं नये यास्तव तिजविषयींच्या या व अशाच कांहीं गोष्टी माहीत असणें योग्य. बालपणापासूनच ती एका वेगळ्या वातावरणांत वाढलेली असल्यामुळें विशेष अक्कलहुषारी न वापरतांहि सुंदर स्त्रीला कोणत्या मार्गांनीं स्वतःचें हित साधून घेतां येतें याविषयीं थोडें ऐकीव, थोडें देखील ज्ञान तिला प्राप्त झालेलें होतें.

तर अशा त्या भोळ्याभाबड्या लवंगलतिकेनें सद्हेतूनेंच, सार्‍यांचें भलें व्हावें म्हणून त्या बैठकींत जो खळबळजनक प्रस्ताव केला तो ऐकून तिच्या पांचहि सवती सौदामिनीचा धक्का बसल्यागत क्षणभर सुन्नच झाल्या... आणि मग लगेच लज्जेनें अर्धमृत झाल्या.

"आपल्यापैकीं कुणीतरी एकीनं उत्तम प्रकारें धनवान् प्रियकर... यजमान गांठावयास हवा... आपले प्रिय पति प्रवासाहून परतेपर्यंत !"

अशा त्या प्रस्तावानें दिलेल्या सुरुवातीच्या धक्क्यांतून त्या पांच प्रमदा जेव्हां शुद्धीवर आल्या... त्यांच्या गेलेल्या वाचेनें पुनरागमन केलें, तेव्हां बिचार्‍या लवंगलतिकेची स्थिति मोठी शोचनीय झाली. सार्‍याजणींनीं एकच गिल्ला करून तिच्यावर तोंड सोडलें. त्यांच्या एकूण थयथयाटाचा इत्यर्थ असा—

"अशा प्रकारचा विचार तुला सुचलाच कसा मुळीं ? आणि तो सुचला तरी आमच्या-पुढं बोलून दाखवून आमचा अधिक्षेप करण्याचं धाडस तरी झालं कसं तुझ्याकडून ?"

त्यावर सोसाट्याच्या वादळांत सांपडलेल्या लतिकेप्रमाणें थरथर कांपणारी ती लवंगलतिका हुंदके देत देत आपल्या सूचनेचें समर्थन करूं लागली.

"तुम्हीं म्हणतां तें सारं ठीक आहे. पण भगिनींनो, असं पाहा. आपले प्रिय पती प्रवासाहून परतले आहेत. आपल्याखेरीज त्यांची सारी मालमत्ता गेलेली आहे. आणि उरलेली मत्ता म्हणजे आपण सार्‍याजणी... त्याहि जर उपासमारीनं मृत्युमुखीं पडलेल्या त्यांना दिसून आल्या तर त्यांच्या मृदु हृदयाला किती यातना होतील याची नुसती कल्पना तरी करवेल का तुम्हांला ?"

होय ! हा मुद्दा आणि त्यापाठीमागचें तर्कशास्त्र अगदीं निखालस बिनतोड होतें खरें ! दुर्दैवी धनपालाचें हित हा त्यांना आतां मोठ्या जिव्हाळ्याचा प्रश्न वाटूं लागला.

"होय ग बाई !" त्या पांचहिजणी एका सुरांत म्हणाल्या. "ती कल्पनाच मुळीं सहन होत नाहीं ! बिच्चारी इकडची स्वारी !"



अनुक्रमणिका

तेव्हां एकूण स्वार्थनिरपेक्ष आणि आदर्श प्रकारें त्या कल्पनेनें मूळ धरलें. जों जों त्या सहा-सात्त्विक नि पतिनिष्ठ स्त्रिया तिचा अधिकाधिक विचार करूं लागल्या तों तों तिची उपयुक्तता त्यांना पटूं लागली. अखेर त्यांनीं ती वृद्ध देवकीपुढें ठेवली. वृद्धेनें प्रथम एकच आकांत केला. पण एकूण उपासमारीनें हळूहळू मरावें असें कुणास वरें वाटेल? पण कांहीं झालें तरी ती त्या पोरींत वयोवृद्ध होती. धनपालानें मोठ्या विश्वासानें तिच्यावर त्यांची जबाबदारी सोंपविली होती. तेव्हां अशा तऱ्हेच्या प्रस्तावाला ती एकदम कशी वरें संमती देईल? थोडेंफार चंद्रबळ आणून झाल्यावर त्या देवकीनें वरकरणी मोठ्या नाखुषीनेंच व मोठ्या मिनतवारीनें एकदांची संमती दिली.

तर, एकूण वेतांत जो मोठ्यांतला मोठा अडथळा यावयाचा तो हा अशा प्रकारें समाधानकारक रीत्या दूर झाल्यावर एकच प्रश्न अखेर सोडवायचा राहिला. तो म्हणजे...

कोणी?

हा नवीन तात्पुरता यजमान गांठावयाचा स्वार्थत्याग करावयाचा कोणी?

त्या सहाहि प्रमदा महान् पतिव्रता, सती सावित्री होत्या. सहाहिजणींचें आपल्या पतीवर अतोनात प्रेम होतें. कुणीहि कुणाला त्या बाबतींत हार गेली नसती. आणि म्हणूनच आपल्या त्या प्राणप्रिय, परमपूज्य पतिदेवासाठीं स्वार्थत्याग करण्याची संधी आपणासच मिळावी यासाठीं प्रत्येकजण अहमहमिकेनें पुढें सरसावली. प्रत्येकीच्या चेहऱ्यावर कर्तव्याचें कांहीं एक आगळेंच तेज त्या स्वार्थत्यागाच्या कल्पनेनें झळकूं लागलें. स्वतःच्या शीलनाशाचें कडू जहर आपणच प्राशन करणार म्हणून त्या साऱ्याजणींनीं एकच हलकल्लोळ माजविला. आपल्या परममंगल पतिदेवासाठीं हा स्वार्थत्याग करून इतर पांच सवतींचें शील सुरक्षित ठेवण्याची महान् जबाबदारी जी ती आपल्यावरच ओढवून घेऊं लागली. खरेंच आहे तें! साधुसंतांनींच नाहीं का म्हटलें आहे? जो दुसऱ्याच्या आपदा जाणतो व हंसतमुखानें त्या स्वतःवर ओढवून घेऊन दुसऱ्यास सुखी करतो तो खरा महान्. आणि वैश्यपुत्र धनपालाच्या त्या सहा पतिव्रता महानच होत्या. शीलनाशाची प्रखर आपत्ती दुसरीवर येऊं नये, तीस आपणच तोंड द्यावें असें हंसतमुखानें म्हणणाऱ्या त्या प्रमदांच्या कठोर कर्तव्यनिष्ठेस व कळकळीस कुठें तोड सांपडेल काय?

देवकी मात्र हा सारा हलकल्लोळ माजला असतांना अगदीं शांत बसून असल्या तरी खोल विचारांत गढून गेली होती. नाहीं म्हटलें तरी साऱ्या गोष्टींची जबाबदारी तिच्यावरच होती. मात्र कर्तव्य भावनेनें अक्षरशः अंध होऊन जेव्हां त्या सहा सुंदरींची मजल शाब्दिक संघर्षावरून शारीरिक संघर्षावर येऊन ठेपली तशी देवकीनें आपला सुरकुतलेला हात नेहमींच्या अधिकारदर्शक पद्धतीनें वर उचलला आणि क्षणांत तेथें सूचिपतन शांतता प्रस्थापित केली.

"गप्प राहा ग पोरींनो!" देवकी म्हणाली. "काय हें? कुलशीलवन्ताच्या स्त्रिया ना तुम्ही?"

"पण तूंच तर मघाशीं कबूल झालीस!" सहाजणींपैकीं एकजण घाबरत घाबरत म्हणाली.

"तें नाहीं म्हणत मी!" देवकी तिचा गैरसमज दूर करीत उत्तरली. "पण ही दांडगाई काय चालवली आहे तुम्हीं?"

साऱ्याजणी एकदम शरमून गप्प बसल्या.

"अशी दांडगाई नाहीं उपयोगाची या असल्या कामांत. अशी आपसांतली स्पर्धा वाईट. सारं कसं अगदीं शिस्तींत व्हायला हवं." देवकी नीट समजावून सांगूं लागली. "या स्वार्थत्यागाचा मान मिळवायचा म्हणजे कांहीं थट्टा नाहीं. मी मी करून नि आपलंच घोडं पुढं दामटून नाहीं भागायचं. तें दैवावरच सोंपवलं पाहिजे."

"म्हणजे?" लवंगलतिकेनें आपल्या व इतर पांच जणींच्या मनांतल्या आश्चर्याला अभिव्यक्ति दिली.

"सांगतें," देवकी शांतपणें म्हणाली. "सध्यां प्रचारांत नसलेलीं अशीं सहा फार जुनीं नाणीं माझ्यापाशीं आहेत. तीं सहाहि सारख्याच आकाराचीं नि सारख्याच वजनाचीं आहेत. मात्र त्यांतल्या पांचांवर गजमुद्रा असून फक्त एकावरच अश्वमुद्रा कोरलेली आहे. समजलं?"

साऱ्याजणी कानांत जीव एकवटून ऐकत होत्या. पण अजूनहि त्यांच्या डोक्यांत देवकीच्या योजनेचा फारसा प्रकाश पडत नव्हता.

"तीं सारीं नाणीं—" देवकी पुढें बोलूं लागली, "मी एका मृत्तिकापात्रांत घालून ठेवतें. तुमच्यापैकीं एकेकीनं जवळ यायचं नि त्या पात्रांत आंधळेपणानं हात घालून एक नाणं उचलायचं, दुसऱ्या कुणालाहि न दाखवितां मुठींत घट्ट पकडून बाजूला जाऊन उभं राहायचं.





अनुक्रमणिका

जिच्या हातीं अश्वमुद्रेचं नाणं आलं असेल तीच आपल्या या सदनावर आलेलं संकट वारील. त्यानंतर प्रासादाच्या वेगवेगळ्या भागांत असलेल्या सहा स्वतंत्र महालांत प्रत्येकीनं यापुढं निवास करायचा. मी प्रत्येकीची स्वतंत्र भेट घेऊन तिच्या हातीं आलेलं नाणं पाहीन. अश्वमुद्रेचं नाणं कुणाला मिळालं तें माझ्याखेरीज कुणा-लाच समजणार नाहीं. तें नाणं ज्या दुर्दैवी मुलीच्या हातीं आलं असेल तिच्याकरितां योग्य धनवान् यजमानाची मी योग्य प्रकारें आणि गुप्तपणें व्यवस्था करीन. तुमचे महालहि मुद्दामच वेगवेगळे केले आहेत. म्हणजे एकुण अशा प्रकारें नियतीनें स्वीकारावयास लावलेलं लाजिरवाणं जिणं सहन करणाऱ्या त्या मुलीची माझ्याखेरीज दुसऱ्या कुणालाहि कल्पना येणार नाहीं."

झालें! ठरल्याप्रमाणें देवकीनें आणलेल्या मृत्तिकापात्रांतील त्या सहा नाण्यांपैकीं एकेक त्या सहा सुंदरींनीं उचललें; दुसऱ्या कोणासहि न दाखवितां मुठींत घट्ट पकडून ठेवलें. आणि मग देवकीनें ठरवून दिलेल्या वेगवेगळ्या महा-लांत त्यांनीं आपापला मुक्काम हलविला.

आपल्या महालांत प्रवेश करतांच विचाऱ्या लवंगलतिकेनें आपल्या धडधडत्या काळजावर मोकळा हात घट्ट दाबून धरून दुसऱ्या हाताची मूठ उघडली.



## अवरोह

••••••••••••

वृंदा लिमये

हळुहळु ओसरली
गूढ काळोखाची लाट
ठसे इथेंतिथें कांहीं
सुकणारा वेडा कांठ

कंप तरल श्वासांचा
लोपतांना जड तार
झडूं लागला हलके
डहाळीचा पुष्पभार

दंश करून उडाले
दूर क्षणांचें पांखरुं
स्पर्शांमधली चेतना
हळूं लागली पाझरुं

रंध्रारंध्रांतुन साऱ्या
शुद्ध हरपला मोह
मंदावला शून्यामधें
रक्तांतला अवरोह.

हाय रे दैवा!

तिच्या हातांतल्या त्या नाण्यावरची अश्व-मुद्रा मोठ्या विजयानें खिंकाळत होती.

अखेर त्यागाची ती पहिली रात्र उजाडली!

उत्तम प्रकारें सुगंधी द्रव्यांचें शरीरास लेपन करून लवंगलतिकेनें आपलें स्नान आटोपलें. नयनीं काजळ रेखिलें. देवकीनें दिलेल्या खास तांबुलाचें सेवन करून आपल्या नाजूक ओष्ठ-द्वयाची रक्तिमा अधिकच लोभसवाणी केली. कृष्णरात्रीच्या नभोमंडळांत लुकलुकणाऱ्या टपोऱ्या तारकांप्रमाणें इवलालीं चंपकपुष्पें तिच्या घनगडद कृष्ण केशसंभारांत मोठीं शोभून दिसत होतीं. स्तेनराज विश्वासगुप्ताच्या इयेनदृष्टींतून सुटलेल्या इतर कांहीं योग्य वस्तूंनीं लवंगलतिकेनें स्वतःस नटविलें होतें. मंचकावर पहुडलेल्या अशा त्या मदनिकेच्या विशाल नेत्रांत अपेक्षांचें मोठें गहिरें नर्तन चाललें होतें. लवकरच आपणास ज्या प्रसंगास ...खरें तर अतिप्रसंगास तोंड द्यावें लागणार आहे व त्यामुळें आपल्या स्त्रीत्वास जो कलंक लागणार आहे, जी अप्रतिष्ठा होणार आहे त्याविषयींची खंत अथवा लज्जा तिला अगदींच वाटत नव्हती असें नाहीं. पण त्या विचारांना ती आपल्या मनांत फारसा थारा देत नव्हती. उलट आपला आज येणारा नवागत प्रियकर हा तरुण असेल कीं नाहीं, तो चतुर असेल कीं नाहीं, अशा सुखद विचारांतच त्या कोमल, यौवनो-त्फुल्ल लवंगलतिका नामें रमणीचें मन अधिक गुंगलें होतें हें खरें.-परंतु त्याबद्दल कोण बरें तिला दोष देण्यास धजावेल? प्राप्त परिस्थिति कितीहि विपरीत आली तरी तीच गोड करून घेण्यांत मानवजातीचा मोठेपणा सामावलेला नाहीं काय?

अखेर मध्यरात्रीच्या सुमारास तिच्या महालाचें दार हळूच उघडलें गेलें आणि गडद जांभळ्या मखमलीच्या पायघोळ अंगरख्यानें आपलें जवळजवळ सर्वांग झांकून घेतलेल्या एका उंच्यापुऱ्या भव्य पुरुषासह देवकी आंत प्रवेश करती झाली. तिचे वृद्ध नेत्र आतां कांहीं वेगळयाच तेजानें लकाकत होते. सुरुवातीस जरी ती या योजनेच्या विरुद्ध असली तरी एकदां ती स्वीकारल्यावर तिनें सारीं कार्यसूत्रें मोठ्या कुशलतेनें हलविण्यास सुरुवात केली होती.

तो नवागत आणि लवंगलतिका यांजकडे पाहून मोठ्या सूचकपणें नेत्रपल्लवी करीत ती धूर्त वृद्धा महालांतून बाहेर पडली. मात्र जातांना महालाचें द्वार काळजीपूर्वक बंद करण्यास ती विसरली नाहीं.

लवंगलतिकेचें हृदय धडधडूं लागलें.

अखेर तो स्व[illegible]गाचा...आत्मसमर्पणाचा क्षण येऊन ठेपला.

ती अंगीं अंगीं मोहरून गेली असेल. संकोचानें नववधूहून नववधू बनली असेल. त्या नवागत प्रियकराच्या प्रणयचेष्टितांना तिनें एरवीं देऊं नये इतका प्रतिसाद दिला असेल. पण म्हणून त्या महान्, सत्त्वगुणी यौवनेस दोष देणें मात्र खासच अन्यायाचें ठरेल! अहो, आपलें दुःख आपणांपाशीं! आपल्या










दुःखानें दुसऱ्यास दुःखी कां करावें? त्या विचाऱ्या नवागतास लवंगलतिकेच्या एकूण स्वार्थत्यागाची कांहीं कल्पना होती काय? नाहीं. झालें तर मग! वृथा ती कल्पना देऊन, तसा संशयहि त्याच्या मनांत उत्पन्न करून त्या विचाऱ्यास दुःख द्यावें हें त्या कोमल-हृदयी लवंगलतिकेस योग्य वाटलें नाहीं.

प्रभात झाली. लवंगलतिकेस जाग आली. तिनें शेजारीं पाहिलें, तों कुणीच नव्हतें. ती निद्रानंदीं मग्न झाली असतांनाच तिचा प्रियकर निघून गेला होता. ती स्वतःशींच एकवार हंसली आणि आळसावलेल्या अवस्थेंत तशीच मंचकावर पडून गतरात्रींतील घटनांच्या स्मृतींशीं खेळत कितीतरी वेळ गुंगून राहिली असती.

इतक्यांत देवकीनें महालांत प्रवेश केला.

लवंगलतिका लगेच उठली. बाजूच्याच चंदनी चौरंगावर ठेवलेली सुवर्णमुद्रांची थैली उचलून ना देवकीच्या स्वाधीन केली.

थोड्याच वेळानें त्या प्रासादांत आवश्यक ते खाद्यपदार्थ आले. पाकशालेंतून चिरपरिचित क्षुधाप्रक्षोभक स्वादगंध दरवळूं लागला. भोजन-समयीं त्या सहाहिजणी एकत्र आल्या. साऱ्यांनीं अक्षरशः उपासाचें पारणें फेडलें. सर्व पदार्थांना अगदीं पूर्ण न्याय दिला.

विचाऱ्या लवंगलतिकेला मोठीच धास्ती वाटत होती. पण गतरात्रीसंबंधीं कुणीच विषय काढला नाहीं. साऱ्याजणी अवांतर विषयांवरच नेहमींप्रमाणें बोलत होत्या. सुरुवातीस धास्तावलेल्या अंतःकरणानें आपल्या सवतींमध्यें वावरणाऱ्या लवंगलतिकेच्या हृदयावरचें एक फार मोठें दडपण त्यांच्या त्या मोकळ्या वागण्यानें नाहींसें झालें. तिनें स्वतःशींच सुटकेचा एक निःश्वास टाकला. देवकी-विषयींच्या अपार कृतज्ञतेनें तिचें अंतःकरण भरून आलें. तिचें गुपित त्या वृद्धेनें स्वतःपाशींच ठेवलें होतें.

भोजनोत्तर त्या सहाहि सुंदरी आपापल्या महालांत गेल्या. उष्मा होत होता. त्या मंचकांवर पहुडल्या. आपल्याला केव्हां निद्रा प्रसन्न झाली तें त्यांना कळलें देखील नाहीं.

अशा प्रकारें कांहीं मास त्या प्रासादाचा दिनक्रम मोठ्या सुखानें चालला होता. प्रासादाला आतां चांगले दिवस आले होते. समाधान आणि तृप्ति यामुळें तो प्रासाद सदा प्रफुल्लित दिसत होता. संकटाची चाहूल लागली होती...नव्हे, तें प्रत्यक्षांत आलेंहि होतें. परंतु त्याचा प्रचण्ड वेग मोठ्या कौशल्यानें वेळींच रोखला गेला होता. त्याची नांवनिशाणीहि आतां साफ पुसली गेली होती. विश्वासगुतानें हिरावलेल्या अनेक तिजो, सामानसुमान यांच्यापैकीं बऱ्याच गोष्टी आतां त्या प्रासादांत नव्यानें खरेदी करून आणण्यांत आल्या होत्या.

या साऱ्याचें श्रेय आपल्याला आहे ही अभिमानाची जाणीव लवंगलतिकेच्या मनांत सदैव जागृत असे. मात्र ती गोष्ट कुणालाच समजण्यासारखी नव्हती...एकट्या देवकी-शिवाय! आणि ती तशी गुप्त राहण्यांतच लवंग-लतिकेला खरें समाधान होतें हें सांगणें नलगे!

* * *

आता वैश्यपुत्र धनपालाचें वर्तमान काय आहे तें आपण पाहूं या.

अपरिमित द्रव्यनाश आणि मार्गांत अनेक आपदा सोसून बऱ्याच दिवसांनीं तो एकदांचा सौराष्ट्रास पोहोंचला. तो अगदीं योग्य वेळींच तिथें जाऊन पोहोंचला होता. त्याच्या देहांतून अस्सल वैश्याचेंच रक्त खेळत असल्यामुळें कांहीं कालावधींतच त्यानें आपल्या तेथील व्यापाराचा कोसळता डोलारा नीट सांवरला. सारें कांहीं नीट मनासारखें घडून आल्यावर सुवर्णपुरास परतण्यास तो सज्ज झाला. मात्र प्रवासाचा मार्ग अत्यंत बिकट व तस्करांनीं



अनुक्रमणिका

## लेखकांच्या नाना 'कळा'...!
### ग्रामीण कथालेखक



भूगोलांतील गांवें हुडकुनी
व्याकरणाचीं पदें उलटुनी
पूर्वसूरींचें सव्याज लेखन
निर्व्याजपणें हळूच नकलुन
रेडिओवरि गांवकरी-फड
तालिमीवरी झुजती बोकड
खडा तमाशा—तोंड वासुनी
ग्राम्य लेखकु करितो टिप्पणी



भरलेला असल्यामुळें त्या काळीं असे प्रवास एकस्यादुकस्यानें करण्याचें धाडस सहसा कुणालाच होत नसे. त्यांत धनपाल तर श्रीमान् श्रेष्ठी! तेव्हां सोबतीस योग्य असा एखादा खास विश्वासार्ह प्रवासी तांडा तो पाहूं लागला. पण त्याचा तो हेतु कांहीं साध्य होईना. त्यामुळें आणखी बराच कालावधि त्यास सौराष्ट्रांतच रिकामपणांत घालवावा लागला. आपल्यामागें सुवर्णपुरांत आपल्या प्रासादांत काय घडलें याची त्या वैश्यपुत्रास मुळींच कल्पना नव्हती. आणि ती तशी असण्याचें मुळीं प्रयोजनच काय? विश्वासगुप्तासारखा आपला जीवश्चकंठश्च मित्र असा कांहीं विश्वासघात करील हें त्याला स्वप्नांतसुद्धां खरें वाटलें नसतें.

सौराष्ट्रांत घालवाव्या लागलेल्या त्या रिकाम्या वेळांत बरेच छंदीफंदी लोक त्याच्या भोंवतीं गोळा झाले. आणि आतां कालमहिमा कसा तो पाहा! कद्रू धनपालासहि त्यांच्यांत मिसळण्यांत गोडी वाटूं लागली. ते जें कांहीं करीत त्यांत जीवनाचा आनंद सांठविला आहे अशीहि हळूहळू त्याची धारणा होऊं लागली. पैसा नुसताच सांठविण्यापेक्षां तो खर्चण्यांतहि अतीव सुख असतें हें त्यास कळूं लागलें. त्याचप्रमाणें आपल्या अंतःपुरांतील सहा देशच्या सहा सुंदरी याहि सध्यां आपण ज्यांच्या सहवासांत काळ घालवितों त्या सौराष्ट्र रमणींहून कितीतरी पटींनीं सुरेख असल्याचाहि त्यास शोध लागला.

अशा प्रकारें आणखी कांहीं दिवस गेल्यावर अखेर त्यास प्रवासाकरितां हवी तशी सोबत मिळाली आणि मग मजल दरमजल करीत तो अखेर सुवर्णपुरास येऊन दाखल झाला.

धनपाल आतां चांगलाच बदलून गेला होता. नगरांत प्रवेश करतांत त्याला विश्वासगुप्ताच्या विश्वासघाताचें वृत्त समजलें; परंतु त्यामुळें फारसा हादरून न जातां उलट नव्या जोमानें तो प्रासादाकडे आला. गेलेलें वैभव पुनः परत मिळवूं! त्यांत काय आलें आहे मोठेंसें? अशी जिद्द आतां त्याच्या देहाच्या कणाकणांतून सळसळत होती.

प्रासादांतील त्या साऱ्या यौवना आणि वृद्धा आपल्या धन्याच्या या नव्या अवतारानें अगदीं थक्क होऊन गेल्या. अर्थातच त्याच्या गैरहजेरींत व या अशा परिस्थितींत प्रासादांतील व्यक्तींचा चरितार्थ कसा काय चालत होता हें धनपालास कुणीहि सांगितलें नाहीं वा त्यानेंहि त्यासंबंधीं कांहीं विचारलें नाहीं. आजवरची हयात 'द्रव्य द्रव्य' करण्यांत गेल्यामुळें इतर विषयांबाबत त्याच्या बुद्धीस मांद्य यावें हें स्वाभाविकच होतें. असो.

हळूहळू धनपालाची अधिकाधिक भरभराट होऊं लागली. वैभवाच्या जणुं शिखरावरच जाऊन बसला तो! सुखप्राप्तीच्या नव्या मार्गांचा शोध त्याला सौराष्ट्रांत लागला होता. आणि वैभव संपादन करतां करतां तो ते मार्ग अगदीं मनमुराद चोखाळत होता. त्यामुळें त्याच्या त्या सहा सौभाग्यवतींनाहि आतां तक्रार करण्याचें कांहींच कारण उरलें नव्हतें. त्या आतां अगदीं पूर्ण समाधानी होत्या. प्रणयाची शिधापद्धति आतां संपुष्टांत आली होती.

लवंगलतिकेसारखी निरागस, अनभिज्ञ तरुणी प्रणयाच्या बाबतींत इतकी समरसता व कुशलता दाखवूं शकते याचें मात्र त्याला कधीं कधीं आश्चर्य वाटे. पण तो तें दाखवीत नसे. कदाचित् त्यानें जें कांहीं नव्यानें अनुभविलें होतें त्या दृष्टीनें म्हणा अथवा इतर पांच सुंदरींच्या प्रणयकेलींशीं तुलना करतां त्यास लवंगलतिकेची प्रणयचातुरी स्वाभाविकच वाटे. आपल्या इतर पांच स्त्रियांच्याहि या 'विषयां'-तील गुणांचा आतां प्रथमच त्याला साक्षात्कार झाला होता.

एकूण सांगायचें तात्पर्य, धनपाल आणि त्याच्या त्या यौवन–सौंदर्यपूर्ण सहा सौभाग्यवती आतां पूर्ण तृप्तींत होत्या.

वृद्ध देवकीहि आपल्या परीनें पूर्ण तृप्ति अनुभवीत होती. जसजशी तिच्या वयांत अधिकाधिक वर्षांची भर पडत चालली तसतशी ती आपल्या मधुर स्मृतींच्या चिंतनांत गुरफटूं लागली...आणि त्यांतहि धनपाल सौराष्ट्रास गेला असतां घालविलेल्या त्या मधुमासांशींच तिच्या स्मृती अधिक निगडित होत्या हें मुद्दाम सांगावयास हवें.

कधींकधीं तिला स्मृतिभ्रंश झाल्यासारखें होई. मग मात्र तिचा जीव घाबराघुबरा होऊन जाई. ती घाईघाईनें आपल्या निवासिकेंत येई. त्या वेळीं वार्धक्यानें थकूं लागलेल्या तिच्या नेत्रांत कांहीं वेगळीच चमक दिसूं लागे.

ती मग आपली जुनी चंदनी पेटी उघडी...

त्यांत त्या मधुर स्मृती सांठविलेल्या होत्या—

—सहा सहस्र सुवर्णमुद्रिका आणि सध्यां प्रचारांत नसलेलीं तीं सहा प्राचीन नाणीं...

सारख्या आकाराचीं...सारख्या वजनाचीं. आणि प्रत्येकावर रेखीव अश्वमुद्रा असलेलीं!









*राणीला मग दिवस मास जातात, नउ मास पूर्ण होतात. हौस मौज होते.*
*डोहाळ जेवणं उठतात सगेसोयरे येतात, आनंदीआनंद होतो.*
*राणी प्रसूत होते, आणि......!*



—डॉ. सरोजिनी बाबर

आटपाट नगर होतं. तिथं एक राजा रहायचा. त्याच्या पोटीं मूलबाळ नव्हतं. म्हणतांना एक दिवस तो बैरागी झाला. सात वनं ओलांडलीं. अटींग्या वनांत गेला. वृक्षाच्या छायेखालीं बसला. तिथली जागा लोटली. केरवारा भरला. आणिक बघतोय तर तिथं त्याच्या हाताला कायसंसं लागलं. त्यानं पाहिलं. महादेवाची पिंड निघाली. हा चकित झाला. देव हाताशीं आला म्हणाला. त्यानं मग त्या पिंडीची पूजा आरंभली. देवादिकांचं सुंबरान मांडलं. धरतरी मातेला नमस्कार घातला. मेघराया पित्याला दंडवत घातला. चांदसूर्य्या भावांचं नांव घेतलं. बेलफूल वाहिलं. आणि मग ठिपका झारी वर बांधली. बारा तास न् चोवीस तास स्नान घडूं दे म्हणाला. अखंड पूजा व्हावी बोलला.

होतां होतां मग अशींच बारा वर्षं आलीं आणि गेलीं. अशा वेळीं इंद्रसभेला बसलेल्या शंकराला कोडं पडलं. सभेतून उठला. इंद्रलोक सोडून मानवलोकाला निघाला. पायांत खडाव घातले. अंगांत जडाव ल्याला. जटा सोडल्या. शंख घेतला. त्रिशूळ धरला. आणिक आपला निघाला. अरण्याच्या ठायीं उतरला. त्या पूजा करतेल्या राजाला भेटला. म्हणाला कीं, राजा-आतां पूजा बंद कर ही. राजानं हें ऐकलं. डोईवर हात ठेव म्हणाला. इमान भाग दे बोलला. शंकरानं कबूल केलं. शिरीं हात ठेवला. इमान भाग दिला. पाहिजे तें माग म्हणाला. राजानं पोटीं संतान मागितलं. शंकरानं बेलाचं फळ तोडलं. त्याचे दोन भंग केले. राजाच्या हातांत ठेवले. आणिक म्हणाला कीं, तुझ्या अस्तुरीला ह्यांतला उजवा भंग खा म्हणावं. पुत्रप्राप्ति होईल. डावा भंग खाल्ला तर कन्यारत्न होईल. राजा आनंद पावला. शंकराला दंडवत घालून आपल्या वाड्याला चालला.

घरीं आल्यावर राजानं आपल्या राणीला अशानं असं सांगितलं. तर ती म्हणाली कशी की, फळ खाऊन पोरं होतील काय ? रागाला आली. उठली. वाड्याबाहेर आली. आणिक



रागारागानं तिनं ते दोन्ही भंग तुळशी वृंदावनांत ठेवले. म्हणाली, 'आई तुळशी माई, यांतून मला सोडीव कशी.'

इकडे तोंवर राजा नगरांत आला म्हणून नगरच्या नारी वाड्यावर आल्या. माणसं आलीं. राजानं काय किमया आणली बघूं म्हणालीं. नगराच्या नारींनीं राणीला विचारलं. काय आणलं दाखवा म्हणाल्या. राणी म्हणाली, 'काय सांगूं बायांनू! फळ खाऊन काय मूल होत नाहीं. राजानं बेलफळाचे दोन भंग आणलेत.' तशी त्या बोलल्या, 'आम्हांला बघूं दे.' राणीनं मग तुळशी वृंदावन दाखवलें. ते तिथले भंग बघा जावा म्हणाली. नगरच्या नारी हारखल्या. अशानं असं आहे तर त्यांतलं एक खा म्हणाल्या. त्यांनीं तिला गळ घातली. राणीनं मग बळंबळंच डावा भंग खाल्ला.

तेथून मग राणीला दिवस मास गेले. नऊ-मास पूर्ण झाले. हौस मौज झाली. डोहाळ जेवणं उठलीं. सगेसोयरे आले. आनंदीआनंद झाला.

राणी प्रसूत झाली. कन्यारत्न जन्माला आलें. पांचवी पुजली. हत्तीवरुन साखर गेली. दारीं सनईचौघडा वाजला. अंगणांत सवाष्णींनीं पाणी घातलं. दारावर तोरणं चढलीं. शिंग वाजलं. राजाचा आनंद गगनांत मावेना. त्यानं प्रजेला अमाप बक्षिसं वाटलीं.

बारशाचा दिवस उजाडला. नगरचे कारागीर बाळलेणीं घडवून घेऊन आले. सवाष्णी आल्या. पालख पाळणा बांधला. राणीचा महाल रत्नामाणकांच्या, मोत्यापोवळ्यांच्या खेळण्यांनीं दिपून गेला. मुहूर्त वेळ आली. राजानं ब्राह्मण बोलावले. दरबार भरवला. मुलीचं नांव सांगा म्हणाला. ब्राह्मणमंडळी पंचांग घेऊन बसली. पोथी पुस्तकं वाचूं

(पान १५१ पहा)





अनुक्रमणिका

अनुक्रमणिका

**स्वयंवर** पान १४७ वरुन

लागली. पण मुलीचं नांव म्हणून कुठं उमगेनाच. आतां काय करावं? सर्वांना पेच पडला. त्यासरशीं इंद्रसभेच्या भोळ्या शंकराला कोडं पडलं. सभेचा उठला. ब्राह्मणाचं रूप घेऊन राजाच्या वाड्यावर आला. सोवळं नेसून बसला. जानवं घालून पंचांग घेतलं. इंद्रसभा सोडून मानवखंडांत विचार केला. मुहूर्तवेळ साधतो म्हटला. चार पानं उलटलीं. पण मुलीचं नांव उमगेना! शंकर गोरामोरा झाला. पांचवं पान उलटलं. नांव सांगतों म्हणाला. मुलीचं नांव पार्वती आहे बोलला. आणिक आला तसाच एकाएकीं अंतर्धान पावला.

इकडे तोंवर बारसं झालं. चंद्रसूर्य जडवलेल्या खेळण्याचा पाळणा हालला. मुलगी लहानाची मोठी होत चालली.

अशींच मग पांच वर्षं लोटलीं. पार्वतीनं राजाला खेळ मागितला. सोन्याचं जातं, रुप्याचा खुंटा दिला. मोत्यांनीं गुंफलेली सुपली दिली. हिऱ्यामाणकांनीं जडवलेली भावली दिली. पार्वतीनं हा खेळ घेतला. आपल्या परकराच्या ओच्यांत ठेवला. वाड्याच्या चौकांत आली. खेळत बसली. तिचा हा खेळ मग बारा वर्षांचं लेणं ल्याला. राजानं विचार केला. म्हणाला कीं, पार्वती उपवर झाली. तिचं लगीन करावं. मंदिर महालांत दरबारचे मानकरी आले. नऊखंड पृथ्वी पालथी घालून पार्वतीजोगा वर शोधून आणा म्हणाला. त्यानं आपला विचार जाहीर केला. पार्वतीनं तें ऐकलं. खेळता खेळ टाकून ती आली. राजाजवळ गेली. म्हणाली कीं, माझं लगीन असं नाहीं करायचं. मला नवरा असा पाहिजे कीं, जन्माचा जोडा होईल. जन्माचा चुडा ल्यायला देईल. कधीं नाहीं हलायचा, कधीं नाहीं डुलायचा असा बिनमरणाचा भ्रतार मला पाहिजे.

राजाला मोठं कोडं पडलं. म्हणाला कीं, दुनियावरनं दुनिया फिरली तरी हें कुठं झालंय का! राजा पार्वतीला रागावला. म्हणाला कीं, हा हेका तूं सोडून दे. पण तिनं आपला बेत सोडला नाहीं. राजाचा वाडा एकवेळ सोडून जाईन पण हें नाहीं ऐकणार म्हणाली. राजा मग जास्तच रागावला. त्यासरशीं पार्वती वाडा सोडून निघाली.

राणीला ही वार्ता कळली. ती धांवत आली. पार्वतीला तिनं पोटाशीं धरली. काय झालं म्हणाली. म्हणतांना पार्वतीनं तिला घडली गोष्ट सांगितली. करीन तर अशाच नवऱ्याबरोबर लगीन करीन म्हणाली. राणीनं मग पार्वतीला सोनारदादाकडे नेलं. जडावाचे दागिने घडवले. पार्वतीच्या अंगावर घातले. पुढं मग तिनं पार्वतीला उंची वस्त्रं दिलीं. घरीं आणलीं. महालांत नेली. पार्वतीनं साजशिणगार केला. आरशांत आपलं रूप बघितलं. पण म्हणाली कीं, आईग, ह्यांत खरा दागिना कुठाय? घरांत ठेवून अपशकुन करूं नको. राणीनं मग विचारलं, 'तुझं म्हणणं काय मग?' "पार्वती म्हणाली," पायांत बिरुदं जोडवीं, हातांत चुडा, गळ्यांत डोरलं, कपाळीं कुंकू हे दागिने मला दे. बिनमरणाचा मिळवून दे. आणिक असा नवरा नाहीं भेटला तर तुझी माझी एवढीच भेट."

बिचारी राणी हिरमुसून गेली. या उप्पर काय बोलणार? गप्पच राहिली. म्हणतांना मग पार्वतीनं तो महाल सोडला—गांवांत आली—हणमंताच्या राऊळांत बसली. बाळ ब्रह्मचारीला तिनं नमस्कार घातला. तशी हणमंतानं तिला विचारलं, "कां येणं केलंस पोरी आज?"

पार्वती म्हणाली कशी, "सांगीन देवा. पण इमान भाग दे."

हणमंतानं इमान भाग दिला. मग पार्वती अशानं असं आहे म्हणाली. सांगायला लागली कीं, "जन्माचा चुडा, जन्माचा जोडा, हालायचा नाहीं, डुलायचा नाहीं. बिनमरणाचा पतिं मला पाहिजे."

बाळ ब्रह्मचारीनं त्याउप्पर म्हटलं, "खुळी काय ग तूं पार्वती? नवखंड पृथ्वीवर असा वर तुला मिळणार नाहीं."

त्यावर पार्वती बोलली, "बिनमरणाचा भ्रतार मला दाखवावा देवा. नाहींतर सत्त्व गेलं म्हणीन मी." त्यासरशीं हणमंतानं बोलणं केलं, "सांगतों ऐक. तुळशीवृन्दावनाला अंजनी मातेनं ऋषीमुख पर्वतावर धरलं आहे. तिथं तूं जा. तुझी इच्छा पुरी होईल."

पार्वतीनं हे ऐकलं. ती चटकन् निघाली. ठरल्या स्थळीं पोचली. तिनं अंजनीमातेला दंडवत घातला. अंजनीमातेनं तिच्या येण्याचं कारण विचारलं, इमानभाग दिला. पार्वतीनं मनची गोष्ट सांगितली. पण अंजनीमाता बोलली कीं, असं कधीं कुठं घडलंय का? माझी मीच कोड्यांत पडलेय.

पार्वतीनं मग अंजनीमातेला विचारलं: कसलं कोडं पडलय सांग म्हणाली. म्हणतांना मग अंजनी मातेनं बोलणं केलं. म्हणाली कीं, तान्हंबाळ मी आडवं धरलं. पाणी पाजीन म्हणाले. पण बाळानं चमत्कार दावला. उड्डाण केलं. वृक्षावर चढला. झाड येंगला. दाळीन् दाळी टिपली. उड्या घेत कुठल्या मुलखाला गेलाय म्हणाली. धावत नाहीं बोलली. म्हणून मी तप धरलंय. पण तूं का आणखी कोडं टाकतीस?

अंजनीमातेला पार्वती याउप्पर म्हणाली कीं, सत्त्व गेलं म्हणून सांग. त्या कारणानं अंजनीमाता

दी १९,२०







म्हणाली, "भरतार भरतार म्हणूं नको. भरतार नाहीं सुखाचा. जीव जाईल लाखाचा."

पण पार्वतीनं आपला हेका टाकला नाहीं. जीव गेला तर जाऊं दे म्हणाली. म्हणतांना मग अंजनीमातेचा नाइलाज झाला. म्हणाली कीं, "अटिंग्या वनांत जा. किर्र्दाट झाडींत जा. वनगाईच्या शेणांत सारवून घे. सात सुयांची उतरंड लाव. सुईच्या टोकावर जिभेचा झेंडा लाव. उफराटं तप धरून बैस. मनची इच्छा पुरी होईल."

पार्वती बराय म्हणाली. टरल्या स्थळीं चालली. भयासूर वनांत गेली. वनगाईच्या शेणानं सारवलं. सुयांची उतरंड लावली. सुईच्या टोकाला जिभेचा झेंडा लावला. उफराटं तप मांडलं. सगळा देह तोलून धरला. दिवसा-मागून दिवस आले न् गेले. पार्वतीच्या भोंवतीं घनदाट जंगल आलं. वाळवी चढूं लागली. वारूळ उभं राहिलं.

त्यामुळं सूर्याचा रथ बंद पडला. सूर्यदेवानं विचार केला. असं कां झालं म्हणाला. रथ मागें वळवून तळावर आला. जिकडे रथ वळवावा तिकडे तें तप वळतें म्हणून बोलला. मातेला वृत्तांत कथन केला. मातामाय मग बोलली, "कोणीं तप मांडलं आहे तें तुला माहीत नाहीं. तुला जिंकण्यासाठीं हें तप मांडलंय बाळ."

त्यासरशीं मग सूर्यदेवानं रथाला शेलका वारू जोडला. स्वतः रथांत बसला. आकाशमार्गें रथ निघाला. तपाच्या स्थळीं अवतरला. रथ खालीं येईल त्या वेळेला तप धरणींत लागलं जिरायला. रथ मग पार खालीं धरतीला टेकला. पण तप कांहीं हातीं लागेना. म्हणतांना मग सूर्यदेवानं आपला रथ मागं वळवला. तळावर घेऊन आला. मातेला अशानं असं झालं म्हणाला. शोंदलं तरी तप हातीं लागलं नाहीं म्हणाला. मग मातामाय बोलली कशी, "बाळा, सांगतें तसं कर. मधल्या भागावर रथ ने. चौसष्ट झळा न् बावन्न कळा त्या ठायीं सोडून दे. तप जळून जाईल." सूर्य-देवानं मग त्याबरहुकूम गोष्ट केली. त्यामुळं पाषाणाच्या लाह्या उडाल्या. तें बघून सूर्यदेव तातडीनं तळावर परतला. मातामायला तें खपलं नाहीं. काय झालं म्हणाली. सूर्यदेवानं तिला म्हटलं, "माझ्या झळेनं झाडंझुडं जळलीं. पशुपक्षी मरून गेले. मोठा चमत्कार झाला."

त्या घटकेला नवलाख तारांगण डुललं. भोळ्या शंकराला हादरा बसला. त्याच्या जिवाला कोडं पडलं. त्यानं इंद्रसभेला तेहत्तीस कोटी देवांना बोलावलं. पैजाचा विडा मांडला. मानवखंडांतील तपाचा शोध लावावा म्हणाला. सर्व देवांनीं विडा उचलला. तेहत्तीस कोटी देव मानवखंडाला आले. तपाचा शोध करूं लागले. त्यांनीं विचार केला. कुराडी घेतल्या. किर्र्दाट वनांत उतरले. फरा धरला. झाडीडंग तोडला. अग्नि दिला. धुराचा लोट उसळला. त्यांची फजिती उडाली. त्यांना कांहींएक सुचेना. कांहींएक दिसेना. हार खाल्ली. इंद्रसभेला परतले. भोळ्या शंकराला वर्तमान दिलं. जीवदान मागितलं. शरण आले.

तें बघून भोळ्या शंकराचा नंदी हंसला. असं कसं होईल बोलला. त्यानं विडा उचलला. तपाचा शोध लावूनच परत येईन म्हणाला. निर्धार केला. इंद्रघर सोडून निघाला. मानवखंडाला आला. नंदीनं अटींग्यावन गांठलं. सारी जागा धुंडाळली. उन्हाच्या लाहीनं थकून गेला. कंठ शोषून गेला. पण तपाचा शोध म्हणून लवकर लागेना. म्हणतांना मग नंदीनं भोळ्या शंकराचा धांवा केला. त्यासरशीं त्याच्या नजरेंत तें वारूळ आलें. नंदीनं मग विचार केला. वारूळ फोडावं म्हणाला. पक्का बेत केला. आणिक मग तो वारु-ळाजवळ आला. त्यानं मग युक्ति काढली. वारु-ळाभोंवतीं वेढा टाकला. डाव्या पायाचा खटका मारला. डावं शिंग त्यावेळीं लागलं वारुळाला.

एवढ्यांत चमत्कार झाला. आंतून आवाज घुमला. पार्वती म्हणाली कशी, "नंदी महाराज, थोडा दम धरा. राग थंड करा. मागं सरा. माझी एक मागणी करतें."

नंदी बरं म्हणाला. काय मागायचं तें मागून घे बोलला. नसलं तर निर्माण करून देतों म्हणाला. म्हणतांना मग पार्वतीनं बोलणं केलं. धन द्रव्य नको म्हणाली. जन्माचा चुडा कधीं हालायचा नाहीं, कधीं डुलायचा नाहीं. बिनमरणाचा पति दे मला. असं बोलली.

हें ऐकून नंदीला मोठं कोडं पडलं. म्हणाला कीं, असा भरतार मिळणार नाहीं तुला पार्वती. तशी पार्वतीनं त्याला विचारलं. सत्त्व गेलं म्हणून सांग म्हणाली. अशा भरताराच्या पायांत प्राण गमावीन पण माघार नाहीं बोलली.

त्यासरशी नंदी कावराबावरा झाला. त्यानं विचार केला. हें निराळं दिसतंय म्हणाला.

नंदीनं मग डावा गुडघा टेकला. उजवं शिंग वारुळाला लावलं. त्या घटकेला पार्वतीचं तप उतरलं. वारुळ फुटलं. पार्वती बाहेर आली. नंदीबरोबर इंद्रसभेला निघून गेली.

पार्वतीचं रूप बघून तेहतीस कोटी देवांचे डोळे दिपले. इंद्रसभा डोलायला लागली.

इंद्रसभेंत नाचणाऱ्या रंभा पार्वतीपुढं फिक्क्या पडल्या. देवांनीं मागणी केली पार्वती आम्हांला पाहिजे.

नंदीनं विचार केला. पार्वतीला सांगितलं. हार हातीं घे म्हणाला. शंकराला या घोळक्यां-तून शोधून काढ बोलला.

पार्वती हारखून गेली. तिनं साजशिणगार केला. नवलाख तारांगणांनीं गुंफलेली साडी नेसली. चंद्रसूर्याचे दागिने ल्याली. रत्नामाण-कांचा हार घेऊन निघाली. स्वयंवर मांडलं गेलं. तेहतीस कोटी देवांमधून चालली. पण भोळा शंकर मात्र तिला कुठं दिसेना! आता काय करावं? पार्वतीला कोडं पडलं.

इतक्यांत कसलासा उजेड पडला. लांबच्या पल्ल्याला शंकर पळून गेला. पार्वतीनं तें पाहिलं. त्याच्या मागोमाग ती धावली. इंद्रसभा चकित झाली. पार्वतीनं पारख केली. भोळ्या शंकराच्या पायावरची पद्म ओळखली. हारखून गेली. तिनं भोळ्या शंकराला माळ घातली.

सगळीकडे आनंदीआनंद झाला. पार्वतीचा पण पुरा झाला. गांवोगांव वार्ता गेली. राजानं हत्ती वरून वाण वाटलं. लेक असावी तर अशी असं म्हणाला. राणीनं लेकीला पोटाशीं धरली. लेक सासरीं निघाली तिच्या नेत्रीं पाणलोट आला. राजा गहिंवरला. शंकरपार्वतीचा जोडा उठून दिसला.

आमची कहाणी संपली. साठा उत्तरीं सुफळ संपूर्ण झाली. तिनं इंद्राघरची गोष्ट दिली.



*खुज्या दाराच्या त्या घराला वाङ्मयांतील भुतांनी झपाटलें. आणि फुलासारखी वाढलेली ऊर्मिला वाढतच राहिली. त्या राजबिंड्या I.A.S.ची तिनें अनेक दिवस वाट पाहिली. आणि एका दिवशीं....!*

गांवांतील मुख्य रस्त्यावरच, अगदीं टोकाला, एक तिमजली घर होतें. खुज्या दाराचें, जुनाट आणि कोंदट. मजले जणुं पत्त्याच्या बंगल्यासारखे एकमेकांवर चढलेले. केव्हां कोसळतील याचा नेम नाहीं!—आंत शिरल्याबरोबर एक लहानशी खोली लागायची. तेथें फक्त एक बाकडें, आणि कोपऱ्यांत मोरी. कठड्यावर पाण्यानें भरलेला हंडा आणि तपेली—आणि एक सनलाइटची झिजलेली वडीसुद्धां! तेथून स्वयंपाक-घरांत जायला दार होतें—तेंहि खुजेंच. स्वयंपाकघरांत अंधार. अपुऱ्या उजेडांत कोठें काय ठेवलें आहे, हें चटकन् दिसत नसे. दोन शेगड्या, एक स्टोव्ह, कांहीं भांडींकुंडीं, कोपऱ्यांत उभे करून ठेवलेले पाट—हें सगळें होतेंच; पण डोळ्यांत भरायचा तो एका कोनाड्यांत, रॉकेलच्या चिमणीशेजारीं ठेवलेला क्राफ्ट चीजचा डबा. मागच्या बाजूला संडास आणि स्वतंत्र, पत्र्याच्या दाराची, आंतून कडी लावतां येण्याजोगी आणखी एक 'बाथरूम.' पुढच्या खोलींतून सातआठ दगडी पायऱ्या चढून वर गेल्यावर दोन खोल्या होत्या. या खोल्यांना दारें नव्हतीं, फक्त चौकटी होत्या. चौकटींची उंची खालच्या मजल्यावरील दारांच्या मानानें अधिक होती. एका खोलींत मळकट जाजम अंथरलें होतें, आणि त्यावर अत्याधुनिक पद्धतींच्या चार चकचकीत खुर्च्या ठेवलेल्या होत्या. भिंतीला लागून एक पॉलिश उडालेला लाकडी स्टँड—त्यावर जुन्या पातळाचें आच्छादन टाकलेलें. स्टँडच्या एका कप्प्यांत औषधांच्या बाटल्या होत्या, आणि उरलेल्या दोन कप्प्यांत पुस्तकें—सेकंडहँड बाटावींत अर्धी. एकदोन संस्कृत नाटकें, पांचहा शेक्सपिअरचीं नाटकें, गोल्डन ट्रेझरीचा चौथा भाग, विनायकांची कविता, उषःकाल, Pride & Prejudice, How green was my valley, Ivanhoe, Three musketeers, शिवाय फडके—खांडेकरांच्या एकदोन कादंबऱ्या. घरांतील माणसें हीं पुस्तकें पुन्हापुन्हा वाचायचीं, त्यावर चर्चा करायचीं. शेजारच्या खोलींत देव्हारा होता; एका भिंतीशीं चहापाण्याचें साहित्य—आणि समोरच्या भिंतीशीं एक ऐसपैस पलंग. या पलंगाजवळच तिसऱ्या मजल्यावर जाण्याचा जिना होता—अगदीं अरुंद, कठडा नसलेला, लाकडी फळ्या ठोकून तयार केलेल्या पायऱ्यांचा—जणुं एखाद्या शिडीसारखा. जिन्याला बारातेरा पायऱ्या होत्या. वर एकच खोली होती. खोलीचें दार खुजें नव्हतें; खूप उंच होतें. दोन खिडक्या होत्या. तिथून खालीं पाहिलें कीं रस्ता विहिरींतल्या पाण्या-सारखा दिसायचा, त्यावरून जाणारीं माणसें ठेंगणीं वाटायचीं. खिडकींतून माड दिसायचे, गांवाच्या टोकापर्यंत नजर पोंचायची. त्या बाजूला एकदोनच घरें झालीं होतीं—आणि एका घराचा फक्त पाया बांधून तयार होता. डोळे लावतां लावतां त्या पायावर एक कोरें, टुमदार घर उमलल्यासारखें वाटायचें. खोलींत तीन पलंग होते. त्यांवर अस्ताव्यस्त पडलेल्या उशा, क्वचित् पलंगाच्या कठड्यावर लोंबणारें एखादें चुरगळलेलें पातळ. पलंगाखालीं पत्र्याच्या ट्रंका. अर्धवट मिटलेल्या. त्यांतून डोकावणाऱ्या पातळांच्या घड्या. टेबलावर रचलेलीं पुस्तकें, विखुरलेल्या वह्या, एक पर्स आणि दोन घड्याळें. भिंतीवर टांगलेला एक मोठा आरसा— आणि त्याच्या आसपास कंगवे, पावडरचा डबा, एकदोन तऱ्हेचीं क्रीम्स...काजळाची डबी. एखाद्या महालासारखी

वाटायची ही खोली. रेत्यावरचे आवाज वरपर्यंत पोंचत नसत; खालून जाणाऱ्या माणसांचे वास येत नसत. या सगळ्यापासून दूर, उंचावर—

खुज्या दाराचें घर—आणि त्यांत वावरणारीं हीं उंच माणसें. कांहीं वर्षांपूर्वी हीं माणसें डोकें खालीं वांकवून या घरांत शिरलीं—आणि आंत शिरल्यावर आपल्या पुन्या उंचीनिशीं वावरूं लागलीं. आणखी उंच होत गेलीं. घर लहान, पण कमी भाड्याचें म्हणून घेतलें. पुढें कांहीं दिवसांनीं आपण भाड्याच्या घरांत राहात आहोंत, याचा विसर पडला; तें स्वतःचें वाटूं लागलें; जणुं स्वतः बांधून घेतलेलें, स्वतःला हव्या तशा सोयी करून घेतलेल्या. त्यांना पूर्वीपासून स्वतःच्या घरांत राहायची संवय होती. हें गांव म्हणजे एक संस्थान. कुटुंबप्रमुख संस्थानिकाच्या मर्जीतला होता. महाराजांनीं त्याला स्वतःच्या हाताखालच्या एका लहानशा जहागिरीचा खाजगी कारभारी नेमलें होतें. राहायला बंगला, भोंवतीं मोठी बाग, उत्तम फर्निचर, प्रत्येक मुलाला स्वतंत्र खोली. कोठेंहि जायला यायला सरकारी गाडी. बहुतेक वेळ वाड्यावरच जायचा. वडील महाराजांना कांहीं ना कांहीं वाचून दाखवायचे, आणि मुलें युवराज-युवराज्ञीबरोबर खेळायचीं. तेथेंच खायचींप्यायचीं. वाड्यांतील नोकरांना हुकूम सोडायचीं. त्यांनीं मान तुकवून 'जी' म्हटलें कीं खूष व्हायचीं. पुढें संस्थान विलीन झालें—आणि तें उसनें वैभव संपलें. त्या वैभवाच्या

—विजया राजाध्यक्ष

आठवणी बरोबर घेऊनच हीं माणसें खुज्या दाराच्या घरांत शिरलीं. शिरतांना त्यांनीं जरासें डोकें वांकवलें, आणि आंत गेल्यावर तीं पुन्हा उंच झालीं. पूर्वीच्या आठवणी येत. त्यांत खंत नसे, निव्वळ प्रौढी. "केवढा राजेशाही बंगला होता आमचा!" "आम्हांला कधीं पायीं फिरणं ठाऊक नाहीं." असलीं वाक्यें त्यांच्या तोंडून सतत ऐकूं यायचीं. यजमानीणबाईंना आपल्या या गेलेल्या वैभवाचें उदंड कौतुक होतें. त्या नेहमीं डोक्यावरून पदर घेत, स्वरांत खोटी अदब आणून बोलत. खुज्या दाराच्या घरांत आल्यावर त्यांना हातानें स्वयंपाक करावा लागला, पण शेगडी पेटवून देणें, तांदूळ निवडणें वगैरे कामें त्यांनीं मोलकरणीकडे सोंपविलीं होतीं. "आम्हाला नाहीं असल्या कामाची संवय!" त्या म्हणायच्या. मुलींना त्या स्वयंपाकघरांत येऊं देत नसत. "माझ्या मुली फुलांसारख्या नाजुक आहेत. आपापल्या घरीं गेल्यावर राजाच्या राण्यांसारख्या राहतील!" त्या इतरांना पुन्हापुन्हा सांगायच्या. प्रत्येकीचें बारसें केवढें थाटामाटांत झालें होतें. प्रत्येक वेळेला राणीसाहेब स्वतः बाळंतविडा घेऊन हजर. एकीला सोन्याची सांखळी घातली, दुसरीला बांगड्या. दर खेपेला यजमानीणबाईंना उंची लुगड्याची ओटी. धाकट्या मुलीच्या वेळेला बाळंतपण जरा जड गेलें. यजमानीणबाईंची प्रकृति खालावली. महाराज स्वतः भेटायला आले. एका संस्थानचा राजा तो. पण पायगती बसून पाय चेपलेन् त्यानें. जातांना उशाशीं पैसे ठेवून गेला. "असूं देत वहिनीसाहेब. औषधपाण्याची हयगय करूं नका." असें पुन्हापुन्हा बजावलें. मुलाच्या मुंजींत तर महाराज आणि राणीसाहेब घरच्यासारखीं वावरत होतीं. त्यावेळीं सरकारांकडून अहेर म्हणून आलेला सोन्याचा पांच पदरी गोफ अजून यजमानीणबाईंच्या गळ्यांत होता. बाकीचे दागिने गहाण टाकले होते. "एकेक गोठ दहा तोळ्यांचा आहे!" "असा चंद्रहार अलीकडच्या सोनारांना करतांसुद्धां यायचा नाहीं!" "तनमण्याचं खोडं हिऱ्यामाणकानं खचलं आहे नुसतं!—" अशी आपल्या गहाण दागिन्यांचीं वर्णनें करतांना यजमानीणबाई रंगून जायच्या. विटलेलें पातळ नेसून त्या आपलीं ठेवणींतलीं लुगडीं दाखवायच्या. पैठणी, शालू, भरजरी, गर्भरेशमी पातळें...आतां त्यांतलीं एकदोनच शिल्लक होतीं. बाकीचीं मुलींनीं मधोमध फाडलीं होतीं आणि त्याचीं दोन पातळें केलीं होतीं. यजमानीणबाई फक्त स्वयंपाकापुरत्या स्वयंपाकघरांत असत. एरवीं त्या बाहेरच्या बाकड्यावर बसत, किंवा दुसऱ्या मजल्यावर एकसारख्या कांहीतरी वाचत. त्यांचा जन्म रांधण्यासाठीं, शेगडींतील धुरानें डोळे चोळण्यासाठीं थोडाच होता? त्यांच्या भोंवतीं एकसारखें खानदान दरवळत असे. या खानदानाला जपण्यासाठींच, यजमानांनीं खाजगी कारभाऱ्याची नोकरी सुटल्यानंतर दुसरी नोकरी पत्करली नाहीं. मुली सांगायच्या, "महाराजांच्या कारकीर्दींत इतर अधिकाऱ्यांनीं पैसा केला, घरं बांधलीं—पण आमच्या बाबासाहेबांची सचोटी दांडगी. एक पै न घेतां नोकरींतून बाहेर पडले ते." हें खरें होतें. त्या राजेशाही बंगल्यांतून हा माणूस जसाच्या तसा बाहेर पडला—आणि खुज्या दाराच्या घरांत शिरला. महाराजांनीं इनाम दिलेली शेतीवाडी होती, त्यामुळें धान्यदाण्याचीं चिंता नव्हती. वर्षाकांठीं सातआठ पोतीं तांदूळ यायचा. शिवाय जोंधळा, गूळ, मिरच्या...फारसें कांहीं विकत घ्यावें लागतच नसे. वरखर्चासाठीं थोडा पैसा शिल्लकींत होता. मुलांचीं शिक्षणें सुरू झाल्यावर तो भराभर संपूं लागला. मग कांहीं पितळेचीं अवजड भांडींकुंडी विकलीं. त्यापाठोपाठ चांदीची भांडीं. त्यापाठोपाठ दागिने. पण दागिने सगळेच विकले नव्हते कांहीं. थोडेसे गहाण टाकले होते. पैसे फेडतांच तात्डतोब परत मिळण्याजोगे होते. ती वेळ फार दूर नव्हती. मुलगा कॉलेजांत होता. दोनतीन वर्षांत त्याला एखादी मोठी नोकरी लावून देऊं. मुलीहि सासरीं जातील. मग पैसे फेडायला काय उशीर? शिवाय गांवांत पत मोठी होती. नुसता शब्द टाकायचा अवकाश, हवें तेवढे कर्ज मिळत असे. असें कर्ज काढूनच बाबासाहेबांनीं गांवाबाहेर एक जागा घेतली होती. तेथें ते लवकरच घर बांधणार होते. हक्काचें घर. भाड्याच्या घरांत बसून ते या घराचीं स्वप्नें पाहात. मालकीचें घर. आपल्या खानदानाला साजेसें घर. रोज सकाळसंध्याकाळ ते या जागेकडे






चकरा मारीत. अजून जागा तशीच पडून होती पण केधींतरी घर तयार होणारच होतें. तें झालें कीं संपलें. मग थोडक्यासाठीं नोकरी कशाला करायची ?—असें म्हणत बाबासाहेबांनीं पंधरा वर्षें काढलीं. त्या खुल्या दाराच्या घरांत. हळूहळू तें घर स्वतःचेंच वाटूं लागलें. कसें पद्धतशीर बांधलें आहे. आंत शिरल्याबरोबर मोरी पाहिजेच. बाहेरून आल्यावर पाय मळलेले असतात. ते धुतल्याखेरीज घरांत जाणं बरें नाहीं. तें बाकहि हवेंच तिथें. कोणीहि येतेंजातें. सगळ्यांनाच का एकदम दुसऱ्या मजल्यावर न्यायचें ? तेवढी लायकी असली तर ठीक. नाहींतर पिटाळायचें बाहेरच्या बाहेर. स्वयंपाकघरांत अंधार आहे म्हणतां ? छेः जेवतांना फार झगझगीत प्रकाश नसावाच. आमच्या बंगल्यांतील डायनिंग रूममध्यें असाच मंद उजेड असायचा. स्वयंपाकघराशेजारची बाथरूम फक्त घरच्या माणसांसाठीं आहे. आम्हीं आलों तेव्हां दार नव्हतें तिला. आम्हीच बसवून घेतलें. उघड्यावर आंघोळ कशी करायची ! मुंबईकडील चाळींत राहणाऱ्या माणसांचें उदाहरण देऊं नका. आमचें वेगळें आहे. सकाळीं अर्धापाऊण तास स्नानगृहांत घालविल्याखेरीज चैन पडत नाहीं आम्हाला ! मुली तर कधींकधीं संध्याकाळींसुद्धां बाथ घेतात. खालच्या मजल्यावर फार वेळ काढतच नाही आम्ही. दुसऱ्या मजल्यावर library आहे, उत्तम फर्निचर आहे; तेंच आमचें खरें जग. मोटमोठ्यांशीं ओळखी आमच्या. अजून तीं माणसं येतात. त्यांना जाजमावर का बसवायचें ?—म्हणून परवांच थोडें कर्ज काढून या खुर्च्या आणल्या विकत. कर्ज काय, कधींहि फेडता येईल. आम्ही चहापाण्याची व्यवस्था मुद्दामच वर ठेवली आहे. पुन्हा पुन्हा खालीं कोण जाणार ? दिवसांतून कैक वेळां चहा करावा लागतो. आपल्या इतमामाला शोभेसं अतिथ्य नको का करायला ? शिवाय बाबासाहेब इथंच पलंगावर झोपतात. त्यांना 'बेड टी' लागतो. पूर्वीपासून संवय आहे त्यांना. मुली बहुतेक वेळ तिसऱ्या मजल्यावरच असतात. देखण्या, तरुण मुली त्या. ज्याच्या त्याच्या दृष्टीला न पडलेल्याच बऱ्या. वर चांगला वारा येतो: खिडकींतून सुंदर view दिसतो. श्रीमत, खानदानी घरीं पडणार त्या. त्यांना अशाच वातावरणाची संवय पाहिजे. आमचें नवें घर तयार होणार, त्यांत प्रत्येकीला स्वतंत्र खोली ठेवली आहे.

—खुज्या घरांत राहून हीं माणसें जुन्या बंगल्याच्या आठवणी काढत आणि नव्या घराचीं स्वप्नें पहात. हें खुजें घर आपलें तात्पुरतें; जुन्या बंगल्यांतून नव्या घराकडे जाणाऱ्या पुलाचा जणुं एक टप्पा. सुरुवातीला तें पुलाखालून वाहणाऱ्या एखाद्या ओहळासारखें दिसायचें. पण हळूहळू तें उंच होऊं लागलें—आणि एक दिवस पुलाला येऊन भिडलें. आतां उंच माणसांना डोकें वांकविण्याची गरज नव्हती. त्यांना त्रास होऊं नये म्हणून घराच्या छतानेंच एक उंच उडी घेतली; आपल्या भिंती जरा सरकावून घेतल्या, भक्कम केल्या. तटाच्या भिंतींइतक्या मजबूत भिंती. त्या बाहेरच्या उन्हानें तापत नसत. बाहेर कडाक्याचें ऊन असलें तरी आंत शीतल. बाहेर गारठा असला तरी आंत उबदार. सुरुवातीला जमीन टोचायची. पण हळूहळू जमिनीनेंहि आपला खडबडीतपणा जिरवून टाकला. ती सपाट, गुळगुळीत झाली. तीवरून हीं माणसें घसरायचीं, अधांतरीं चालल्यासारखीं चालायचीं. तटाआडचें सुस्त, निवांत जग. कोठी धान्यानें भरली आहे. यजमानीणबाईंच्या गळ्यांत सोन्याचा पांचपदरी गोफ आहे. शिकणाऱ्या मुलाला लवकरच मोठी नोकरी लागणार आहे. देखण्या मुलींना लवकरच मोटमोठ्यांच्या मागण्या





अनुक्रमणिका

येणार आहेत. त्यांचे वडील एका जहागिरीचे खाजगी कारभारी. गांवांत केवढा मान आहे त्यांना. अजून भेटायला वडीलवडील माणसें येतात. कोणी कोणी मुजराहि करतें. कमली उगीच म्हणून नाहीं. सगळें सुख घरबसल्या मिळतें–बाहेर पडायचें तें फक्त कर्ज काढण्यासाठी !

खुऱ्या दाराचें घर–आणि त्यांत वावरणारीं हीं उंच माणसें. घराचे यजमान बाळासाहेब. वृत्तीनें मोठे उदार. नोकरी सुटून कैक वर्षं झालीं तरी त्यांच्या स्वभावांतील दानत जरासुद्धां कमी झाली नव्हती. अजून ते घरांत एखाद्या राजासारखे वावरायचे. अंगांत सिल्कचा झब्बा, पायघोळ धोतर, पायांत सपाता. गळ्यांभोवतीं ते स्कार्फ सोडत–आणि बाहेर जातांना एका खांद्यावर शालीची घडी टाकत. त्यांचे केस मधून मधून पिकले होते, पण चेहऱ्यावर अजूनहि तारुण्य रेंगाळत होतें. त्यांचा वर्ण नितळ गोरा होता आणि त्यांची उंची पांच फूट दहा इंच होती. अंधाऱ्या घरांत राहूनहि त्यांचा वर्ण काळवंडला नव्हता. सकाळीं उठल्याबरोबर त्यांना बेड् टी लागे; दुसऱ्या वेळेलाहि एक कप पुरत नसे—चांगला दोन अडीच कप चहा हवा असे. शिवाय आलेल्या गेलेल्याबरोबर आहेच. सकाळीं ९–९॥ पर्यंतचा त्यांचा वेळ चहा पिण्यांत आणि वर्तमानपत्र वाचण्यांत जाई, आणि नंतर भेटायला येणाऱ्या माणसांची रीघ सुरू होई...

"अरे, या या या" ते म्हणत. कोणी पाहुणा दिसला कीं त्यांना फार उत्साह वाटे.

"उम्मी, चहा पोहे पाठवून दे ग." ते हुकूम सोडत.

मग घरांत कुजबूज चालू होई.

"पोहे संपले आहेत—"

"अग, पण तो मोठा डबा भरलेला होता ना ?"

"हो, पण आपल्याकडे येणंजाणं किती असतं ?"

"खरंच. मग आतां काय करूं या ?"

"शेजारच्या बेकरींतून खारीं बिस्किटें आणवूं. खुसखुशीत, 'रिच्' असतात !"

"चहाबरोबर नुसतींच बिस्किटं ?"

"थोडासा चिवडा आणवावा—"

"थोडासा का ? आणायचं तें चांगलं भरपूर.

"कोणाला पाठवूं या ?"

"चंपाबाई आली आहे का बघ—"

"पैसे ?"

"आण कीं उधार. मांडून ठेव म्हणावं."

—ही कुजबूज बाहेर ऐकूं जात नसे. बाहेर बिस्किटें चिवड्यासकट चहा येई. बाबासाहेब आग्रहानें सर्वांना खाऊं घालत. मध्येंच ते आणखी एक हुकूम सोडत, "चीजचा डबा पाठवा हो."

"बिस्किटाला चीज लावून पाहा, अनंतराव. फर्स्टक्लास लागतं !"

पाहुणा मिटक्या मारीत विचारी, "हा काय प्रकार आहे ?"

"चीज. नऊ रुपये किंमत आहे डब्याची. झालं काय, बंगल्यांत असल्यापासून आमच्या मुलांना टोस्टबरोबर चीज खायची संवय. नुसता पाव आवडतच नाहीं त्यांना."

माणसांमागून माणसें येत राहात. तऱ्हेतऱ्हेच्या विषयांवर गप्पा चालत. बाबासाहेबांनीं अलीकडे तत्त्वज्ञानाचें आणि आयुर्वेदाचें कसून वाचन चालवलें होतें. सॉक्रेटिस हा त्यांचा लाडका तत्त्वज्ञ. ते तत्त्वज्ञानावर बोलूं लागले कीं मुलींना कौतुकाचें भरतें येई:

'चवनप्राश,' 'सुवर्णमालिनीवसंत' अशांसारखी लेबलें असलेल्या बाटल्या बाबासाहेबांच्या जवळपास नेहमीं असायच्या. ते इतरांना तीं औषधें हौसेनें द्यायचे. मग गांवांत त्यांचा याबद्दल गवगवा झाला. सल्ल्यासाठीं माणसें येऊं लागलीं. ते फुकट सल्ल्याबरोबर फुकट औषधहि देऊं लागले. सल्ल्यासाठीं आलेल्या माणसांना आयुर्वेदावर तासन्‌तास व्याख्यान देणें हा त्यांचा छंद होऊन बसला. "आमच्या बाबासाहेबांच्या हाताला विलक्षण गुण आहे." मुली तारीफ करूं लागल्या. मुलींवर त्यांचा फार जीव. मुली मोठ्या झाल्या तरी त्यांच्या मांडीवर लोळायच्या; लाडांत आल्या कीं त्यांच्या गळ्याभोंवतीं हात टाकायच्या. कॉलेजांत गेल्यावर उर्मीनें घड्याळासाठीं हट्ट धरला. ते सरळ दुकानांत गेले आणि दुकानदाराला म्हणाले, "एक चांगल्यापैकीं लेडीज रिस्टवॉच दे रे." त्याचें देणें अजून चुकतें करायचें होतें. पण मुलीची हौस तर भागली !—मुलींच्या लग्नाची आपल्याला खटपट करावी लागणार नाहीं, त्यांना यथावकाश थोरामोठ्यांकडून मागण्या येतील याबद्दल त्यांना खात्री होती. कोणी आलें कीं ते मुलींना बोलवायचे, ओळख करून द्यायचे, "ही आमची ऊर्मिला. B. A. ला आहे. उत्तम करिअर. डिबेटमध्यें नेहमीं भाग घेते. पहा कशी राजबिंडी दिसते. साडेपांच फूट उंची आहे तिची !—ही आमची उज्ज्वला. ही तर काय, कॉलेजची ब्यूटीच आहे. अहो, आतांपासूनच proposals येऊं लागलीं आहेत ! King Lear पेक्षांहि भाग्यवान् मी. मला चार मुली—आणि चौघीहि गुणी." आपल्या मुलाबद्दल ते फारसे बोलत नसत. बाबासाहेबांचें घरांत लक्ष नसे. ते एकसारखे तत्त्वज्ञानांत किंवा आयुर्वेदांत रंगलेले असत. जग सुंदर आहे. जग मंगल आहे. माणसांचें





अनुक्रमणिका

अद्भूत !




पलीकडचा माणूस सिगारेट ओढतोय हो...

भलें होणार आहे. आतां नव्या वास्तूंत जायचें. भोंवतीं मोकळी जागा आहे. बाग करूं या, फळझाडें लावूं या. निवांतपणें बोलत बसतां येईल. साफ न केलेल्या, कांटेकुटे, खडे असलेल्या जागेवर उभे राहून बाबासाहेब स्वप्नें पाहात. फक्त पाया तयार होता. तोच मग आपल्याभोंवतीं भिंती रची, छप्पर बांधी, दारेंखिडक्या पाडी—आणि मग एक उंच घर उभं राही. पांच फूट दहा इंच उंचीच्या दादासाहेबांना ताठपणें चालता यावें, एवढें उंच.

यजमानीणबाईची उंची पांच फूट चार इंच होती. मुलें त्यांना 'ममी' म्हणत. ही बाई पन्नाशी ओलांडून गेली होती, आणि तें ओळखूं येत होतें. चेहऱ्यावरच्या सुरकुत्यांत, विरळ केसांत वार्धक्याच्या खुणा होत्या. "हूं! पांच बाळंतपणं झालीं आमच्या ममीचीं पण फिगर कशी सडसडीत राहिली आहे!" असें कौतुक चालू असायचें! तें मात्र खरें होतें. ममींच्या अंगावर कोठेंच मांस नव्हतें. त्यामुळें चेहरा खप्पड आणि आवाजहि थकलेला, बसलेला वाटायचा. त्यांच्या अंगावर नेहमीं विटकीं पातळें असत आणि त्या पुढच्या खोलींतील बांकावर बसून एकसारख्या कांहींतरी जुनेंपानें शिवत. कधीं शर्टाच्या कॉलरी उलट्या कर, कधीं जुने पायजमे फाडून पिशव्या शीव, असे त्यांचे उद्योग चालू असत. एखादी गोधडी मांडून टांके घालूं लागल्या कीं त्या आजूबाजूचें भान विसरत. फावल्या वेळांत वाचन तरी—नाहींतर हें विणकाम तरी. मुलींच्या मतें त्या "एकच प्याला'तील सिंधूसारख्या होत्या—अत्यंत स्वाभिमानी, पतीवर अपार प्रेम असणाऱ्या. झालेलें शिवण त्या एखाद्या ट्रंकेंत कोंबून ठेवीत. कोणालाहि दाखवीत नसत. शिवतांना त्यांच्या डोक्यावर पदर नसे, पण शिवून झाल्यावर मात्र त्या चटकन् डोक्यावर पदर घेत. त्या फारशा बोलक्या नव्हत्या. बाबासाहेबांशी तर अजिबात बोलत नसत. मुलांवर मात्र त्यांचा भारी जीव. तो कॉलेजांतून आला कीं त्या लगबगीनें खालीं यायच्या. चहा करायच्या. बरोबर मित्र असले तर कांहीं तरी खाणें करायच्या. मुलाच्या मित्रांमध्यें मिसळून गप्पा मारायला त्या उत्सुक असत. त्यांच्याशीं त्या बऱ्यापैकीं इंग्रजींत बोलायच्या. मुलगा एरवीं बेफिकिरीनें वागला तरी ममींच्या गळ्यांत पडे. ममी त्याला पैसे देत—बाबासाहेबांच्या नकळत. त्यांचा एक दूरचा भाऊ होता. तो त्यांना भाऊबिजेला शंभर रुपये घाली. त्यांतून त्या मुलांचे लाड पुरवत. हा श्रीमंत भाऊ घरीं आला कीं एरवीं अबोल असणाऱ्या ममी खूप बडबडत. जुन्या बंगल्याचीं आणि दागिन्यांचीं वर्णनें करत! नवें घर जवळजवळ 'तयार होत आलें आहे' असें पुन्हापुन्हा सांगत. मुली म्हणायच्या, "आमच्या ममीच्या हातालाच चव आहे! तिनं नुसतं पिठलं केलं तरी तें अमृतासारखं लागतं!" हा अमृतप्राशनाचा योग रोज रात्रीं असे. पण मुली लग्नं होऊन सासरीं जाणार होत्या, मुलाला नोकरी लागणार होती, नवें घर तयार होणार होतें. नव्या घरांत शिवणाची ट्रंक न्यायची नाहीं, येथेंच फेकून द्यायची असें ममींनीं ठरविलें होतें.—ममींनीं पन्नाशी ओलांडली तरी जवळून मरण पाहिलें नव्हतें.

ममींची सर्वांत मोठी मुलगी विमला. तिचें लग्न झालें होतें. तिला मुलेंबाळेंहि होतीं. ती इतकी मोठी होती कीं ही आपली सावत्र बहीण असली पाहिजे अशी मुलींना शंका येत असे, पण खात्री नव्हती. तिचें घर पुण्याला होतें. ती माहेरीं आली कीं सहासहा महिने राहायची. आली कीं आपला अधिकार गाजवूं लागायची. भावाला कॉलेजांतून यायला उशीर झाला कीं खडसून विचारी, "काय रे, कुठं होतास इतका वेळ?" बहिणींना म्हणे, "चला, तुमचा अभ्यास घेतें." बाबासाहेबांशीं ती तासन्तास बोलत बसे. कधींकधीं दोघांचेहि स्वर चढत. कशासाठीं, याचा इतरांना पत्ता लागत नसे. इतकें खरें कीं ती असल्यावर तिच्या सल्ल्यानेंच घर चालायचें. "हिचा काय संबंध?" धाकट्या बहिणी हलक्या आवाजांत पुटपुटत. ती गेली कीं सुटकेचा निःश्वास टाकत. इतरांना सांगत, "आमची दिदी गेली आज पुण्याला. घर ओकंओकं झालं आहे. फार प्रेमळ आहे...आणि आमचीं भाचरं तर इतकीं गोड आहेत!"—एका खेपेला दिदी आली आणि सहा महिने झाली तरी परत गेली नाहीं. गांवांत कुजबूज चालू झाली. तिच्या नवऱ्याचें दुसरें कांहींतरी प्रकरण असल्याची अफवा उठली.- हें शक्य तरी होतें का? त्याचें दिदीवर केवढें प्रेम होतें! वर्ष उलटलें तरी दिदी गेली नाहीं. मग तिनें तेथेंच रेशनिंग ऑफिसांत नोकरी धरली. तिला एका शब्दानेंहि कांहीं विचारण्याची सोय नव्हती. "केवढा महान् त्याग आमच्या दिदीचा. स्वतःचा संसार टाकून इथं आली—आम्हाला आधार देण्यासाठीं!" घरांत आवाज उठला. दिदीचें पाऊल घरांत पडतांना घराच्या भिंतींना एक लहानसा हादरा बसला होता पण

लवकरच त्या स्थिर झाल्या. आणखी एक उंच माणूस घरांत आलें. दिदीला तिच्या नवऱ्याची नियमितपणें पत्रें येत. त्यांत "तूं लवकर परत ये" असा मजकूर असे! तेवढ्यावरच ती खूष होती.

दुसऱ्या मुलीचें नांव कमला. दिसायला मोठी तरतरीत. तिची तिशी उलटली होती, पण तिचें अजून लग्न झालें नव्हतें–नव्हे, तिनें अजून लग्न केलें नव्हतें. तिच्या फसलेल्या प्रेमाची कहाणी सगळ्या घराला ठाऊक होती. कॉलेजांत तिच्या बरोबर असलेला तरुण, देखणा मुलगा, अत्यंत promising प्रतिष्ठित कुळांतला. आणाभाका झाल्या–आणि तो तडकाफडकी वारला. घरांत त्याचा फोटोहि होता. येणाऱ्याजाणाऱ्याला तो अभिमानानें दाखविण्यांत येई. अशा मुलानें आपल्या मुलीवर प्रेम केलें, यांतच धन्यता. हें घडलें सातआठ वर्षांपूर्वी. त्यानंतर थोड्या का मागण्या आल्या? पण कमा ताठ. दुसरें प्रेम करायला कबूलच नाहीं. ती घरांत कोणाशीं बोलत नसे. नेहमीं आपल्याच तंद्रींत असायची. सकाळीं सगळें आटपून ती घराबाहेर पडायची.

"कुठें चाललीस कमा?" ममी विचारायच्या.

"लायब्ररींत." कमाचें एका शब्दांत उत्तर.

"केव्हां येणार?"

"नेम नाहीं."

कधीं कधीं धाकट्या वहिणी तिला आपल्याबरोबर फिरायला, सिनेमाला येण्याचा आग्रह करायच्या. हिचा नकार ठरलेला.

"एवढा पुळका असेल तर बसा कीं तुम्हीहि घरांत!"

असल्या तुसडेपणामुळें वहिणी तिला वचकून असत. एकदां उज्ज्वलाच्या लग्नाचें घाटत आहे हें तिच्या कानावर गेलें. ती आईवडिलांना ताडताड बोलली, म्हणाली, "एक मुलगी दुःखांत असतांना दुसऱ्या मुलीच्या सुखाचा तुम्हाला विचार करवतो तरी कसा?" हें उज्ज्वलानें ऐकलें. ती म्हणाली, "किती तडफडायचं हिच्यासाठीं? झालीं आतां सात-आठ वर्षे. बाप्याची बिलंसुद्धां फाडून टाकतों आपण कांहीं दिवसांनंतर. किती कुजवायचं दुःख?" मग घरांतील इतर माणसें उज्ज्वलाची समजूत काढत. कमाचें जीवन कोळपून गेलें आहे. कळी उमलण्याआधींच कोमेजली आहे. आपण जपलें पाहिजे तिला. प्रियकराच्या स्मृतीखातर आयुष्यांतील सगळ्या सुखांवर पाणी सोडणें ही कांहीं साधी गोष्ट नाहीं. मग उज्ज्वलाला तें पटे. खरोखर, कमा ही एक विरागिनी आहे.

कमाला वाचनाचा विलक्षण नाद होता. ती हार्डीच्या कादंबऱ्या पुन्हापुन्हा वाची.

"दुःखाशीं झगडते आहे पोरगी." ममी म्हणाल्या.

"स्थितप्रज्ञ आहे ती. सुखदुःखे समे कृत्वा" बाबासाहेब.

"असं दुःख पाहात असतांना आपण सुखी होण्याच्या कल्पनेंतच guilty वाटतं, नाहीं ग?" वहिणी.

—आपण दुःखाला मिठी घालत आहों या कल्पनेनें कमा सुखावली होती. तिची उंची पांच फूट साडेपांच इंच होती. हार्डीची कादंबरी हातांत असली कीं ती अधिकच उंच होई.

भाई आठ साडेआठ वाजतां उठला आणि चहा पिऊन पुढच्या बाकावर सिगारेट फुंकत बसला. मध्येंच त्याला कसली तरी आठवण झाली.

"तुझ्या ट्रंकेची किल्ली दे." तो मर्मीकडे जाऊन म्हणाला.

"कशासाठीं रे?" त्यांनीं मायेनें विचारलें.

"पैसे हवे आहेत—"

"किती?"



"एक पांचाची नोट. लॉंड्रींत बुल्गनची पँट अर्जंट धुवायला टाकली आहे. शिवाय आणखीहि कांहीं कपडे आहेत."

"असा खर्च करूं नये रे, राजा."

पैसे मिळाल्यावर तो एक क्षणहि तेथें थांबला नाहीं. सायकलवरून गांवाच्या दिशेनें निघाला. एका हॉटेलजवळ मित्रांचा घोळका उभा होता.

"या दोस्त. तुमचीच वाट पाहात होतों. चहा पाजा आतां आम्हाला."

"ओ येस."

गरम कांदेपोह्यांबरोबर चहा पिऊन झाला. मित्रांनीं भाईच्या पाकिटांतल्या सिगारेटी शिलगावल्या आणि सगळेजण विखुरले.

घरांत शिरतांशिरतां त्यानें ओरडून विचारलें, "पान तयार आहे कीं नाहीं?" त्याला अगदीं गरम जेवण लागे. दीडदोन भाकरी खाऊन

झाल्यावर तो एक अख्खा पाव आणि तीन अंड्यांचें ऑम्लेट खाई. वहिणी कुरकुरत. ममी त्यांना समजावत, "अग, दृष्ट लागण्याजोगी प्रकृति आहे त्याची. एवढा आहार नको का त्याला?" त्याचा आवाज चांगला होता. दिसायला धिप्पाड. सहा फूट उंचीचा, राजबिंडा. सिनेमांत गेला असता तर बघतांबघतां पैसा कमावला असता त्यानें. पण तें बरें दिसलें नसतें. B. A. झाल्यावर कसला तरी बिझनेस करण्याचें त्याच्या डोक्यांत होतें. "मला भरपूर पैसा लागेल" असें त्यानें बाबासाहेबांना सांगून ठेवलें होतें. त्यासाठीं शेतें विकायची योजना बाबासाहेबांनीं पक्की केली होती. एकदां त्याचा जम बसल्यावर पुन्हा घेऊं शेतें. त्यांत काय मोठेसें?—शिवाय त्याच्या लग्नाच्या वेळीं हुंडा घेऊं सपाटून. आपल्या वंशाच्या या कुलदीपकाला ममी जिवापाड जपत.

उज्ज्वला सुरेख होती. ती नाजुकपणानें, लाडालाडांत बोलायची. तिच्या भोंवतीं सौंदर्याचें धुकें सतत तरळत राहायचें. या धुक्यांत तिला घराचें अंतरंग स्वच्छ दिसतच नसे. घरांतील इतर माणसेंहि त्याच धुक्यांत सुखानें वावरायचीं. संध्याकाळच्या वेळीं तरुण मुलें घरावरून घिरट्या घालत. कोणी संधि साधून आंत येई. अशाच एकावर उज्ज्वलेचें प्रेम बसलें होतें. नुसतें प्रेमच. तिच्यावर कितीजणांचें प्रेम आहे हें सांगतांना उंच माणसांचे ऊर अभिमानानें भरून येई. माई रोज रात्रीं तिची न चुकतां दृष्ट काढत. ती B. A. झाली तरी तिच्यासाठीं स्थळें पाहण्यास बाबासाहेबांनीं सुरवात केली नाहीं. खटपट करायाची जरूरीच नव्हती मुळीं. एक दिवस तिच्या अंगाला हळद लागणार होती. आणि ती भरजरी शालू लेऊन, दागिन्यांनीं मढून या घरांतून जाणार होती—

—आणि उर्मिला फार लहान असतांना ती या घरांत आली. त्यामुळें तिच्या मनांतील बंगल्याच्या आठवणी आतां पुसटल्या होत्या. तिला वाटायचें, फार पूर्वी एका बंगल्यांत राहात होतों. आतां काय त्याचें? घरांतील माणसें त्या आठवणींचाच एक बंगला रचायचीं आणि त्यांत ऊर्मिलेला अलगद नेऊन ठेवायचीं. तिसऱ्या मजल्यावर असली कीं ती या बंगल्यांतच गुंगून जाई. दुसऱ्या मजल्यावर उतरली कीं तिसरा मजला पडून जाई; ऊर्मिलेला बावरल्यासारखें वाटे. मग ती दुसऱ्या मजल्यावरून तळमजल्यावर येई. लगेच दुसरा मजला कोसळे; सगळें सपाट, टेंगणें. स्वयंपाकघरांतल्या अंधारांत डोळे मिटून बसावेसें वाटे. पण डोळे तरी किती वेळ मिटणार!—मग ती दाराबाहेर पडे, बाहेरचा तो भगभगीत उजेड पाहून तिच्या डोळ्यांना अंधारी येई...

भगभगीत उजेड .."पैसा नसल्यामुळं आमचे काय हाल चालले आहेत याची तुला कल्पना येणार नाहीं, सुलू." एकदां त्या उजेडाकडे पाहात ऊर्मिला म्हणाली.

"पैसा नाहीं?"

"मग तें नवें घर कशासाठीं बांधता आहां?"

"तुझी ग्रॅज्युएट बहीण नोकरी कां करत नाहीं?"

"तुझा भाऊ शिक्षण सोडून पोटापाण्याच्या मागें कां लागत नाहीं?"

"घरांत दोन नोकर कशाला?"

"खाण्यापिण्याचे चोचले कशाला?"

मैत्रिणीनें विचारलेले हे प्रश्न भगभगीत उजेडांत तिच्या डोळ्यापुढें तळपूं लागले. त्या मैत्रिणीला दारिद्र्य ठाऊक होतें. ऊर्मिलेला वाटे, दारिद्र्याचा अर्थ आपणहि असाच खोलवर समजून घ्यावा; त्या दारिद्र्यानें आपलाहि करकचून चावा घ्यावा—आणि त्या वेदनांनीं विव्हळत विव्हळत आपण जगावें. पानावरून तृप्त न होतां उठावें, फाटकीं पातळें नेसावीं—हें खरखरीत ऊन अंगावर घेत हिंडावें.

—भगभगीत उजेडांत विचारलेल्या त्या प्रश्नांचीं उत्तरें ऊर्मिलेला सुचलीं नाहींत. तेवढ्यांत तिचें घर आलें. ती मैत्रिणीला म्हणाली, "आंत येतेस?"

"चल..."

आंत आल्यावर कसें शीतल वाटलें. भगभगीत उजेड झांकळून गेला. आंत धुकें होतें, अंधार होता.

"चहा घेणार?"

"कशाला ग?"

"घेऊं या ना थोडासा—" ऊर्मिलेनें सुलूला आग्रह केला. चहा झाल्यावर त्याच स्टोव्हवर टोस्ट भाजला आणि तो सुलूला देतांना विचारलें, "याला चीज लावून पाहतेस थोडं?" नंतर ती सुलूला घेऊन तिसऱ्या मजल्यावर गेली आणि खूपखूप बोलत राहिली .. "आमच्या नव्या घरांत प्रत्येकाला स्वतंत्र खोली मिळणार आहे." "आमचे बाबासाहेब गरीब असतील सुलू, पण विलक्षण दमदे आहेत—त्यांचं सर्वस्व गेलं असेल पण तें औदार्यामुळें गेलं." "भाईनं काय म्हणून नोकरी करावी!—नापास होत असला तरी बुद्धिमान आहे तो." "मलाहि कधीं कधीं फार त्रास होतो बघ. मग मी आमच्या ममीला, बाबासाहेबांना वेड्यासारखे प्रश्न विचारतें. ते नुसते हंसतात, "निष्पाप आहे आमची उर्मी—ऑफेलिया दुसरी!"—खरंच, मला कांहीं कळत नाहीं ग. कसला उलगडाच होत नाहीं."

सुलूला पोचवायला ऊर्मिला दोन मजले उतरून खालीं गेली तेव्हां तो भगभगीत उजेड पुन्हा एकदां तिच्या डोळ्यापुढें चकाकला...•

उंच माणसें तळमजल्यावर आहेत. स्वयंपाकघरांतल्या अंधारांत त्यांचें भोजन चाललें आहे.

बाबासाहेब : "हें काय, आज कोशिंबीर नाहीं का केली?"

दिदी : "भाईला सांगितलं होतं मी कॉलेजांतून येतांना काकड्या आणायला. कां आणल्या नाहींस रे?"

भाई : पैसे नव्हते.

दिदी : "हॉटेलांत चहा प्यायला पैसे असतात वाटतं?"

ममी : "नको ग बोलूं त्याला. मित्रांना treat करावंच लागतं त्याला. कमा, तूं कां अशी अन्न चिवडते आहेस ग?"

कमा : "पोट भरावं म्हणून जेवते मी. तुमच्यासारखी चवीसाठीं नव्हे.

उज्ज्वला : "म्हणजे आम्ही..."

ममी : "अहा ग. दुःखी जीव आहे तो. आपण लक्ष देऊं नये."

कमा : "दुःख पिऊनच पोट भरलं आहे माझं, ममी."

ममी : "खरं आहे, बाळ."

उज्ज्वला : "ममी, आपण तें पुडिंग करून पाहूं या ना—मी reciepe आणला आहे!"

ऊर्मिला : "ममी, एवढीच भाजी उरली!—मागून तूं जेवणार आहेस ना!"

—अंधार आहे. एकमेकांचे चेहरे दिसत नाहींत—डब्यांतून काय-काय शिल्लक आहे, हेंहि दिसत नाहीं. मध्येंच ममी म्हणतात, "आज वाणी पैसे मागायला आला होता.—" बाबासाहेब पानावरून उठतात. त्यांच्या पाठोपाठ इतर. ऊर्मिला तेवढी कांहीं वेळ तेथें रेंगाळते—

—उंच माणसें एक जिना चढून दुसऱ्या मजल्यावर गेलीं आहेत. कांहीं जण त्या चकचकीत खुर्च्यांवर बसलीं आहेत; कांहीं जण नक्षीदार लाकडी पलंगावर. बाबासाहेब सांगतात, "आज सकाळीं आला होता ना, तो आपल्या नव्या घराचा आर्किटेक्ट बरं का. हवा तसा प्लॅन काढून देतों म्हणाला. एक पै घ्यायला तयार नाहीं. म्हणतो, "बाबासाहेब, तुमच्यासारख्यांकडून कसले पैसे घ्यायचे?" आपल्या जुन्या बंगल्यासारखाच प्लॅन सांगूं म्हणजे झालं! काय?"

आतां कसें निवांत, प्रसन्न वाटतें. तो दुसरा मजला हवेंत तरंगूं लागतो—आणि उडतउडत नव्या घराच्या पायावर बसतो—पहिल्या मजल्यासाठीं थोडी जागा सोडून.

—उंच माणसें आणखी एक मजला चढून तिसऱ्या मजल्यावर जातात. प्रत्येकाच्या हातांत एकेक पुस्तक असतें. खूप वारा येतो आणि पुस्तकांचीं पानें फडफडूं लागतात, पात्रांना बाहेर ढकलून देतात. चारुदत्त येतो आणि बाबासाहेबांमध्यें लपून बसतो. 'एकच प्याला'तील सिंधू ममींचा आडोसा घेते. मारी अँटोनिएट उज्ज्वलाच्या चेहऱ्यावर उडी मारून बसते. टेस येते आणि कमलाच्या डोळ्यांतून झिरपूं लागते. ऑफेलिया ऊर्मिलेच्या नसानसांतून पसरूं लागते. ड्यूमाच्या नायकाचा मुखवटा चढवून एरॉल फ्लीन येतो आणि भाईला म्हणतो, "मला जागा दे." मर्चंट ऑफ व्हेनिस मधील उधळ्या बसानिओ कधीं कधीं त्याच्याशीं भांडतो. मग इतर माणसें मध्यें पडतात आणि ड्यूमाच्या नायकालाच जागा देण्याचा निर्णय घेतात. अशी बघतां बघतां माणसांची लायब्ररी तयार होते...माणसें आपापल्या भूमिका ठीकठाकठवत राहतात.

—खुज्या दाराच्या घराला वाङ्मयांतील भुतांनीं झपाटलें होतें. आणखी तीनचार वर्षें उलटलीं. भाई अजून बी. ए. झाला नव्हता. मनाजोगती मागणी आली नाहीं म्हणून फक्त चारशें रुपये पगार असलेल्या एका मागमाहेरोबर लग्न करणें ठरलेला भाग फसलें होतें. ऊर्मिचाहि एम. ए. होऊन बसली होती — लग्नाशिवाय. बाबासाहेबांना पुरेसें कर्ज मिळाल्यामुळें नवें घर तेवढें तयार होत आलें होतें.

ऊर्मिला एम. ए. झाली त्या दिवशीं बाबासाहेब तिला म्हणाले, "आतां तुला कोणीतरी I. A. S च शोधायला हवा! मिळेल, मिळेल!"

तिसऱ्या मजल्यावर बसून त्या राजबिंड्या I. A. S.ची ऊर्मिलेनें अनेक दिवस वाट पाहिली. अखेर ती विटली. पुस्तकांतहि मन रमेना. पूर्वी उज्ज्वला सोबतीला असायची. आतां तीहि नव्हती. एक दिवस ती भर दुपारीं बाहेर पडली आणि रखरखीत उन्हांत वेड्यासारखी फिरली. आल्यावर बाबासाहेबांपुढें उभे राहून तिनें सांगितलें, "मी नोकरी करणार आहें."

"नोकरी?"

"होय. मला करमत नाहीं. शिवाय मला पैसा हवा आहे—"

"पैसा कशासाठीं बेटा? कांहीं घ्यायचं आहे का तुला? आत्तां चल माझ्याबरोबर—"

"तुला नोकरी करणं सोसणार नाहीं, बाळा. फुलासारखी वाढलेली तूं—" ममी काळजीनें म्हणाल्या.

"नोकरी करायचीच असेल तर—आपल्या त्या देशपांडेला एक पर्सनल सेक्रेटरी हवी आहे. विचारूं त्याला? You will be the next boss!"

—मग बाबासाहेबच तिच्या वतीनें मोठमोठ्या नोकऱ्यांसाठीं अर्ज लिहूं लागले आणि मिळालेले नकार ऊर्मिलेला कळवूं लागले. शेवटीं ऊर्मिलेच्याच खटपटीनें तिला नोकरी मिळाली.

सर्व्हिस मोटारींत बसून एका खेड्यांत कारकुनी करायला ऊर्मिला चालली होती. मोटारीचा एकसारखा वाजणारा हॉर्न कानावर आदळत होता. खडकाळ रस्त्यावरून मोटार जात असल्यामुळें अंगाला हिसके बसत होते. धुळीचे लोटच्या लोट उठत होते आणि शेजारीं खेटून बसलेल्या एका माणसाच्या विडीचा धूर नाकांत भिनत होता. मागच्या सीटवर बसलेल्या एका बाईनें खांदा हलवून ऊर्मिलेला विचारलें, "कुठं जायचं ग तुला?" पुढच्या सीटवरचा माणूस पचकन् थुंकला. त्याचे कांहीं शिंतोडे ऊर्मिलेच्या अंगावर उडाले.

संध्याकाळच्या वेळीं ऊर्मिला मोटारींतून खालीं उतरली. बाबासाहेबांच्या त्याहि गांवांत ओळखी होत्या. त्यामुळें राहायला जागा मिळण्याची व्यवस्था अगोदरच झाली होती. ऊर्मिला टांग्यांत बसली आणि पत्ता शोधत शोधत आपल्या घराजवळ उतरली. एक बैठें घर आणि त्याच्या मागच्या बाजूला असलेली एक लहानशी खोली. कंदिलाचा मिणमिणता उजेड...ऊर्मिलेनें कसाबसा स्टोव्ह पेटवून भात टाकला आणि तो खाऊन ती झोपली. भोंवतीं कुडकुडाट होता. फक्त कुत्र्याचें भुंकणें कानावर येत होतें. डोळे उघडे ठेवायचे आणि कुट्ट अंधार पाहायचा...एकाएकीं अंधार विरघळला—आणि भगभगीत उजेडाचा एक पट्टा ऊर्मिलेच्या डोळ्यांसमोर नाचूं लागला.

एक आठवड्यानंतर बाबासाहेब आले. म्हणाले, "बेटा, खूषखबर आहे. घर तयार झालं आपलं! येणार ना पाहायला?"

"नाहीं, बाबासाहेब. आणि नव्या घरांतील माझ्या नांवची खोलीहि पाडून टाका. माझी खोली मी इथ बांधली आहे."

ऊर्मिलेच्या भोंवतीं भगभगीत उजेड होता—आणि तो ऊर्मिलेच्या अंगावरील ऑफेलियाचीं सालें सोलून काढत होता.




शपथ पान २६ वरून

मांडलेल्या संसाराची चीड येईल, अधिक आवेगानें मालिनीकडे जातां येईल.

मालिनीकडे तो संधी मिळेल तेव्हां जात होता. कधीं शाळा सुटल्यावर तिला गांठी, अन् मग तिच्याबरोबर भटके, तिच्या बिन्हाडांत जाई. कधीं सकाळचा तिच्या दारांत डोकावे. एकदां रात्रीं सिनेमा सुटल्यावर तो तिच्याकडे गेला.

"काय दचकलें मी. असा रात्रीचा कसा आलास? सगळं ठीक आहे ना?" ती दचकून, घाबरून म्हणाली.

"झोप येईना. म्हटलं तुझं दर्शन घ्यावं—"

"वेडा. जा घरीं नि झोप. स्वप्न पडलं कीं मी येतेच—"

मालिनीनें त्याला खुबीनें वाटेला लावलं. त्याच्या तुटपुंज्या भेटीतच तिचं सुख सामावलं होतं. तुटपुंज्याच—कारण हृषिकेशला ती फार वेळ अडकवून ठेवत नसे. त्याला भान आणून परत संसारांत पाठवून देई. अखेर तो आतां तिचा नव्हता. दोघांच्या मध्यें कायमचा अडसर निर्माण झाला होता. तिच्या मनांत आलं असतं तर कुठल्याहि क्षणीं तिनें तो छिन्नविच्छिन्न करून टाकला असता. पश्चात्तापानें जळणाऱ्या व तिच्या सहवासासाठीं जीव टाकणाऱ्या हृषिकेशला तिनें अम्बिकेपासून कायम तोडला असता व आपल्याजवळ जखडून ठेवला असता. पण तिला तेंच करायचं नव्हतं. अम्बिकेचं निष्ठेनं व्रत पार पाडणं हेंच तिचं कर्तव्य होतं. लग्नबंधनावर, पतिपत्नींच्या शपथांवर तिची श्रद्धा होती. नाईलाज म्हणून, निरुपद्रवी म्हणूनच ती हृषिकेशच्या भेटी घेत होती. त्याला आपल्याकडे येऊं देत होती. आणि योग्य तें अन्तरहि राखत होती.

मालिनीच्या ह्या वागण्यानें हृषिकेश अधिकच उन्मळून जाई. तिचा हात सुद्धां तो धरूं शकत नव्हता. तिच्याशीं सलगीनें बोललं तरी ती विषय बदली. काय करायची नुसती मैत्री? नुसतं भेटायचं, एकमेकांना डोळा भरून पाहायचं, दुःख गिळून टाकायचं व हवापाण्याच्या गोष्टी करायच्या—अम्बिकेच्या तटस्थ वृत्ती-इतकंच मालिनीच्या ह्या कठोर वागण्यानें हृषिकेशला क्लेश होत.

"तूं भोगत असलेला त्रास मला समजतो रे—" अखेर एकदां मालिनी म्हणाली, "पण मी काय करूं? मीच तोल सांवरायला नको का? वाईटपणा अखेर मलाच मिळणार आहे.. अन् ह्यांतून कांहीं मार्ग आहे का—सांग?"

हृषिकेश कांहीं न बोलतां हात चोळीत बसला. मालिनीला एक शंका आली व ती चमत्कारिकपणें म्हणाली,

"घटस्फोटाचं तुझ्या मनांत आलंय?"

हृषिकेश विलक्षण दचकला व जरा जोरानें म्हणाला,

"मालिनी—"

"नाहीं—मी तुला तें सुचवत नाहीं. उलट सांगतें कीं तसं कांहीं मनांत आणूंहि नको. एका स्त्रीला निरोप देऊन दुसरीचा स्वीकार करायचा ही कल्पना मला किळसवाणी वाटते. मला जुन्या मतांची म्हण, पण मी लग्न—संस्थेला, वचनांना फार मानतें हृषिकेश! तूं तुझ्या बायकोचं सांगितलंस तेव्हांपासून फारच! मला तें आवडलं. पहिल्या रात्रीं तूं तिची शपथ पाळशील म्हणून.."

"मालिनी, मी तें सहज सांगितलं तुला. तुझ्यापासून कांहीं लपवणं शक्य नाहीं म्हणून—"

"कबूल. पण तिची निष्ठा नि तुझं त्यासाठी झटणं मला फार आवडलं! त्यांत मोडता नको. आपण तें जपूं. आणि आणि—"

"आणि काय मालिनी? आपलं मीलन खरंच अशक्य आहे?"

"मी वाट पाहीन. तुला सांगूं का—आपण अगदीं जरख म्हातारीं होऊं ना, अन् मग तूं मोकळा होशील, एकटा उरशील, तेव्हां मी खुरडत खुरडत तुझ्याकडे येईन—" मालिनीचा स्वर हुंदक्यांत विरघळला.

रात्रंदिन आम्हां युद्धाचा प्रसंग...!




रंगरुट भरती (RECRUITMENT)

"म्हणजे—?" हृषिकेश अर्धवट उद्गारला.

"कुठें काळजाच्या कोपऱ्यांत एक अशी खुळी कल्पना घर करून आहे . नाहीं रे—मी तुझ्या बायकोचं मरण चिंतून नाहीं. जगूं दे तिला शंभर वर्षं. पण—पण छे! मीच पापी! बहिणीचं मी मरण चिंतलं नि त्यांत मीच अखेर फसलें. पुन्हा..."

ओघळले तेवढे अश्रु मालिनीनें जाऊं दिले. परत तिचे डोळे करारी झाले व मुद्रा शांत दिसूं लागली.

त्याच रात्रीं अम्बिकेला ताप भरला.

प्रथम ताप किरकोळ आहे असं वाटलं. पण तीन दिवस एक डिग्रीहि खालीं येईना तेव्हां हृषिकेश घाबरला. ऑफिसांतून दहा दिवसांची रजा काढून घरीं बसला. सारखी अम्बिकेची शुश्रूषा करूं लागला.

"कशाला एवढी रजा काढलीत? आतां तुम्हाला प्रमोशन मिळायचंय ना!—उगाच साहेब नाराज होईल. दुपारची मी झोपलेलीच असतें. शिवाय शेजारच्या बाई येतात सोबतीला..."

"असूं दे. तुला एकदोन दिवसांत बरं वाटलं कीं आपण बाहेरगांवी जाऊं, आणिकहि रजा वाढवीन हवी तर—"

"किती काळजी करतां माझी—" अम्बिका त्याच्या हातांत हात देत म्हणे. समाधानानें, ग्लानीनें झोपी जाई.

आठवडाभरांत हृषिकेशला मालिनीकडे जायला वेळ झाला नाहीं. अंबिकेचा ताप वाढतच गेला व त्याला घरांत, तिच्या अंथरुणा भोंवतीं अडकून बसावं लागलं. मालिनीकडे जावंसहि तीव्रतेनें वाटलं नाहीं. अंबिकेच्या आजारानें त्याचा रोजचा आयुष्यक्रम विस्कटला होता. ती लवकर बरी झाली कीं मग...पण डॉक्टरनी नवव्या दिवशीं त्याला बाजूला बोलावून आजाराचं गांभीर्य सांगितलं अन् तो अधिकच बावरून गेला. तिच्या जवळून तो क्षणभरहि हालेना. ती क्षीण आवाजांत सारखी म्हणे,

"किती करतां माझं? मला बरं वाटेल आतां. तुम्ही जेवलांत का?"

"हो—शेजारच्या बाईकडें – तुझ्या आई-वडिलांना तार केलीय. आज येतील ते—"

"एवढी कां मी आजारी आहे—"

"छे ग—पण माणसं असावींत जवळ—"

"आई आली कीं तुम्हाला जागरण करूं






उद्यमाने फुलवूं या
भाग्यपंकजाला...



गम्- वूटस्




...ही उक्ती जरी खरी असली, तरी त्याला चाहते, हितचिंतक व गिऱ्हाईक यांच्या सहकार्याची आवश्यकता असते. स्वस्तिक निर्मित स्वरूप केबल्स्, होजेस्, गम्- बूटस् वगैरे रबरी वस्तूंना जनतेकडून पाठिंबा व वाढती मागणी हेंच आमच्या यशाचे कारण. आमच्या यशांत भागीदार असणाऱ्या सर्वांना ही दिवाळी व नूतन वर्ष सुखाचे जावो.

स्वरूप केबल्स्

स्वस्तिक

रबर प्रॉडक्टस्



होजेस्

स्वस्तिक रबर प्रॉडक्टस् लिमिटेड, खडकी, पुणें-३

TOM & BAY/SRP/M-1/62









अनुक्रमणिका

देणार नाहीं मी. मग तुम्ही बाहेर जा. किती दिवसांत क्लबावर गेला नसाल. सिनेमा बघून या... तुमच्या मैत्रिणीकडे जा—"

"वेड्यासारखं बडबडूं नको अंबू. कसली आलीय मैत्रीण ! तूं आधीं बरी हो पाहूं—"

अम्बिकेची आई आली अन् मग हृपिकेशच्या मनावरचा ताण जरा कमी झाला. खरोखरच त्याला वाटलं कीं जरा मोकळ्या हवेंत जावं. मालिनीकडे जावं !—अम्बिकेला थोपटत तो प्रेमानें म्हणाला,

"आई आहे जवळ. मी जरा पाय मोकळे करून येतों..."

"कुठें जातां ! सावकाशीनें या...हवं तर तिच्याकडे जाऊन या..."

तिनें चांगल्या मनानें उच्चारलेले ते शब्द ऐकून हृषिकेश हबालदिल झाला. जडपणें बाहेर पडला. कुठें तरी भटकत राहिला व अखेर मालिनीच्या दाराशीं आला.

मालिनी खिडकीच्या गजांतून बाहेर पाहात होती. जणूं ती त्याचीच वाट पहात होती. हृपिकेश आंत येतांच ती म्हणाली,

"कशी आहे तब्येत त्यांची ?"

"तुला कळलं ?"

"मी तुझ्या ऑफिसांत फोन केला होता. फार आजारी होत्या ?"

"फार आजारी आहे..." हृपिकेश म्हणाला व बाजूच्या टूकेवर बसला. "मालिनी, मला भीति वाटते. ताप हटत नाहीं. कॉम्प्लिकेशन्स वाढत चाललीं आहेत. डॉक्टर कांहीं धड सांगत नाहीत—" हृपिकेशनें मान खालीं घातली व हातांतीं तोंड झांकून घेतलं.

मालिनी त्याच्याजवळ गेली. त्याचे केस मागें सारीत म्हणाली, "धीर नको सोडूं हृपिकेश, खात्रीनें बरं वाटेल त्यांना. तूंच असं केल्यावर कसं होईल ? आणिक स्पेशॅलिस्ट आण. पराकाष्ठा कर. त्या सुधारतील. त्यांचं सगळं व्हायचंय अजून—"

त्याला थोपटीत ती तशीच उभी राहिली. अंबिका बरी व्हावी असं त्याक्षणीं तिला तळमळून वाटलं. जराशानें ती भानावर येत म्हणाली.

"जा आतां तूं इथें यायची घाई करूं नको. मला भेटायलाच हवं असं नाहीं. त्यांच्याकडे जा—"

हृपिकेश घरीं परतला तेव्हां अंबिकेचे वडील आले होते. भाऊ आला होता. हृपिकेशची बहीण आली होती. पाहुण्यांनीं घर भरलं होतं. पाहुण्यांच्याकडें बघतांना व अंबिकेचं करतांना तो अगदींच गळून गेला.

"कशाला बोलावलेत एवढे लोक ? अन् तिच्याकडेच गेलां होतांत तुम्ही !—म्हणजे मी खरंच एवढी आजारी आहें !—मी मरणार ??" अंबिका नवऱ्याला पाहातांच उठून बसूं लागली व मोठ्यानें म्हणाली.

हृपिकेशनें तिला सांवरलं. परत निजवीत म्हटलं, "असं काय अंबू ! अग स्वैंपाक करायला, जागायला हवं ना कुणी ? पत्रं टाकल्यावर सगळीं येतील असं वाटलं नव्हतं—तूं पड पाहूं स्वस्थ—"

"खोटं—" अम्बिका गळा काढीत म्हणाली "तुम्ही तिच्याकडे जातां—अन् मी आतां जाणार म्हणून सगळे जमले आहेत हे..."

हृपिकेश भकासपणें तिच्याकडे बघूं लागला. इतका काळ शांतपणें सहन करणारी, समंजस अम्बिका एकदम भ्रम झाल्यासारखी बोलूं लागली. हिला कसं आवरायचं, कसं समजवायचं...

त्या क्षणापासून अम्बिकेची प्रकृति झपाट्यानें खालावत गेली. आपण जाणार हेंच तिच्या मनानें घेतलं. सगळ्या माणसांवरून, वस्तूवरून ती ओढाळपणें पाहूं लागली. नवऱ्याला सारखी जवळ बसवून ठेवूं लागली. 'मला मरायचं नाही, मला वांचवा—' म्हणून डॉक्टरांच्या जवळ रडूं लागली.

हृपिकेशला हें सगळं असह्य झालं. अम्बिका झपाट्यानें मृत्यूच्या मार्गाकडे जात आहे हें त्याला उमगलं होतं. दुःखानें तो दिङ्मूढ होत होता. आणि त्यांतच तिला असे झटके येत होते. कसं सगळं सहन करायचं ! एकदां हें सगळं संपलं तर बरं !—आणि मग तो अम्बिकेच्या मृत्यूचीं चित्रं रेखाटूं लागे. विधुरावस्था ! मग मालिनीशीं...मालिनी किती तरी दिवसांत भेटली नव्हती. आतां तिच्या कायम भेटीची शक्यता उत्पन्न झाली होती. केवढं विलक्षण घडणार होतं ! शरमेचं, भयंकर —पण अम्बिकेच्या मृत्युशय्येशीं बसून हृपिकेश मालिनीच्या मीलनाचीं स्वप्नं पाहात होता...

...त्यांतच एका अपरात्रीं अम्बिकेनें त्याला हाक मारली. जवळ बोलावलं व सगळं बळ लावून म्हटलं,

"मी तर जाणार आजउद्यां...माझ्यामागें तुमची काळजी..."

"हें काय भलतंच अंबू ? तुला लवकर बरं वाटेल..."

"मी गेलें कीं तुम्ही दुसरं लग्न केलं पाहिजे—"

"असं बोलूं नको अंबू—" तो सगळं विसरून विलक्षण कारुण्यानें म्हणाला. ती जाणार ही कल्पना अत्यंत असह्य होती.

त्याच्या मांडीशीं तिनें आपलं तोंड नेलं. पुन्हां बळ लावलं व म्हटलं,

"माझं एक मागणं आहे. मला वचन द्या—"

"हें काय बरं असं ! तूं झोप ना स्वस्थ—"



"इदय ऽ ऽ तुमची इमर्जन्सी कमीशनसाठीं निवड झाली आहे ना ?"







अनुक्रमणिका

"वचन द्या. पहिल्या भेटींत मी वचन मागितलं—"

"मग मी तें पाळलं. आजतागायत पाळलं—" तिला पटावं म्हणून तो बजावून म्हणाला.

"ह्या शेवटच्या भेटींत एक मागणं मागतें. तेंहि पाळा. शपथ आहे माझी—"

हृषिकेश न बोलतां काकुळतीनें बघत होता. जणुं विचारीत होता कीं कसलं वचन? मी पाळीन. शपथ घेईन.

"तुम्ही लग्न करा...माझी आठवण काढीत बसूं नका. दुसरा संसार थाटा. लग्न करा, पण हृषिकेश—त्या, त्या बाईशीं करूं नका! दुसऱ्या कुणाशींहि करा, पण मालिनीशीं नको. माझी शपथ आहे—"

हृषिकेश दचकून दूर झाला. अंबिकेची मान कलंडली, पण तो पुढें झाला नाहीं. त्याचं डोकं भ्रमूं लागलं. काय भयंकर विकृति! दुरावा. सूड. ही सरळ, सगळं सोसणारी मुलगी असं कां बोलली? तिच्या मनांत मालिनीबद्दल विखार सांचत होता काय? हें काय मागून बसली ही?—

कांहीं तरी वाजलं म्हणून अम्बिकेची आई धावत आली. भाऊ आला. हृषिकेशची बहीण आली. हृषिकेश दूर झाला व गॅलरींत गेला. सगळेपण अम्बिकेजवळ गेले. व्याकुळतेनें विचारूं लागले,

"काय झालं?"

"नाही...मी त्यांना म्हटलं, माझ्यामागें लग्न करा...तेवढंच एक..." विलक्षण थकवा येऊन अम्बिका म्हणाली व मेल्यासारखी पडून राहिली.

उजाडतांच तिचं निधन झालं.

तीन खोल्यांच्या त्या टुमदार बिऱ्हाडांत एकटं राहायची हृषिकेशला हळूहळू संवय होऊं लागली. सुतक संपलं, पाहुणे गेले, तो कामावर जाऊं लागला—रोज़चं रहाटगाडगं सुरू झालं, ऑफिसच्या कामांत दिवस ढकलला जाई, पण घरीं आलं कीं भडभडून येई. स्वैपाकघरांतलं पितळी पिंप अम्बिकेचा हात न फिरल्यानें काळवंडलं होतं. तिच्या आवडीचं कपबश्यांचं खुंटाळं कसंतरीच दिसत होतं. भिंतीवरचीं कागदी फुलं कोमजल्यासारखीं झालीं होतीं. अन् एकटा पलंग!—अम्बिका आयुष्यांत आली काय, तीन वर्षं संसार थाटून व जीव लावून गेली काय, जातांना कसली विचित्र शपथ घालून...

पिंडाला कावळा शिवेना तेव्हां त्यसचा मेहुणा म्हणाला होता, "अंबूची अखेरची इच्छा होती—तुम्ही दुसरं लग्न करावं म्हणून. जातांना तेंच म्हणाली ती. तुम्ही सांगा—लग्न करीन...ऐका आमचं. उठा..." वेदनेनें कासावीस झालेल्या हृषिकेशला त्यावेळीं सग-ळ्याचाच वीट आला. सगळं हास्यास्पद वाटूं लागलं. आपल्या आयुष्याचे असे धिंडवडे कां व्हावेत, कळेना त्याला. तीन वर्षे सुखा-समाधानांत काढून अखेर अम्बिका अशी विकृत कां वागली? आपण चालल्यों, आपल्या मागें ह्यानीं आपल्याला विसरूं नये, जन्मभर जळत राहावं असं तिला वाटलं...चार लेकांच्या समाधानासाठीं त्यानें तिच्या आत्म्याला अभिवचन दिलं. कावळ्यानें झडप घालून त्याच्या काळजाचाच जणुं लचका तोडला.

आणि मग तो एकटाच तळमळत राहिला. अम्बिकेला विसरायचा यत्न करीत. तिच्या शपथेचा फोलपणा स्वतःला पटवीत. मालिनीला कधीं भेटणं बरं दिसेल हें ठरवीत. उरलेलं











मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास



आयुष्य तिच्यासह कसं घालवायचं ह्याचीं चित्रं पाहात. आतां त्यांच्या प्रेमांत कुणीच आड येऊं शकणार नव्हतं. त्याची बायको नाहीं, तिची बहीण नाहीं—दुखवट्याचे कांहीं दिवस जाऊं द्यायचे व मग...

एक दिवस ऑफिसांतून येतांना मालिनीनेंच त्याला गांठलं. त्याचं लक्ष नव्हतं म्हणून हांक मारून थांबवलं.

"कुठें लक्ष होतं? चार हांका मारल्या. घरीं चाललास? मी येऊं?"

तो तिच्याकडे बघतच राहिला. तिचा नेहमींचा अवतार बदलला होता. एखाद्या जोगिणीसारखी ती राहात असे. हाताकानांत कांहीं घालीत नसे. पातळहि सदा पांढरं. पण आतां डाव्या हातांत कोपरभर बांगड्या, कानांत टॉप्स, भांगेत पिंजर नि अंगावर निळी, नायलॉनची साडी! ती जरा लठ्ठहि वाटत होती. लाघटहि.

अशी पूर्ण उमललेली मालिनी त्यानें पूर्वी बघितली नव्हती. मामाकडे राहात असे तेव्हां सदा ओढग्रत दिसे. हल्लीं तर ती संतीणच बनली होती. आतां उत्साहानें निथळणाऱ्या आपल्या प्रेयसीकडे बघून तो म्हणाला,

"कोपऱ्यावरच्या होटेलांत चहा घेऊं. चल—"

कुणाच्या घरीं जायचं? तिच्या—कीं त्याच्या? दोन्ही घरं आतां एक होणार होतीं. त्या आधीं होटेलांतच भेटलेलं बरं! स्पेशल रूममध्यें ती समोर न बसतां त्याच्या शेजारीं बसली व म्हणाली,

"फार वाईट झालं. खरंच—फार वाईट झालं...मी असं म्हटलं तर..."

"इट्स् ऑल राईट..." चहाचा घोट घेत तो म्हणाला.

चहा संपेपर्यंत कुणीच बोललं नाहीं. कांहीं बोलणं विचारणं इतकं विचित्र होतं. एकमेकां शेजारीं बसणंहि आज अवघड वाटत होतं.

मालिनी एकदम म्हणाली,

"हृषिकेश, मी महिन्याची रजा घेऊन बाहेरगांवीं जाणार आहे."

त्यानें दचकून तिच्याकडे पाहिलं.

"तुला राग येईल—पण खरं सांगायचं तर मला आतां एक क्षणभरहि तुझ्यापासून दूर राहावत नाहीं. तुझ्या बायकोचं शपथ मी वाईट चिंतलं नाहीं. ती असतांना मी बाजूला राहिलें. पण ती आतां गेली. आतां तुझ्या माझ्यांत कांहीं अडसर नाहीं. आतां लगेच आपण एकत्र राहिलों, लग्न केलं तर वाईट दिसेल म्हणून मी—"

"वाईट दिसणार नाहीं—" हृषिकेश आवेगानें बोलून गेला व गप्प झाला. त्याला वाटलं मालिनी पुढें बोलेल. म्हणेल, महिन्या दोन महिन्यानें मी तुलाच तिकडे बोलवीन. आपण मुहूर्त ठरवूं—पण ती गप्प पाहून तो म्हणाला,

"अंबूला जाऊन दोन महिने झाले. तिच्या वडिलांचं काल पत्र आलंय. मी पुन्हा लग्न करावं असं त्यांनीं मोठ्या मनानें सुचवलंय. आपण लगेच लग्न केलं तरी लोक कांहीं म्हणणार नाहींत. खरं म्हणजे, सगळे तसं आतां म्हणतातच आहेत. अन् लोक कोण?..."

हृषिकेशच असं बोलल्यावर मालिनीला हर्ष झाला. आनंदाचीं आसवं तिच्या डोळ्यांत जमलीं व तिनें त्याच्या खांद्यावर मान टेकली.

"हृषिकेश, माझी फार फार हौस आहे रे संसार करायची. मी मामांशीं भांडलें, बहिणी-साठीं जीव पाखडला, इथें एकटी राहिलें—पण खरं म्हटलंस तर माझी वृत्ति कुणावर तरी विश्वास टाकावा, त्याच्या आत्म्याशीं संवाद करावा, एकमेकांच्या..." तिला भावनावेगानें बोलतां येईना व त्यानें तिला थोपटल्यावर तिला वाटलं, शब्द, विचार सारं संपलं!

दुसऱ्या दिवशीं ती उजाडतांच त्याच्या दाराशीं आली. स्टोव्हशीं तो खटपट करीत होता व ती दारावर टिचकी वाजवीत होती. अंबिका गेल्यापासून प्रथमच तो घरीं चहा करायला सरसावला होता. कुठलंसं गाणं गुणगुणत होता. ही अल्पकालीन विधुरावस्था संपून मालिनी लवकर येईल तर बरं असं वाटत होतं. अन् तोंच ती त्याच्या पुढ्यांत हजर झाली.

"ये-ये—" दार उघडीत तो म्हणाला, "तुझीच आठवण काढीत होतों. हा स्टोव्ह बघ..."

"केवढं गद्य बोललास. मला वाटलं म्हणशील चहा इतका फक्कड झालाय म्हणून..." ती वाक्य अर्धवट टाकून स्टोव्ह पेटवूं लागली. पांच मिनिटांत तिनें चहा बनवला व त्याला दिला.

"खरंच फक्कड चहा झालाय..."

भावनातिरेकानें तिला चहा संपवतां येईना. अर्धा कप तसाच ठेवून ती म्हणाली,

दी. २१/२२








"आज प्रथम मी तुझ्या घरीं आलें... आठवतं...? तुझ्या खोलीवर एकदां मी अशीच अकाळची आलें होतें—"

"शेवटची. तेव्हां तुला मी किती समजावलं कीं मला नोकरी मिळालीय, आपण पळून जाऊन लग्न करूं. पण तूं बहिणीचं कारण सांगून वाद घातलास नि—"

"जाऊं दे रे! आजहि मी शेवटची आलेंय. आतां कसली सबबहि नाहीं नि पळून जायचं कारणहि नाहीं. मी इथेंच राहाणार आहें. कायमची—"

"अर्थात्! आजपासून?"

"नाहीं—नाहीं. आपण विधिपूर्वक लग्न करायचं. होम, सप्तपदी—सारं! मी तें सारं फार मानतें हृषिकेश—"

"मग आपल्याला मुहूर्त ठरवायला हवा. सगळं सावकाशीनें घ्यायला हवं...येतेस—बाहेर बसूं—"

दोघं बाहेरच्या खोलींत आलीं. हृषिकेश पलंगावर टेकला व मालिनी खुर्चीवर बसण्या-ऐवजीं खोलीभर हिंडूं लागली.

हृषिकेश तिच्याकडे आसासून बघूं लागला अंबिकेच्या संसाराचं एक स्वप्न पडून गेलं एवढंच! खरं म्हणजे मालिनीवरच त्याची प्रीति होती; इतक्या आडवळणानें ती आतां त्याची होणार होती. उत्कट, निग्रही, एखाद्या मूल्यासाठीं अटीतटीनें जीव पाखडणारी! त्याला एकदम अंबिकेची आठवण झाली व हसूं आलं. किती अडचणी, कसली विकृति...

टेबलावरच्या अंबिकेच्या फोटोकडे टक लावून पाहात उभी असलेली मालिनी दचकली. वळून म्हणाली,

"कां हंसलास?"

"सगळ्याचंच आतां हंसूं येतं. तुझ्या मामाचं, बहिणीचं, माझं, अंबूचं...तुला कल्पना आहे मालिनी, माणसं मरतांना काय विचित्र वागतात. अंबू आजारांत अगदीं शांत, समजूतदार होती. पण शेवटीं तिला भ्रम झाला. खाण्यासाठीं, भटकण्यासाठीं, जगण्यासाठीं ती आरडा करूं लागली. त्यांतच मला अखेरच्या दिवशीं काय म्हणाली ठाऊक आहे?"

"का...य?" मालिनी हातांतला अम्बिकेचा फोटो खालीं टाकीत घोगऱ्या स्वरांत म्हणाली, .

"इतकं बालीश!—म्हणाली, मी मेल्यावर दुसरं लग्न करा—पण, पण मालिनीशीं करूं नका...! म्हणे, शेवटचं माझं मागणं आहे... अग, घाटावर पिंड ठेवले तर कावळा शिवेना. तिचा आत्मा म्हणे घुटमळला माझ्या शपथे-साठीं...काय एकेक कल्पना..." हृषिकेष मोठ्यानें हंसला नि शेजारची उशी कुस्करूं लागला.

मालिनीचं शरीर पाहतां पाहतां ताठर झालं. तिच्या डोक्यांत कळ येऊं लागली व डोळ्यांत विचित्र भाव दाटले. काय भयंकर ऐकत होती ती! नुकतीच कुठें तिला सुखाची सावली दिसत होती. तिचं प्रेम, तिचीं स्वप्नं—सगळं साकार होणार होतं. नियतीनें सगळा पट फिरवून तिच्या पदरीं सुखाचं दान टाकलं होतं. केवढ्या आनंदांत ती होती! अम्बिकेचा अडसर हा मामुली अपघात समजत होती. पण अम्बिका जातांना केवढी अडवणूक करून गेली होती. आणि हृषिकेश सारं किती क्षुल्लक-पणानें सांगत होता.

हृषिकेश एकदम चमकून उठला. मालिनीला मिठींत घेत म्हणाला, "काय झालं ग?—बस इथें पलंगावर—"

त्याच्यापासून सोडवून घेत ती मागें सरली. भकासपणें म्हणाली,

"—अन् हें सारं तूं मला हंसत, क्षुल्लक-पणें सांगतो आहेस हृषिकेश! मरतांना तूं तिला शब्द दिला आहेस. पहिल्या एकांतांत तुझ्या शपथेवर तिनें संसाराची वाटचाल केली. अन् आतां तुझा शब्द मानून तिचा आत्मा उरला मार्ग जाईल—ती तुझी पत्नी होती हृषिकेश! पत्नीला मोलाच्या क्षणीं दिलेलं वचन! आणि आतां मी तुझी पत्नी होणार! बायकोनें घातलेली शपथ तूं मोडूं शकतोस...उद्यां आपलं लग्न झाल्यावर...नको हृषिकेश..."

ती थांबली. त्याच्याकडे न बघतां वळली. त्या घरांतून सावकाश बाहेर पडली. एखादी सांवली लांब लांब होत नाहींशी व्हावी तशीं बराच वेळ स्पष्ट दिसत ती अखेर अन्तर्धान पावली.










**आला क्षण गेला क्षण** (पान ११ वरून)

म्हणजे हे कुणाचंहि होईल. केव्हांहि होईल. गेला तो क्षण आपला, पुढचा क्षण आपला नव्हे. तेंच तर हें घड्याळ सांगत आहे, "आला क्षण—गेला क्षण!" अरे आयुष्य संपत आहे. वाढत नाही, संपत आहे. प्रतिवर्षी वाढदिवस कसले साजरे करतां? रडा वाढदिवसाच्या दिवशी! एक पाऊल मृत्यु तुमच्या जवळ आला, मृत्यूच्या तुम्ही जवळ गेलांत. त्या दिवशीं गोडधोड कसलं खातां? नवे कपडे कसले घालतां?

वाढदिवसासाठीं केला असेल का हो ह्यानं हा नवा कोट? जरा पांचव्या मजल्याकडे पहा हो शास्त्रीबुवा. हा सोकाजी खालीं नव्या कोटाचीं स्वप्नं पहात उभा आहे. वर भली मोठी तुळशीची कुंडी झुलते आहे. एक पोर तिला झोके देत आहे. जर का ती कुंडी कोसळली तर मग काय होईल ह्याचं? शास्त्रीबुवा, थांबा. मी त्याला सावध करतों. खुशाल आपला त्या शिंप्याशीं बोलत उभा आहे. आणि वर अंतराळांत कुंडी झुलते आहे. ती कुंडी विजेसारखी खाडकन् पडेल ह्याच्या डोक्यांत. बिचाऱ्याला बायकापोरं असतील हो शास्त्रीबुवा! आईबाप असतील. हा जर असा अपघाती मेला—आणि मग तो नवा कोट घरीं आला...कुंडी झुलते आहे, घड्याळ बोलतें आहे—लंबक डोलतो आहे—काळ म्हणतो आहे—"आला क्षण—गेला क्षण!...आला क्षण-गेला क्षण!"

घड्याळाकडे पाहतां आहांत शास्त्रीबुवा?

मी घरीं जाऊं म्हणतां? कां? आमची ही घरीं एकटी आहे म्हणून? कीं तुम्हांला घरीं जायची घाई झाली आहे म्हणून? खरं सांगा शास्त्रीबुवा, पुन्हा घड्याळाकडे पाहिलंत. किती सहज पाहतां तुम्ही लोक घड्याळाकडे? घड्याळाकडे पाहतां, पण घड्याळ काय म्हणतं तें ऐकत नाहीं. माझ्याहि बोलण्याचा तुम्हांला कंटाळा येतो. ठीक आहे! जा तर मग! घरीं माणसं वाट पहात असतील म्हणतां? बरं जा जा! तुमच्या वाटेवर ती एक मोठी कललेली भिंत आहे! हो, त्या जुनाट घराची भिंत! त्या भिंतीखालून शेंकडो माणसं प्रतिदिवशीं निःशंकपणानें जात-येत असतात. ती भिंत कुणाच्या कर्मांत केव्हां कोसळणार आहे, देव जाणे! पण केव्हां तरी ती कोसळणार! केव्हांहि कोसळणार! म्हणून म्हटलं घराकडे जरा जपून जा.

--थांबा-थांबा-शास्त्रीबुवा! तुमच्या हातांत पुडा कसला आहे?—बर्फी? हां-हां! तुमच्या मुलाला मुलगी झाली म्हणतां? म्हणजे तुम्हांला नात झाली! तुमची सून आमच्या हिला म्हणत होती कीं, मुलगी झाली तर तिला ती डॉक्टरीण करणार! तिला स्वतःला डॉक्टर होतां आलं नाहीं म्हणून मुलीला ती डॉक्टरीण करणार! कल्पना छान आहे. डॉक्टर माणसांना वांचवतो. मरणाशीं लढतो. पण मरणाशीं लढणारे डॉक्टर स्वतःच आजारी पडतात आणि शेवटीं मरतात. खरं कीं नाहीं? डॉक्टर चिरंजीव झाल्याचं तुम्ही कुठें ऐकलं आहे? त्यांचेहि दिवस क्षणाक्षणानं भरतच असतात. पण येवढा विचार करतो कोण? तुमची सून आपल्या मुलीला डॉक्टर करणार. किती वर्षे लागतील ह्या गोष्टीला? पंचवीस तर खरीं? आत्तां कुठें तुमची ही नात भुईतून वर उगवते आहे. पोरं भारी अचपळ असतात. वाटेल ती वस्तू तोंडांत घालतात. वाटेल ती वस्तू उचलतात. एकदां एका रांगत्या मुलीनं विंचू उचलला. एका लहान मुलानं उंदरांसाठीं ठेवलेला विषारी खवा तोंडांत टाकला. एक चार वर्षांची पोर तर बापडी घरांतल्या हौदांत बुडून मेली. अगदीं घरांतल्या हौदांत बरं का! तिचे आई-बाप दुपारचे अंमळ लवंडले होते. आणि आईबाप इतक्या जवळ असतांना ती पोर हौदांत तडफडून मेली. काय आकांत झाला असेल त्या आई-बापांच्या जिवाचा!

—तोंड फिरवलंत शास्त्रीबुवा?

—नाहीं-नाहीं! तुम्हांला दुःख द्यावं म्हणून मी हें बोललों नाहीं! सावध करावं म्हणून बोललों. अहो, मी पोळलेला मनुष्य आहें शास्त्रीबुवा. हीं लहान पोरं पाहिलीं कीं माझा जीव कासावीस होतो. कसं जपायचं आपण त्यांना? किती जपायचं? मृत्यु बघा त्यांना टिपायला जागोजाग एखाद्या मारेकऱ्यासारखा उभा असतो. कसल्या योजना करायच्या आपण? मी सुद्धां आमच्या नानूसाटीं पुष्कळ योजलं होतं. तुमची सून तुमच्या नातीसाठीं योजना करते आहे; पण सांगता करणारे आपण कोण?

– पुन्हा घड्याळाकडे पाहिलंत शास्त्रीबुवा!...जातां– जातों–मी घरीं जातों! पण त्या अशोकचं काय झालं असेल हो!...सुखरूप पोहोंचला असेल ना तो घरीं?...

– हो – हो! पाहिलं मी शास्त्रीबुवा! तो आमचा घरगडी इकडे धांवत येतो आहे–नंदू! आमच्या हिनं पाठवला असेल त्याला मला शोधायला! एखाद्या लहान मुलासारखी ती मला जपत असते बघा! तेवढ्यासाठींच ती जिवंत राहिली आहे. मला जपायला. पण मला जपायची आवश्यकता काय आहे शास्त्रीबुवा? मी तर घड्याळाकडे पहात बसलों आहें. माझं बोचकं बांधलेलंच आहे. ठोका पडला कीं चाललों. पुन्हा घड्याळाकडे पाहिलंत शास्त्रीबुवा? – बरं जा – जा!








जपून जा! याल उद्या घरीं? पहा, प्रयत्न करा. उद्यांचं कुणी पाहिलं आहे? जपून जा शास्त्रीबुवा!

–नंदू! आधीं घराकडे पळ तूं! माझ्यामागें धडपडत यायला तुला कुणी सांगितलं होतं? मला ठाऊक आहे तिनं तुला पाठवलं तें. पण तिला एकटीला टाकून तूं आलास कां? आतां आधीं घरीं जा पाहूं! मी येतों तुझ्या मागोमाग. पहातोस काय माझ्याकडे? जा म्हटलं म्हणजे जा! परत आल्यावर मी सांगीन तिला मीच तुला पाठवलं म्हणून. माझी कांहीं काळजी नको तुला. मला काय धाड भरली आहे? असूं दे अंधेर, येईन हळूहळू मी घरीं परत. आणखी मेलों तर मेलों! पण तूं जा पाहूं आधीं इथून! चल पळ, हा येतोंच आहें मी तुझ्या पाठोपाठ... नाहीं–कोणी तुला त्रोल लावत नाहीं, असूं दे असला तर अंधेर. असूं दे गर्दी. कांहीं एवढ्या गर्दीत मरत नाहीं मी. सांग तिला मी येतोंच आहें म्हणून. एक शब्द बोलूं नकोस आतां. किती बडबड करशील? जा पाहूं तूं! चल जा! हा निघालोंच मी. हो–हो–जपून येतों. तूं काळं कर आधीं.

–नमस्कार, नमस्कार दामूअण्णा! हो, घाईत आहें जरा, घराकडेच चाललों आहें. ती घरीं एकटी आहे. अहो, आम्ही घरांत दोनच दोन माणसं. तिसरा आमचा नंद्या. मी घरीं नसलों कीं तिचा जीव घाबरा होतो. असं आहे हें म्हातारपणचं प्रेम. नाहीं–नाहीं–चहा वगैरे कांहीं नको आतां. उगाच तुम्ही दिसलांत म्हणून थांबलों.—पत्रिका ना?–कसली पत्रिका म्हणतां? मुलाच्या मुंजीची? हो हो! मिळाली मला वाटतं. पर्वां मुंज आहे म्हणतां? पर्वां?–हो–हो–येईन कीं! येईन असं म्हणणं जिवावर येतं, पण म्हणतों झालं येईन! जिवावर कां येतं?–अहो, तें घड्याळ काय म्हणतें आहे ऐकलंत का? "आला क्षण–गेला क्षण!—आला क्षण—आला क्षण!" ते सारं ठाऊक आहे म्हणतां तुम्हांला? बरं बरं! ठाऊक असलं म्हणजे पुष्कळ झालं. मुलगा कुठं आहे तुमचा? थोरला मुलगा नव्हे, हा मुंजीचा मुलगा—दत्तू! इथेंच होता इतक्यांत? इथेंच होता? मग आतां कुठें गेला?—धांवा–धांवा–दामूअण्णा, तो तुमचा दत्तू खांबावर चढत आहे—तारेच्या खांबावर! जवळ विजेनं रसरसलेली तार आहे! तारेला अडकलेला पतंग ओढायला तो बघतो आहे! अहो दामूअण्णा! असे "आ" वासून नुसते बघतां काय? विजेचा धक्का बसून हातचं जाईल ना पोर! राम–राम–राम! वीज काय, विस्तव काय, पाणी काय, टांचणी काय! किती रूपं आहेत हो ह्या मरणाचीं? कुठेंहि जा, मृत्यु आपला आहेच! उतरवा त्या पोराला खालीं! पर्वां मुंज आहे ना त्याची!... दत्तू! अरे बाळ, उतर त्या खांबावरून खालीं!

असे हिरमुसले कां हो झालांत दामूअण्णा? माझं बोलणं कडू लागलं तुम्हांला? कांहीं बरं–वाईट झालं पोराचं तर तें गोड वाटेल का? बरं! देव सांभाळणारा आहे! आनंद आहे! पण देव पुष्कळदां सांभाळत नाहीं माणसांना दामूअण्णा! जाऊं द्या! सांगून समजण्याच्या नाहींत ह्या गोष्टी. येतों मी. नमस्कार!

—कोण, कुसुम का तूं? रागावूं नकोस अं, लांबून ओळखलं नाहीं मी तुला. आजकाल डोळ्यांनीं नीटसं दिसत नाहीं पोरी. स्वच्छ दिसतो नुसता परलोक! केव्हांपासून मला तेवढंच काय दिसतं आहे. तें मी असं काय बोलतों म्हणतेस? अग मी नाहीं, घड्याळ बोलत आहे हें. तुझं तें इवलंसं मनगटी घड्याळ जरा लावून तर पहा कानाला! अग, त्या सुंदर सोनेरी घड्याळाचेसुद्धां बोल तेच आहेत! "आला क्षण–गेला क्षण!"... बरं, नाहीं मी बोलत त्या विषयावर तुला आवडत नाहीं तर! रागावूं नकोस! मी मात्र तुझ्यावर रागावलेलों आहें बरं का कुसुम! किती दिवसांत तूं आमच्याकडे फिरकली नाहींस. एम्. ए. झालीस म्हणून मान आला होय? अग पण तुम्ही पोरें कितीहि मोठीं झालांत तरी आम्हांला लहानच वाटणार! तुमच्यासारखीं मुलं-बाळं घरीं आलीं म्हणजे तेवढंच आम्हांला बरं वाटतं. ही तर सारखी डोळे लावून बसलेली असते बघ तुझ्या वाटेकडे. आमच्या नानाबरोबर खेळलेली ना तूं? मग एवढी विसरलीस आम्हांला? परीक्षेची गडबड असली म्हणून काय झालं? क्षणभर डोकावून जावें. आत्तांच घरीं जाऊन आलीस म्हणतेस? शिरा करून घातला होय तिनं तुला! अग घालायलाच पाहिजे. तुम्हां पोरांना वडील माणसांनीं खायला–प्यायला द्यायचं नाहीं तर कुणी द्यायचं? हिला तर कुणा










वरी पोराला खायला दिल्याविना जेवणच जात नाहीं! काय म्हणालीस कुसुम, ही माझी जेवणासाठीं वाट पाहते आहे? सगळा स्वयंपाक आटपून काळजी करीत बसली आहे?–जातों–जातों कुसुम, हा मी घराकडेच जातों. काळजी करूं नकोस! तूं जा आपली मी सरळ घरीं जातों.–थांब–थांब कुसुम! मला सांग, ह्यावेळीं इतक्या घाईत तूं कुठें निघाली आहेस? तार करायला जाते आहेस? आणि ह्या रात्रीच्या वेळीं? कां ग, कांहीं विशेष? दिल्लीला नोकरीच्या संबंधांत तुला एकदम जायला पाहिजे होय? म्हणून तार करायला निघाली आहेस? ह्यावेळीं तार म्हणजे तुला मुख्य टपालांत जायला पाहिजे! तिकडेच जाते आहेस होय?–बरं-बरं! पण हें पहा कुसुम, तिथें खूप मोठी हिरवळ आहे. पुष्कळशीं फुलझाडं आहेत. तूं आहेस फुलवेडी. दिसलं झाड कीं घाल त्याला हात, ही तुझी लहानपणापासून संवय आहे. म्हणून म्हणतों-एकदम एखाद्या झाडाला हात लावूं नकोस. गवतांतून चालूं नकोस. अंधेराची वेळ आहे. कांहीं विंचू-कांटा, जीव-जिवाणू! वेळ कुणाला सांगून येत नाहीं. हंसूं नकोस. पोस्ट मास्तरांचे वडील असेच साप चावून गेले. आळ्यावरून धप्पकन् अगदीं त्यांच्या बिछान्यावर साप पडला. वर्ष लोटलं नाहीं अजून ह्या गोष्टीला. ह्या देशांत साप चावून किती किती माणसं मरतात तें तुला ठाऊक आहे का कुसुम? अग रानांतच कशाला जायला पाहिजे त्याच्यासाठीं? मृत्यूला कुठलीहि जागा वर्ज्य नाहीं, समजलीस? डोंगर, रान, नद्या, तळीं, आगगाडी, आगगाड्या आणि गांवांतलीं घरसुद्धां. प्रत्येक ठिकाणीं मृत्यूची वसती आपली आहेच. तूंसुद्धां घड्याळाकडे पाहूं लागलीस कुसुम?–बरं जा तूं टपालांत जा!–त्या मोठ्या टपालांतल्या मनोऱ्यावर केवढं थोरलं घड्याळ आहे. कसे पण्ण–पण्ण–त्याचे टोले पडतात. ओरडून ओरडून तें जसं कांहीं सांगतं—"आला क्षण––गेला क्षण!" बरं–बरं-बरं! जातों.—मी सरळ घरींच जातों; एकटी आहे ना घरीं? तूं मात्र जपून जा हो कुसुम! अंधाराची एकटी जाते आहेस. हो–हो–हा बघ निघालोंच मी. तूं कशाला येतेस? हांकेच्या अंतरावर तर घर आहे. हा बघ मी निघालों.

काय म्हणतां कुसाआजी? मी ना? घराकडे निघालों. घ–रा–क–डे–नि–घा–लों—आलं ऐकूं? अलीकडे तुम्हांला आणखीच कमी ऐकूं येऊं लागलं आहे का हो आजी? किती, ब्यांयशी वर्षे झालीं म्हणतां का पूर्ण? अरे वा:! आनंद आहे. पण आजी, समोरच्या वाटेवरचं तें "मॅनहोल" उघडं आहे बरं का? "मॅनहोल" म्हणजे तें खालच्या गटाराचं मोठं थोरलं तोंड! ते उघडं आहे म्हटलं! जाल सरळ नाहींतर त्यांत! असूं द्यात डोळे चांगले, पण आपलं सांगून ठेवतों. काय जागोजाग एकेक व्यवस्था आहेत माणसाला मारायच्या! मरणाला तुम्ही नाहीं भीत हो आजी आणि मीसुद्धां नाहीं भीत! पण मी म्हणतों मरून मरायचं तें गटारांत गुदमरून कां? हां–हां! खरं आहे आजी! तें कांहींच आपल्या हातीं नाहीं. हें मला तुम्ही सांगायला का पाहिजे कुठं आजी? बरं पण, तुम्ही कुठें निघालांत? ह्या वेळीं? देवदर्शनाला! असं! हां मी सोडलं आहे केव्हांच देवळांत जाणं! आतां काय मागायचं आहे देवाजवळ? मी चाललों आहें घराकडे. लवकर जाऊं म्हणतां? कां हो? कुणी मंडळी गेली माझी चवकशी करीत? कोण बुवा? असतील-असतील, पाहुणे सुद्धां असतील. म्हणजे पुन्हा त्यांच्यासाठीं रांधावं लागेल हिला. ही आनंदानं रांधेल हो, पण माझ्यानं नाहीं हो तिचे कष्ट पहावत. बरं, जातों मी आजी, पाहतों कोण आलं आहे तें.

नंदू, तूं कशाला येऊन धडपडलास बाहेर? पुन्हा कशाला मला शोधायला निघालास? हा काय घरीं येतोंच आहें मी. आणि काय रे,










आपल्या घरी कोण आलं आहे? बोल ना, कोण मंडळी आली आहेत आपल्याकडे? अरे बोल-बोल-उत्तर दे! वाचा बसली कीं काय तुझी! काय आहे काय भानगड? नंद्या, बोलतोस कीं नाहींस! बोलतोस कीं नाहींस नंद्या? ही काय चेष्टा चालली आहे! ही कोण मंडळी चालली आहेत आपल्या घराकडे?—आणि तूं कां म्हणून घर सोडून बाहेर निघालास? तिला एकटं सोडून यायचं नाहीं म्हणून मी तुला सांगितलं होतं ना! मग कां म्हणून तूं तिला एकटीला टाकलंस? बोलतोस कीं नाहींस नंद्या? बोलतोस कीं नाहींस! अरे तूं असा घुम्यासारखा नुसता उभा कां? माझ्या प्रश्नाचं उत्तर दे. नुसता भुईकडे काय बघत बसलास? जरा तोंड उघड कीं! आतां डोकं फोडूं का मी तुझ्यासमोर? कीं तुझं डोकं फोडूं?—हं-बोल-बोल! तूं काय म्हणत होतास?——बाईसाहेब-बाईसाहेब-पुढें बोल? अरे बोल ना पुढें? स्वयंपाक करून ठेवला आहे ना तिनं? माझी वाट पहात बसली आहे ना ती? शिरा केला होता ना तिनं कुसुमसाठीं? कुसुम आतांच तिला भेटून गेली ना? अरे नुसती मान काय हलवतोस शुंभा? कांहीं तरी बोल कीं! ती रागावली का तुझ्यावर? का ती माझ्यावर रागावली? सांग-सांग काय झालं तें? आतां गप्प नको राहूंस रे बाबा! बोल कांहीं तरी? पाया पडतो हवें तर तुझ्या—! हा पहा पायां पडतों...

——काय? काय म्हणालास नंदू? ती गेली? मला शोधायला म्हणून ती जिन्यावर आली? आणि जिन्यावरून गडगडत खालीं गेली? डोकं फुटलं तिचं? तिचं काळीज थांबलं?...चांडाळा, अरे काय सांगतोस तूं हें? आतांच तिनं शिरा केला ना? तिनं स्वयंपाक केला ना? पाटपाणी केलं ना? माझी ती वाट पहात होती ना?—आणि मी घरीं येण्यापूर्वींच ती गेली? मी नसतांना गेली? जसा नानू गेला, तशीच तीहि गेली? मला एकट्यालाच टाकून ती गेली? कुठें आहे, अरे कुठें आहे ती? पाहूं दे मला!

मथू, तूं गेलीस! अखेर झालं रितं वाळूचं घड्याळ! आला तुझा जाण्याचा क्षण! ह्या रीतीनं आला! घराच्या जिन्यावर आला. माझी वाट पाहतां-पाहतां आला, तर मग आतां माझा क्षण केव्हां यायचा आहे? आतां मी कुठवर जगूं? कशासाठीं जगूं? कुठवर त्या क्षणाची एकट्यानं वाट पाहूं?...मी नाहीं आतां वाट पाहणार! मी नाहीं आतां जगणार! मी ओढून आणीन तो क्षण! तो क्षण येईपर्यंत मी घड्याळाचे कांटे गरगरां फिरवीन! तिचं डोकं फुटलं—माझंहि डोकं मी फोडून घेईन!

—नाहीं फुटत? फुटत नाहीं? कसं नाहीं फुटत? फोडीन मी डोकं! असं डोकं फोडीन! फुटेपर्यंत फोडीन!

—दूर व्हा—दूर व्हा सगळीं जणं! हात नका लावूं माझ्या अंगाला! तुम्हांला माझ्या रक्ताची शपथ आहे, तुम्हांला हिच्या रक्ताची शपथ आहे. तुम्हांला माझ्या नानूच्या रक्ताची शपथ आहे. तुमच्या पोराबाळांच्या रक्ताचीशपथ आहे. हां!—हां! रक्त! असंच फोडीन मी डोकं! मरून जाईपर्यंत फोडीन. दूर व्हा सगळींजणं! मला पुरतं मरूं द्या. मला पुरतं मरायचं आहे. ह्या क्षणीं मरायचं आहे. आम्हां दोघांना बरोबरच न्या तुम्ही. मरूं द्या मला! मरूं द्या—मरूं द्या—

**मी आणि इतर प्राणी** (पान १७ वरून)

हिंडणाऱ्या मोराकडे पाहून झाला. कलावंतांचं दर्शन तो आपल्या कलेचं प्रदर्शन करतांना व्हावें. उगीच एखाद्या जास्वंदाबाई जयहिंग-पूरकरणीला चटणी वाटतांना पहाण्यांत काय मजा आहे? म्हणून हल्लीच्या सिनेमानटींचे बागेंत काम करतांना, देवपूजा करतांना (फोटो-साठीं ह्या काय वाटेल तें करतील.) किंवा इंग्रजी पुस्तक वाचतांना (बहुधा फोटोग्राफरनें सुलट बाजू दाखवून दिलेलें असतें.) किंवा असल्या नाहीं त्या भानगडी करतानांचे फोटो पाहिले कीं त्यांची मला फडकुलीणबाईंच्या इतकी चीड येते. तात्पर्य, मोराचा नाच मीं अजून पाहिला नाहीं...पण त्यानंतर त्याचा पिसारा उपटून आपल्या धोतरांत किंवा पैठण्यांत खोचून केलेलीं मयूरनृत्यें मात्र मी इतकीं पाहिलीं आहेत कीं त्यावरून मोर नाचतो ही देखील पोपट बोलतो यासारखीच थाप असावी याची खात्री पटली आहे. मोर ह्या विषयावर यापुढें जपूनच बोलणें प्राप्त आहे. कारण आतां तो आपला राष्ट्रीय पक्षी झाला आहे. वास्तविक त्याचें केकाटणें हें पोपटाच्या क्यीऽऽर्र पेक्षां खूपच सुसह्य आहे. मी तें प्रत्यक्ष ऐकलें आहे. पण हा पक्षी आतां सरकारांत रजिस्टर झाल्यामुळें आपली ती अंतःकरणापासुन उमटणारी केका विसरून प्रसिद्धिखात्याची पोपटपंची करायला लागेल कीं काय अशी मला धास्ती वाटायला लागली आहे. सरकारांत गेलेल्या मोरूंचे मोर होतात पण खऱ्या पिसांच्या मोराचा मात्र केव्हां मोरू करतील कांहीं सांगतां येत नाहीं. नाचाचें जाऊं द्या—पण बाकी खरोखरीच सुंदर असलेल्या ह्या पक्ष्याविषयीं मला चिंता उत्पन्न झाली आहे.

काकाकुवा ह्या श्रीमंत पक्ष्याचें दर्शन फार वेळां घडलें नाहीं तरी एकदोनदां भेटीचा योग आला. उंच हवेलींतल्या एखाद्या हिरव्यागार महिरपदार खिडकीच्या पिवळ्या दांडीवर बसणारा हा तुरेदार पांढरा शुभ्र पक्षी म्हणजे मूर्तिमंत खानदानीपणा आहे. उगीच ओरडणें नाहीं ओरडणें नाहीं. मुक्ताच मिल् किंवा स्पेन्सरचा गहनग्रंथ संपवून त्याविषयीं मनन करीत आपल्या तीनतालाच्या महालांत पूर्वी सर महादेव किंवा सर जगन्नाथ असल्या भरघोस नांवाचे प्रागतिक पक्षाचे पुढारी क्वचित् दृष्टीला पडत तसा हा काकाकुवा दिसतो. हें गल्लीबोळांत नांदणारें पांखरूं नव्हे. ह्याचाच एक जंगमार की कुसूकू नांवाचा आफ्रिकन भाऊबंद सगळं सगळं बोलत असल्याच्या कहाण्या मीं ऐकल्या आहेत. आमच्या आळींत एका गृहस्थाच्या घरीं हा पक्षी टांगलेला असे. घराणें काका-कुवाचेंच पण दिसायला मात्र श्रीमंत कुळांतल्या एखाद्या दरिद्री चुलत घराण्याचीं माणसें जशीं काळींबिद्रीं निघतात तसल्यापैकीं. हा कुसुकू किंवा जंगमार जो कोणी असेल तो, रस्त्यांतून येणाजाणाराला 'ए पाववालाऽ' 'ए जोश्याऽ', काय रे सोमण, निघालास काऽऽ' 'बापटांची बिजू काय रे तीऽऽ बरी दिसतेय कीऽऽ' असें ओरडायचा. किंबहुना तो ओरडतो अशी सगळ्यांची समजूत करून देण्यांत आली होती. कांहीं काळानें त्या घरांतले डोक्यानें अंमळ अधू आजोबा वारले आणि त्या हाकाहि बंद झाल्या. माझ्या आयुष्यांत मीं ऐकलेला हा पहिला प्लेबॅक! त्या घरचीं माणसें मात्र बाप्पा गेले आणि आमच्या कुसूकूचं बोलणं बंद झालं हो—असें डोळ्यांत न आलेलें पाणी पुसत सांगत असत. बोलणं बंद होईल नाहीं तर काय? त्या बिचाऱ्याचा बोलविता धनीच गेला.

पक्ष्यांच्या दुनियेंत कोकिळेचें कविजनांनीं इतकें कौतुक करूनहि कुणी कोकिळा पाळल्याचें ऐकिवांत नाहीं. कदाचित् कोकिळ आणि कोकिळा ह्यांपैकीं संगीतविशारद कोण आहे याचा खात्रीलायक निर्णय न लागल्यामुळें त्यांना कुणी पाळत नसेल. शिवाय मेळयांतल्या मुलींना जसा फक्त गणेशोत्सवांतच कंठ फुटतो तसा ह्या पक्ष्याला फक्त वसंत ऋतूंत! तेव्हां एका ऋतूतील कुहुकुहू एवढी एकच चीज ऐकायला पांच ऋतूंत पोसण्याचा खर्च कशाला करा असा व्यावहारिक विचारहि होत असावा. पोपटाच्या बोलण्याप्रमाणेंच कोकिळा पंचम स्वर लावते हा एक संगीतविषयक अज्ञानाचा पुरावा आहे. कशाचा पंचम? मूळचा षड्ज कुठला! आतां कोकिळेची काळी पांच पट्टी आहे म्हटलें तर चालेल. पण कवींचें भाषाशास्त्रच निराळें. इतके दिवस उडुगण म्हणजे पक्षी अशी माझी समजूत होती. पण उडु म्हणजे एका जागीं घट्ट असलेलीं नक्षत्रें हें ऐकून मी थंड झालों. नक्षत्रांना उडू म्हणणारे हे कवि उद्यां खऱ्या पक्ष्यांना आफ्रिकेंतल्या कानू किंवा काडू ह्या येडपट नांवांच्या राजकीय पक्षांत टाकतील.

उडत्या पक्ष्यांत कांहीं पक्षी देखणे असूनहि पाळीव झाले नाहींत. दमयंतीनंतर हंस पाळण्याच्या भानगडींत कुणीहि पडलेला दिसत नाहीं. कोकिळेप्रमाणें हाहि पक्षी कवितेच्या कर्दमांत रुतला. त्यांतून त्याचें तें मानससरोवर श्लेषाच्या उपयोगी पडल्यामुळें दुहेरी फायदा झाला. हा पक्षी मोत्याचा चारा, बिसतंतु यासारखें आर्यपथिकाश्रमवाल्यांच्या भाषेंत सांगायचें म्हणजे 'एकदम् हायक्लास्' जेवण जेवतो. रहायला त्याला जलाशय लागतो. हवा थंड असावी लागते. त्याच्या बदक नांवाच्या ग्रामीण नातलगासारखा डबक्यांत भागवून घेत नाहीं. त्यामुळें हा खाजगींत परवडण्यासारखा नसतो. साऱ्या पक्षीसृष्टींत (चुकून उडुगणांत म्हणत होतों.) माझा आवडता पक्षी हाच. आयुष्यांत जर पक्षी पाळावासा वाटलाच तर मी राजहंस पाळीन. असला पक्षी बनविणें विधात्या-लाहि पुन्हा जमलें नाहीं. त्यानें बदकें केलीं—बगळे करून पाहिले—शहामृगांना देखील तसली मान देऊन पाहिलें पण राजहंस जमून गेला. अशा हंसाची हिंसा करूं पहाणाऱ्या नळाला अजिबात नीरक्षीरविवेक नसावा. किंवा मुंबईच्या नळांत मासे शिरतात तसा ह्या नळांत नक्कीच कलि शिरला असावा. त्याखेरीज इतकी डौलदार मान तो मुरगळायला निघाला नसता. पण ह्या नळापेक्षांहि नलदमयन्ती आख्यान लिहिणाऱ्या रघुनाथ पंडितानें ह्या हंसावर फार मोठा अन्याय केला आहे. नळाच्या हातीं लागलेल्या त्या राजहंसाच्या तोंडीं 'म्हातारी

उडतां येयेचि तिजला—फराच थकलीय्- आणि वाइफचीहि घरांत डिलिव्हरी झालीय्' असली केवळ कलेक्टर कचेरींतल्या डिस्पॅच् क्लार्कच्या तोंडीं शोभणारी भाषा घालून ह्या पिसापिसांतून राजरक्त सळसळणाऱ्या पक्ष्याचा घोर अपमान केला आहे. वास्तविक खरा राजहंस म्हणाला असेल, 'हे नळराज, आपले ते अश्वशाळेंत काम करतांना खराब झालेले हात लावून माझे शुभ्र पंख खराब करूं नका. बजावून ठेवतोंय् ! मला मानससरोवरापर्यंत उडत जाऊन ते धुण्याचे कष्ट उठवावे लागतील. तुमच्या वाड्यांतल्या बागेंतल्या नळावर धुण्याचीं हीं वस्त्रें नव्हेत. त्यांना स्पेशल् वॉश लागतो. वस्तुतः तुमच्यावर भाळलेल्या दमयंती नामक विदर्भाच्या राजकन्येचा निरोप घेऊन आलेला मी राजदूत आहें. माझी अशी संभावना केलीत तर विदर्भाचीं मनें दुखतील हें लक्षांत ठेवा. ही काय वागण्याची रीत झाली ? नळराजे आहांत का तुमच्या राजधानीच्या मुन्सिपाल्टीच्या पाणी-खात्याचे प्लंबर आहांत ?" खरा राजहंस असें खडसावून बोलला होता. पण कविलोकांना पक्षी हा प्रकारच कळला नाहीं. नाहींतर राजहंसाच्या तोंडीं रघुनाथ पंडितानें असली लाचार भाषा घातली नसती. देखण्या राघूची मैना नामक काळुंद्रीशीं दोस्ती जमवली नसती—कोकिळ-बुवाची गायनविद्या कोकिळाबाईंना चिकटवली नसती आणि स्वतःच्या जागेवरून इंचभर हल-ल्यावर ज्यांचा कपाळमोक्ष होतो असल्या नक्षत्रांना उडुगण म्हटलें नसतें. राजहंसाविषयीं इतकें विवेचन केल्यावर इतर पक्ष्यांचा उल्लेख करणें देखील जिवावर येतें. शिवाय मुख्य विचार पाळीव पक्ष्यांचा आहे तो 'पोपट' ह्या एकाच पक्ष्यावर जवळजवळ संपतो.

पाळीव प्राण्यांत 'मांजर' हा एक खास संशोधनाचा विषय आहे. माझे आणि मांजरांचे वैयक्तिक संबंध गोणत्यांमार्फतच आले. गोणत्यांतल्या मांजरांना शक्य तितक्या दूर सोडून येण्याच्या कामगिरीवर माझी नेमणूक होत असे. पण ह्या कुटुंबाला तडीपार करून घरीं यावें आणि आपल्या स्वागताचें 'म्यॉंव' त्यांनींच करावें असेंच घडत आलें आहे. तडीपार केलेले गुंड जसे–पोलीस चौकीवर फौजदाराच्या पाकिटांतून सिगारेट ओढतांना दिसतात तशीं हीं गोणत्यांत घालून सातासमुद्रापलीकडे सोडलेलीं मांजरें रात्रीं आपल्या शेजारीं ताटाला असतात. मांजर नामक उपद्रव माणसें कां पाळतात कोण जाणे. सत्य-युगांतलीं मांजरें उंदीर खात असतील, हल्लींचीं तेंहि काम करीत नाहींत. मांजर हा मुख्यतः बायकांच्या लाडाचा विषय आहे. मांजरीला कुरवाळीत बसलेले साहेब विरळा. मेमसाहेबां-नाच तें प्रेम अधिक. ही एक अत्यंत निर्बुद्ध अवलाद आहे. (मांजर ही–मेमसाहेब ही नव्हे.) कुत्रीं कांहींतरी शिकतात. दोन पायांवर उभें राहणें किंवा तोंडांतून काठी आणणें वगैरे अर्थशून्य कां होईना, पण काहींतरी खेळ करतात, पण मांजर आणि बोका हा गाढवाहूनहि अधिक निर्बुद्ध प्राणी आहे. मनी ही वाघाची मावशी नसून टोणग्याची आत्या व मिशा असल्यामुळें काका देखील—आहे असें माझें स्पष्ट मत आहे. आपलीं मतें स्पष्ट मांडायला मी भीत नाहीं कारण मी कुणाच्याहि ताटाखालचें मांजर नाहीं. जी गोष्ट मांजराची तीच बोक्याची 'डांबीस' हा शब्द लहानपणीं प्रथम ऐकला त्यावेळीं बोक्याला इंग्रजींत डांबीस असें म्हणतात असें मला उगीचच वाटत होतें. पण इंग्रजींत डांबिस नांवाचा शब्दच नाहीं आणि बोक्याला देखील मांजरा-सारखें कॅटच म्हणतात हें कळल्यावर त्या भाषेच्या दौर्बल्याची कींव आली. 'बोका' ह्या दोन शब्दांत ह्या प्राणीविशेषाचें सम्यक् दर्शन होतें.

सगळ्या मांजऱ्या एके काळीं 'मनी' होत्या आणि प्रत्येक बोका 'बंड्या' असे. नांवाची विल्हेवाट सोपी होती. 'घरच्या बन्यां'चा कुत्रा 'मोत्या' असे, चलाख असला तर टिप्या, गांवटी 'खंड्या' आणि शिकारी 'वाघ्या.' कुत्र्यांची नामावळी एवढ्यांत आटपायची. मास्तर जमात जशी जोशी मास्तर, देशपांडे मास्तर आणि कुळकर्णी मास्तर एवढ्यांत संपे तसेंच हेंहि होतें. पांच फौजदारांपैकीं तीन तावडे आणि दोन साळवी निघायचे. पाटलांत सुभानराव भरपूर तसेच बैलांत ढवळ्या आणि पवळ्या पलीकडे नांव नसे. भटजींत भिकंभटांची संख्या फार मोठी. थोडक्यांत म्हणजे नांवें जावळासारखीं आपो-आप चिकटलेलीं असत. मंडळी बारशाच्या वेळीं नांवें शोधण्यांत वेळ दवडीत नसत. पुढच्या वर्षीच्या बारश्याच्या तयारीला लागत. इंग्रजीचा अंमल चढूं लागला आणि मनी-मावशीची 'केटी' झाली, जेनी झाली. माझ्या ओळखीच्या एका इंग्रजी सूर्याबरोबरच अस्त पावलेल्या रावबहादुरांनीं आपल्या बोक्याचें नांव अलेक्झांडर असें ठेवलें होतें. दोघेहि सकाळीं एकमेकांसमोर मिशा चाटीत बसायचे.

हल्लीं मांजरें उंदीर पकडत नाहींत हें मी स्वानुभवावरून सांगतों. आमच्या घरीं उंदीर झाले. गेल्या युद्धांत रुझवेल्ट, चर्चिल आणि स्टालिन कुठेसे भेटले होते त्याच सुमाराची गोष्ट








आहे. घरांत सर्वत्र उंदीर झाले होते. उंदराच्या गोळ्या खाऊनहि जिवंत रहात. रात्रंदिवस खुडखुड चाले. सापळे झाले. पिंजरे झाले. ओलीं पिंपं आणलीं. आतां पिंपं ओलीं करायचीं कीं उंदीर ओले करुन त्यांत टाकायचे ह्यावर घरांत मतभेद होता. शेवटीं नाइलाजानें मांजरी आणली. प्राणीपालनाविषयीं आमच्या खानदानांत कुणालाच फारशी आस्था नाहीं. शौकानें कांहींतरी ठेवून असावें असें कुणाला कधीं वाटलें असल्याचा कुठेंच पुरावा नाहीं. प्रस्तुत मांजरी ही केवळ विशिष्ट कामगिरीवर ठेवण्यांत आली. परंतु ह्या मांजरीनें घरांतल्या दुधाशिवाय आपण होऊन दुसऱ्या कशालाहि तोंड लावलें नाहीं. घरांत रिकामी घांट असती तर आमच्या उंदरांनीं एखाद्या बोक्याच्या अध्यक्षतेखालीं तिच्या गळ्यांत समारंभपूर्वक बांधली असती याची मला खात्री आहे. फार काय, समोरुन दोनतीन उंदीर चाल करुन आले तर हीच पांघरुणांत लपायची. हे म्हणजे नौसेनादलाच्या एखाद्या रिअर ॲडमिरलला मालवणच्या बंदरांतला पडाव लागून उलट्या होण्यापैकीं आहे. पण आमच्या नशिबीं आलेली मांजरी तशीच होती. आणि पडाव लागण्याचा प्रकार भारतीय नौसेनादलांत अगदींच अशक्य आहे असेंहि मानण्याचें कारण नाहीं. एके दिवशीं मांजरीकडून कसलीच झटापट होत नाहीं हें पाहून ते उंदीर आल्या वाटेनें हताश होऊन निघून गेले. पण मांजरी राहिली. तिला कुणींहि कधींहि जवळ केली नाहीं. पांघरुणा पांघरुणांतून तिला चेंडूसारखी उडवण्यांत येत असे. शेवटीं घरांत दुर्लक्षिलेल्या वयांत आलेल्या मुली जें करतात तेंच तिनें केलें. गल्लींतल्या एका मवाली बोक्याशीं सूत जमवलें. तिचा सारा दिवस आरशासमोर राहून अंग चाट, मिशा साफ कर, शेपूटच फेंदारून पहा, असल्या गोष्टींत जाऊं लागला. पुढें पुढें तो निर्लज्ज बोका रात्रीं खिडकीखालीं येऊन आर्त स्वरांत हाका मारीत असे. फारच बोकाळूं लागला. आमची खिडकी आणि समोरच्यांची ओसरी ह्यांतून द्वंद्वगीतें चालत. बाकी बोका आणि मांजरी ह्यांचा प्रेम-संवाद हा जवळजवळ माणसाच्या बोलींत चालतो. मला तर बोक्याच्या स्वरांतून 'माझ्या मनिचें हितगुज सारें ऽऽ' अशासारखे शब्दहि ऐकूं येत. त्यावेळच्या मन्या फारशा गात नसत. मधूनच 'म्यां–यावें कसें–रे–बोक्या सख्या' म्हटल्यासारखें वाटे. हल्लीं मनीच 'माझा होइल का? बोकाऽ' अशी आपण होऊन प्रस्तावना करते म्हणतात. तीं काय विचारीं मुकीं जनावरं. भोंवतालीं पहातात त्यांतून घेतात एकेक. असो. पुढें बोक्याची म्यांवगीतें बंद झालीं आणि आमच्या मनीची कूस धन्य झाली. तेव्हांपासून प्रत्येकाच्या पांघरुणांत एक ह्या दरानें मांजरें वाटलीं. पंक्तीला प्रत्येक जण डाव्या हातांत छडी घेऊन बसायला लागला. एका हातानें छडी आपटीत आणि बंड्याच्या कृपेनें फुललेल्या मनीच्या वंशाची पांगापांग करीत जेवणें उरकावीं लागत. गोणत्यांतून सोडा. बसमध्यें विसरुन या. विरार लोकलमध्यें टाका —पुन्हा आपलें जैसे थे! इकडे बंड्याहि ऐकेना. शेवटीं मांजरें घर सोडीनात म्हणून आम्हीं सोडलें. आणि ही जात अशी कृतघ्न कीं इतक्या वर्षांच्या खाल्ल्या अन्नाला स्मरुन त्यांतलें एकहि मांजर आम्हांला दाराशीं देखील पोहोंचवायला आलें नाहीं. उलट गोवळ्यांतल्या लोणच्या पापडाच्या बरण्या वगैरे बिऱ्हाड-बदलींतला शेवटला किंमती ऐवज घेऊन व्हिक्टोरियांत बसलों त्यावेळीं कौलावर आमची मनी शेजारच्या बंड्या बोक्याचें लाडांत येऊन अंग चाटत होती. मांजर माणसाला नाहीं घराला धार्जिणी, म्हणतात तें खोटं नाहीं. असल्या दगडाविटांत गुंतणाऱ्या प्राण्याला माणसें कां पाळतात देव जाणे.

मुंबई शहरांत रहाणाऱ्याच्या नशिबीं गाई बैल कुठले? बिगारींत असतांना 'तांबू तांबू ये घरीं झाली आतां सांज। हंबरतें हें वासरूं त्याला आधीं पाज.' नांवाची कविता असे. त्यांत एक तांबू नामक गाय येऊन गेली तेवढीच. तिथें देखील 'झाली आतां सांज'च्या पुढें त्याला आधीं पाज म्हणून दुसऱ्या चरणांतला यमकदोष

सुधारल्याबद्दल दामले मास्तरांनीं माझ्या दोन्ही चरणांवर गुराख्याच्या बळानें चिंचेचा फोक उठवला होता. बाकी दामलेमास्तरसुद्धां एकबाणी रामासारखे एकफोकी होते. त्यांनीं छडी–फूटपट्टी–थपडा वगैरे शस्त्रांतर कधींहि केलें नाहीं. ती तांबू गाय आठवणींचे वळ पायावर ठेवून गेली. दामले मास्तरहि गेले आणि आतां नव्या जमान्यांतल्या मास्तरांचे गुर्जी होऊन त्यांनींच त्रिगार भरायला सुरुवात केल्यापासून त्या त्रिगारी यत्तेचीहि आवश्यकता उरली नाहीं. कारल्यांचे शिशु झाले. क्वचित् गोरक्षणवाले पोळ आणि चारावाल्या बाया पुराव्यासाठीं म्हणून दारांत गाई आणून गुदरीत. बैल फक्त नंदीबैलवाल्यांनीं आणले तर दिसायचे. त्यामुळें संध्याकाळीं गायी परततात—त्यांच्या गळ्यांतल्या घंटा वाजतात —मग वासरें हंबरतात—गोठ्यांत गांवोगांवच्या यशोदा माता त्यांची धार काढतात, ही केवळ ऐकीव आणि पुस्तकी माहिती होती. बरींच वर्षे धार ही त्यांच्या शिंगांची काढीत असाव्यात अशी माझी समजूत होती. मुंबईत म्हशींचीं सार्वजनिक निवासस्थानें पाहाण्याचे योग येत. कारण त्यावेळीं गोठ्यांचीं दुग्धकेंद्रें झालीं नव्हतीं. म्हैस ह्या प्राण्याच्या जवळ जाण्याची ताकद असलेला एक मनुष्य विशेष भल्या पहांटे अर्धनिद्रितावस्थेंत दुधाचा हंडा घेऊन दारांत येत असे. सोबत त्या गोठ्याचा परिमळहि आणीत असे. ती दुधाची पितळी चरवी, त्याच्यावर तरंगणारी ती गवताची चुंबळ, त्यांत कोपरापर्यंत हात बुचकळून चाललेलें तें दुग्धवाटप आणि 'देखो हां पुन्हा ऐसा करेंगा तर सांगून ठेवेंगा' असली ती नित्याची दमदाटी हा सगळा प्रकार इतका कंटाळवाणा असे की गाय, म्हैस, दूध आणि दूधवाले ह्या सर्वांविषयींच माझ्या मनांत घृणा उत्पन्न झाली आहे. त्यांतून गाय–घोडा हे कांहीं पाळीव प्राणी नव्हेत. कुठलाहि प्राणी पाळीव व्हायला तो मुख्यतः निरुपयोगी असला पाहिजे. राखणीचा कुत्रा आणि उंदरासाठीं मांजर हें श्रेष्ठ पाळीवपणाचें लक्षण नव्हे. पाळणाराची हौस, पाळीव प्राण्याची घरांतल्या सर्व माणसांहून अधिक चंगळ, आणि भल्य व पालक ह्यांच्या तावडींत सांपडलेल्या पाव्हण्याचे त्या उभयतांनीं अगर त्यांपैकीं एकानें केलेले हाल असा त्रिकोण साधला कीं त्या पाळण्याचें सार्थक झालें.

ह्या सर्व पाळीव प्राण्यांत कुत्रा हा सर्वश्रेष्ठ उच्छाद आहे. मतभेदाचा बारीक मुद्दा एवढाच कीं कुत्रा हा उच्छाद कीं कुत्रा पाळणारे हा! माझ्या मतें दोघेहि. त्यांतून एखाद्या युनानी जवानमर्द ताइतासारखा–मोठमोठे राजेरजवाडे–नवाब–व्यापारी–बॅरिस्टर–जमीनदार–स्टेशन मास्तर व फॉरेन रिटर्ण्ड इत्यादिकांनीं तारीफ केलेला व अनेक प्रदर्शनांतून गोल्ड मेडिल मिळविलेला हा प्राणी असल्यामुळें त्याच्या विरुद्ध कांहीं लिहितांना कुणाच्या शेपटीवर आणि कसा पाय पडेल तें सांगणें बिकट आहे. पण वयाच्या पांचव्या वर्षी 'पोपटाला क्यीरं पलीकडे कांहींहि बोलतां येत नाहीं–' हें न भितां फडकुलीणबाईंना



जोशीण बाईची ही लाडकी सिंड्रेला

ठणकावून सांगितलें आहे तिथें कुत्र्याचें काय? बाकी एखादें कुत्रें चावलेंच तर चौदा सुयांत भागेल पण त्याचे मालक, विशेषतः मालकीणबाई डसल्या तर हजार इंगळ्यांच्या वेदना देतील. अलीकडेच एका श्वानस्वामिनीनें माझा भयंकर पाणउतारा केला होता.

कांहीं कामानिमित्त त्यांच्या घरीं गेलों होतों. घरांत कसल्या तरी दुःखाची कळा पसरली होती. खाटेवरच्या पांघरुणाखालची म्हातारी तर शाबूत दिसली. साहेबांच्याच बरोबर घरीं गेलों होतों त्यामुळें तीहि बाजू पक्की होती. बाईसाहेब जरा दुःखांत दिसल्या. व्हरांड्यांत पांच मुलांपैकीं तिघे कॉमिक्स् वाचत होते. मोठी 'कम् सप्टेंबर' मधील सुरावट म्हणत होती आणि दुसरी त्या सुरांत आपण शीळ वाजवीत आहों अशी स्वतःची समजूत करून घेत होती. साहेब 'वॉश घेऊन येतों' असें सांगून कुठें तरी नष्ट झाले होते. बाईसाहेब मात्र समोरच्या आरशांत मला नकळत पाहून दुःखाच्या पोझेस घेत होत्या. मी दुःखाचें कारण विचारण्याचा मूर्खपणा मागें एकदां केला तो पुष्कळ झाला असें मनाशीं म्हणून समोरच्या कॅलेंडरांतल्या लाल तारखा पुन्हा पुन्हा मोजत होतों. मागें एकदां त्यांना असल्याच विषण्णावस्थेंत पाहून 'काय, बरं वाटत नाहीं कीं काय अल्काबाई' असें विचारण्याचा प्रमाद माझ्या हातून घडला होता. त्यावर—

"मला काय धाड झाली आहे? आजच तर अठ्ठाविसावं वर्ष लागलं तारखेनें—मेलें म्हणून कुणाला पर्वा आहे" असा गडगडाट झाला. माझ्या अगोदर साहेबांचा चेहरा खाडकन् उतरला. कुठल्याहि सरळ स्वभावाच्या नवऱ्याच्या हातून घडणारी घोडचूक झाली होती. बायकोच्या वाढदिवसाची तरीख विसरले होते. 'अठ्ठाविसावं वर्ष' वगैरे तपशील तितकासा खरा नव्हता कारण त्या हिशोबानें त्यांची थोरली बेबी त्यांना आठव्या वर्षी झाली असें उत्तर आलें असतें. पण तारीख बरोबर होती. साहेब पुन्हा वॉशला पळाले होते आणि मी खुर्चीपासून सगळ्यांत जवळचें दार गांठलें होतें. पण आजचें दुःख जास्तच खोल वाटलें. तरीहि मी विचारलें नाहीं. बाईसाहेब चहा ओततांना, साखर किती घालूं म्हणून विचारतांना, समोरच्या आरशांत पाहून केसांची बट मागें सारतांना आणि मागें सारून झाल्यावर पुढें आणतांना सारखे उसासे टाकीत होत्या. मी 'बरं नाहीं का वाटत?' हा प्रश्न जिभेच्या टोकावरून पडजिभेकडे लोटीत होतों. शेवटीं, इंजिनाचे बऱ्याच वेळां भुकभुकभुकभुक फुसफुस फुसफुस झाल्यावर जशी शिट्टी फुटते तसा त्यांचा आवाज फुटला—

'कसं अगदीं ओकं ओकं वाटतंय्—"

आली पंचाईत? मला तर कुठें कांहीं ओकं बिकं वाटत नव्हतं. पण हातांतल्या चहाच्या कपाला स्मरणं आलं!

"काय झालं हो?"

"तुमच्या कशाला लक्षांत येईल? तुम्हां विनोदी लेखकांना हार्टच नसतं—कुणी मेलं तरी तुम्ही हंसाल." हा म्हणजे जुलूम झाला. मेलं तरी हंसाल! मी दामले मास्तर मेल्याचं परवां परवां एकून देखील रडलों होतों.

"अग पण—" साहेबांनीं इवनिंग न्यूजमधून डोकं वर काढलं.

"तुम्ही नका बोलूं—" तें डोकें इवनिंगन्यूजच्या कागदी पडद्यामागें गेलं.

"इतका वेळ झाला पण एकदां तरी आठवण आली का तुम्हाला ?"

"कोणाची ?" माझा प्रश्न अत्यंत अजागळ आहे हें कळत होतं.

"वर पुन्हा कोणाची म्हणून विचारतां ?" ही बाई माझ्याशीं न कळवतां खाडा केलेल्या शिकवणीच्या मास्तराशीं बोलल्यासारखें कां बोलत होती तें मला कळेना. मी त्यांच्या साहेबांच्या हापिसांत देखील नव्हतों. "कोणाची म्हणे. सिंडरेला दिसली का तुम्हाला इथें ?"

सिंडरेला ! ! माझ्या डोक्यांत लख्ख प्रकाश पडला. दरवेळीं माझी चप्पल पळवून आंगटा खाणारी ती छळवादी कुत्री मेली कीं काय ? चेहऱ्यावरचा हर्ष लपवण्याचा इतका प्रयत्न श्वशुरगृहींची ज्येष्ठ मंडळी आपल्या गांवीं परतण्याच्या दिवशीं देखील मला करावा लागत नाहीं. इथें तो आनंद अनावर होऊं पहात होता. सारखी वॅक् वॅक् वॅक् वॅक् करून डोकं उठवणारी ती सिंडरेला नामक कुत्री— सारखी दिसणारी चेटकीण ज्या कुठल्या ट्रक-खालीं आली असेल त्या ट्रकवाल्याची दाढी जाऊन कुरवाळावी असें मला वाटूं लागलें. ट्रकवाले हे मानवजातीला केवढे आधार आहेत

"आज दोन दिवस झाले बिचारी हास्पिट्लांत आहे."

"आहे ?"—हा शब्द तोंडून गेला आणि जिभेचा तुकडा पडेपर्यंत चावलो. पण शब्द गेला होता. त्यानंतर बाईसाहेब मला इतक्या बोलल्या कीं कांहीं वेळानें त्यांच्या तोंडून शब्द न येतां 'व्यॅक् व्यॅक् व्यॅक् व्यॅक्' असे आवाज येताहेत असं मला वाटायला लागलं. हल्लीं मी आणि साहेब महमदअली रोड, मांडवी, वडगादी वगैरे संशयातीत भागांत एकमेकांच्या चोरून गांठीभेटी घेतों. त्यांचें घर मला बंद आहे. कुणालाहि न कळत कुत्र्यांची विल्हेवाट कशी लावतां येते याविषयीं आमच्या चर्चा चालू आहेत.

पोपट, मांजर, काकाकुवा—फार काय, उद्यां एखाद्यानें सहज गंमत म्हणून रेडा पाळला तरी चालेल. पण कुत्रा पाळणारांचें आणि माझें जमणार नाहीं. पोपटवाले फार तर फडकुलीण बाईसारखें तो सगळं-सगळं बोलतो म्हणतील, मांजरवाले तें मांजर परभादेवीच्या मासळीबाजारांत सांपडलेलें असलें तरी पर्शियन् क्याट असल्याची थाप मारतील—रेडेवाला आपला रेडा देखील वेद म्हणतो असें सांगेल पण कुत्रेवाल्यांचें कौतुक कुठल्या थराला जाईल तें सांगतां येत नाहीं असाच एक हृदयद्रावक प्रसंग आठवतो.

"अहो खोटं वाटेल तुम्हाला —एकादशीच्या दिवशीं पावबिस्किट तर सोडाच पण चहाला देखील शिवत नाहीं."

"काय म्हणतां ?"

"सांगतें काय मग ?—परवांचीच गोष्ट. ह्यांचं रेडियोंत भाषण होतं—परवांचं ऐकलंत का ?—छानच झालं—मध्यें थोडेसे खोकले—बाकी सुरेखच झालं—आवाज बरोबर ओळखू येत नाहीं हो त्यांचा—पण ह्यानं कसा नेमका ओळखला—भाषण संपेपर्यंत हलला नाहीं जागचा—"

"काय म्हणतां—"

"तें कशाला—परवांचीच गोष्ट. आमच्या वेवीचं पत्र आलं वाशिंटनहून. हो—आमचे जावई हल्लीं जर्मनींतून तिकडे गेले बदलून. फोटो नाहीं का पाहिलात—जर्मनींत काढला होता. वरच्या कोनऱ्यांतले खांबाच्या मागें उभे












## सामोरी

केशव मेश्राम

एकाद्या रात्रीं तवक घेऊन रात्रच मला सामोरी येते  
अंधाराची खोल...अबोल वाट वाट स्वच्छ दिसते  
आंकडेमोडीनें आक्रसलेला तुझा चेहरा बवत असतो  
सर्वांगाहून त्याच वेळीं तुझ्या डोळ्यांचा हात फिरतो.

वळ देतो...वळ घेतो वाट आपण चालत असतो  
पांथासारखें जवळ तरी एकमेकांशीं बोलत नसतो  
हात मात्र इमानेंइतबारें आपलें चोख काम करतात,  
मांडीवरल्या इवल्यासोबत भुर्र चिमणी खेळत असतात.

गळूं येतें पान पान...मन तसें विकल बनतें  
अज्ञात कोणा संकटाची तुलामला हांक येते  
डोळे सतत पेटत राहतात...छातीची ढाल बनते  
...अंधारांतील गूढ कांहीं हळूच हसत पुढें येतें !  
...एखाद्या रात्रीं तवक घेऊन रात्रच मला सामोरी येते !!

आहेत ते—ते जावई आमचे. पुढल्या रांगेंत हे नेहरू—जांवयांचा फोटो काढला त्या दिवशीं तेहि होते म्हणे तिथें. हो, तर काय सांगत होतें–हो वेबी आमची—दोन महिन्यांची बाळंतीण होती—जर्मनींत गेली तेव्हां—मुलगी झालीय—आतां पुन्हा बघायचं काय होतं तें--सप्टेंबरांत तारीख दिली आहे—हो तर सांगत काय होतें—वेबीचं पत्र आणून टाकलं बघा पोटमननं—हा कुठून आला कोण जाणे—वरचा अमेरिकेचा ष्टांप पाहिला आणि थेट जाऊन उभा राहिला आंतल्या खोलींत वेबीच्या फोटोपुढें शेपटी हाल्वीत—"

"काय म्हणतां—"

"पदरचं का सांगतेय—परवांचीच गोष्ट."

आवांपर्यंत चाळीसएक 'परवांच्या गोष्टी' झाल्या होत्या. सुमारें दीड सवादोन तास मी 'काय म्हणतां' यापलीकडे कांहींच म्हटलं नव्हतं. तेवढ्या अवधींत मला 'कुत्रा' हा प्राणी त्याच्या मालकापेक्षां, मालकिणीपेक्षां आणि एकूणच जगांतल्या सगळ्यांपेक्षां किती हुषार असतो हें कळलं. हें सगळं ऐकल्यावर मालक कुत्रीं पाळतात कीं कुत्रीं मालकांना ठेवून असतात असा सवाल माझ्या मनांत पैदा झाला आहे. घरांत कुत्रा असूनहि त्या विषयींची एकहि कथा न सांगणारा मालक–विशेषतः मालकीण—मला भेटायची आहे. राखणदार कुत्रीं पाळणारे धनगर जर वगळले तर इतर मंडळी 'कुत्रा' हा केवळ नव्या गोष्टी रचायचें निमित्त म्हणून वापरीत असावे. माझ्या परिचयाच्या एका गृहस्थांचा कुत्रा फक्त शास्त्रीय संगीतच ऐकतो असा त्यांचा दावा आहे. सिनेमांतलीं



रेकॉर्ड ब्रेकर नेपोलियन

गाणीं सुरू झालीं कीं रेडियोवर 'जंप घेऊन ॲक्चुअली भुंकायला लागतो.' त्याच्या मालकीणबाईचं देखील 'आय सिंपली हेट फिल्म म्यूजिक' असं आहे. कुठल्याशा दिगंबर बुवापुढें आठवड्यांतले तीन दिवस बसून त्या केदार, हमीर वगैरे मातबर मंडळींची आकंठ अब्रू काढत असतात. समाज कल्याण, हँडिक्रॅफ्ट्स्, ब्याडमिंटन्, रमी, स्लिमिंग, सिनेमे, आमचा शनिवार, गायन, बॉलरूम डान्सिंगचे क्लास आणि ज्ञानेश्वरी एवढं सगळं एका आठवड्यांत कोंबणाऱ्या ह्या शिष्या आणि ते दिगंबरबुवा यांचा केदार हमीराचा त्रिसाप्ताहिक आक्रोश ऐकूनहि त्यांच्या नेपोलियनला (कुत्र्याचें नांव) आयुष्यांत कशावरहि भुंकण्याची वासना तरी कशी राहते त्याचें तोच जाणे. मी जर कुत्रा असतों तर त्या घरांत मुकें जनावर हेंच नांव सार्थ करीत राहिलों असतों. बाकी तें नेपोलियन् देखील नुसतं भुंकतच असतं. दुसरं एखादं स्वाभिमानी कुत्रं असतं तर त्यानें गुरुशिष्येपैकीं एकाच्या तरी नरडीचा घोट घेतला असता. हें फक्त भुंकतं. एकदां मात्र आशाळभूतपणानें हा नेपोलियन् आपल्या खिडकींतून समोरच्या मल्होत्रांच्या खिडकींतल्या 'प्रिन्सेस्' कडे डोळ्यांत केवळ कुत्रींच आणूं शकतील इतकें कारुण्य आणून बघऽऽत बसलेला मीं पाहिला होता. कांहीं वेळानें त्याच्या डोळ्यांत ते अवघ्या अभाग्यांचे अश्रू इतके दाटले आणि जिभेची लांबी इतकी वाढली कीं हा आतां लवकरच 'चौदहवी का चांद...' म्हणायला सुरवात करतोय कीं काय असें मला वाटलें. पण तो शास्त्रोक्त संगीतवाला कुत्रा असल्यामुळें जोगिया रागांत 'पिय कोमिलन की आऽऽऽस' म्हणाला असता. मी गेल्यावर म्हणालाहि असेल. हिंदी सिनेमांतले नायक गायक झाले कीं त्यांचा मिनिटभर आधीं नेमका अस्सा चेहरा होतो. हा नेपोलियन् म्हणे लेबलें पाहून रेकॉर्ड ओळखतो.

"नेपोलियऽऽन्, बड़े गुलामअल्ली आण' म्हटल्यावर टेबलावरच्या दोनतीन रेकॉर्ड्स् मधून शिंच्यानें नेमका गुलामअली दातांत धरून आणलाहि होता. पण बाई आंत गेलेल्या पाहून हळूच मी टेबलावरच्या उरलेल्या रेकॉर्ड्स् पाहिल्या त्याहि गुलामअलीच्याच होत्या. ही जादू करून दाखवण्यांत त्यांनीं मला फसवलें, स्वतःला कीं नेपोलियनला तें मला अद्यापीहि कळलें नाहीं. • त्यानंतर





नेपोलियन् दिगंबरबुवांच्या तराण्याची हुबेहूब नकल करतो हें ऐकून मला यत्किंचितहि आश्चर्य वाटलें नाहीं. कारण दिगंबरबुवा आज कित्येक वर्षे भुंकण्याचीच नकल करून त्याला तराणा म्हणत आले आहेत.

माझ्या परिचयाचें दुसरें एक कुटुंब आहे. निंदेच्या सोयीसाठीं त्यांना आपण 'जोशी' म्हणूं या. त्यांचेंहि नांव जोशीच आहे. पण जगांत इतके जोशी आहेत कीं ते जोशी ते आपण जोशी नव्हेत असें ह्या आणि इतर सर्व जोशांना वाटणार याची मला खात्री आहे. त्यांच्या कुत्र्याचें नांव म्याक्मिलन्! इंग्रज गेल्याच्या सुतकाची एक अदृश्य काळी पट्टी ह्या जोशी कुटुंबांतल्या प्रत्येक रुंद निरुंद घटकाच्या दंडावर कायम चिकटली आहे. जोशी लोक नेहमीं विलायती कुत्रीं पाळत आले आहेत. अल्सेशन्, पोमेरेनियन्, रिट्रीव्हर, टेरियर, पूडल्, सेंट बर्नार्ड वगैरे विलायती औषधांपासून ते माजी गव्हर्नरांपर्यंत कुणांचीहि असूं शकतील अशीं कुत्र्यांच्या गोत्रांचीं नांवें मी प्रथम ह्या जोशांच्याच घरांत ऐकलीं. कुत्रीं विलायती असल्यामुळें त्यांनीं त्यांच्याशीं बोलण्यांत उगीच अडचण येऊं नये म्हणून मुलांशीहि पहिल्यापासून इंग्रजींतच बोलणें चालणें ठेवलें आहे. दोनतीन भाषांचा कुत्र्यांना म्हणे फारच ताण होतो. जोशीणबाई त्यांच्या त्या म्याक्मिलनशीं–

"आय याम् गोईंग आऊऽऽट बरं का म्याकमिलऽऽन्–अरे व्हाट इज धीऽऽस–यू आर कनी व्हेरी ब्याड् ब्याड् डॉग बरं का–लीव्ह माय पदर–लीव्ह माय पदर' असलें इंग्रजी बोलतांना ऐकलें कीं एखाद् दिवशीं हा हा मॅक्मिलन् चक्क 'श्याटप्–यू ब्लडी–च्' असें ओरडून शेपूट वर करून चारी पायावर निघून जाईल अशी मला भीति वाटते.

आधीं कुत्र्यांशीं बोलायचीच काय गरज? त्यांतून इंग्रजींत कशाला? बाकी बहुतेक मंडळी कुत्र्याशीं इंग्रजींतच बोलतात. शिकारवाले लोक मात्र कधीं कधीं 'चलो टायगर' करून राष्ट्रभाषा वापरतात. पण उद्यां जर कोणी कुत्र्यांची शिरगणती केली आणि 'कुत्र्यानें अगर त्याचे मालकानें' भरावयाच्या तक्त्यांत जर नांव, जात उमर (फॉर्म छापणारांना मराठींत उमर याला वय हा शब्द आहे हें ठाऊक नसतें.)–ह्या तपशीलाखालीं 'भाषा' हा रकाना भरायचा असला तर सगळे कुत्रेवाले 'इंग्रजी' असाच भरतील. मांजरीशी कधीं कोणी इंग्रजी बोलत नाहींत ते? इंग्रजांच्या जमान्यांत त्यांचे देशी सेवक आणि कुत्रे ह्या दोघांचीहि लाळ घोटण्यांत चढाओढ असल्यामुळें आपल्याप्रमाणें कुत्रींहि इंग्रजी हटावच्या विरुद्ध आहेत असा त्यांचा समज दिसतो. जोशी लोक तर इंग्रजीच काय, इंग्रज हटावच्या विरुद्ध. त्यामुळें म्याकमिलन् सुटांतल्या पाव्हण्याला चावत नाहीं–धोतर दिसलें कीं आलाच चिंध्या करायला. वर सौ. जोशी त्याला 'कल्चर्ड कोण—ब्याकवर्ड कोण नेमकं कळतं' हें दोन्ही ड पूर्ण उच्चारून ऐकवतात. मी त्या म्याक्याला लवकरच विष घालणार आहें. जोशांचे आजोबा आमच्या घरीं पूजा सांगायला येत असत म्हणून नाहींतर त्यांनाहि...



लग्न जमवून ठेवलं असतं ग...पण नंतर कोणी माल पोरगी सांगून आली तर पश्चात्ताप व्हायचा.

मला आवडतात तीं कुत्रीं रस्त्यांतलीं. ज्यांना कुलंगीं म्हणतात तीं. रस्त्यांत भटकणारीं–रेकॉर्ड ओळखण्याऐवजीं मुन्सिपालटीची गाडी ओळखणारीं. बिनपट्ट्याचीं. 'हाड्' हा एकच मराठी शब्द कळणारीं व दुसरी भाषा न जाणणारीं. त्यांचें पूर्व दिव्य नसतें. भविष्य केवळ म्युन्सिपालटीच्या दिव्याखालींच उज्ज्वल होतें. वेडच लागलें तर चावतात. (त्यांत काय, कुणीहि चावेल.) एरवीं तें कुत्रं आपणाकडे ढुंकून देखील पहात नाहीं. तुम्ही धोतर, पंचा, पॅण्ट कांहींहि नेसा. त्यांना त्याची चव नाहीं. त्यांच्या मारामाऱ्या त्यांच्या त्यांच्यात असतात. गल्लीच्या दादापेक्षांहि त्यांना आपापल्या गल्लीचा जास्त अभिमान असतो. दुसऱ्या कुत्र्यांना आंत येऊं देत नाहींत. रोटी बेटी व्यवहाराच्या बाबतींत तर हा श्वानसमाज फारच पुढारलेला आहे. असल्या कुत्र्यांशीं आजवर माझा अनाक्रमणाचा करार झाला आहे. उभय पक्षांनीं तो पाळला आहे. त्याचें एखादें 'भो' आणि पळतां पळतां वेळच्या वेळीं गळ्यांतून उमटलेंच तर माझें 'हाड्' यापलीकडे आमच्याकडून अधिक कडक निषेधाचे खलिते गेले नाहींत. तेहि तोंडी. लेखींत गुंतला नाहीं. माझ्या हातून त्यांना दगड गेला नाहीं कीं त्यांनीं माझ्या धोतरावर दांत धरला नाहीं. कुत्रीं इमानी असतात तीं हीं फुटपाथावरचीं. बंगल्यांतलीं आणि फ्लॅटांतलीं नव्हे. त्यांचें इमान सांखळी सोडीपर्यंतच टिकतें.

माझा कुठल्याहि सार्वजनिक गाण्यावर राग

नाहीं. मुंबईतल्या वहात्या रस्त्यांत ट्रॅफिक पोलिसाचा गोपाळकृष्ण करून त्याच्या भोंवतीं बसलेल्या गोमाता पाहिल्यावर ह्या बाजारी शहराला निष्पाप ग्रामीण टच मिळाल्याचा मला आनंद होतो. रस्त्यांत वेळीं अवेळीं भुंकणाऱ्या कुत्र्यांचा मला राग नाहीं. रस्त्यांत थुंकायला आणि भुंकायला मुन्सिपालटीची परवानगी कशाला हवी? त्यांतून एकमेकावर भुंकण्यांत मुन्सिपालटीचे सदस्य कुत्र्यांनाहि हार जात नसल्यामुळें कुत्र्यांना आपल्या मर्यादांची जाणीवहि आहे याची मला खात्री आहे. माझा दावा आहे तो हॉलमधल्या गालिच्यावर बसून अकारण भुंकणाऱ्या पाळीव कुत्र्यांविरुद्ध. हीं कुत्रीं दोन शब्द कांहीं निवांतपणें बोलूं देत नाहींत. नाना गडबोल्याच्या थोरलीच्या लग्नाच्या वेळची गोष्ट.

"हुंड्याला आमची—" मी.

"भॉं भॉं भॉं" व्हिक्टोरिया.

"अशं ग काय करतेश व्हिक्टोरिया—तुझं नाहीं हो लग्न इतक्यांत करायचं—यांचे ते गडबोले आहेत ना—त्यांची शकू—आपला भरूदादा आहे ना—"

"भॉं भॉं भॉं—"

"सगळं कळतं हो तिला."

"तर हुंड्याला आमची—" मी पुन्हा.

"भॉं भॉं भॉं—"

"व्हिके—काकांना ओळखत नाहींस का तूं—"

"भॉं भॉं" ह्याचा अर्थ व्हिकीचा मी काका हें तिला मान्य आहे.

"तर हुंड्याला आमची—" फिरून एक प्रयत्न.

"भॉं भॉं भॉं—"

"अग हो—ज्यायचं वरं का फिरायला. पावणेसहा वाजलेले बरोबर कळतात बघा तिला. आत्तां येतील वरं का साहेब. मग आमच्या व्हिकीला भूर न्यायचं" इथून पुढें पुढ्यांत व्हिकीला घेऊन 'चिंगी एक महिन्याची झाली नाहीं तोंच' छाप नाच्यछटा. माझ्या चेहऱ्यावर पोटांतला ह्या व्हिकीला जरासंघासारखी फाडावी हा विचार दाबून उमटवतां येईल इतकें दुबळें हंसूं.

"तर हुंड्याला आमची—" माझा मध्येंच घुसण्याचा प्रयत्न.

"भॉं भॉं भॉं!"

"अहो हिला सारखं बरोबर न्यावं लागतं. मंडळांतल्या बायकांनीं एकदां आब्जेक्शन् घेतलं—"

"ऑब्जेक्शन्—" माझी जित्याची खोड.

"भॉं भॉं!

"बाई तुझ्या मालकिणीचंच बरोबर—पण सदवे, मला बोलूं देशील तर काय तडफडून मरशील?" हीं सगळीं वाक्यें मनांत म्हटलीं.

"पण मी साफ सांगितलं. मंडळांत मी हवी असेन तर व्हिकी येणारच. चूप बसल्या. तिथें मात्र आमच्या गोष्टी सुरू झाल्या कीं गप्प असते हो.—सहा वाजत आले कीं हे कधीं वेळेवर म्हणून यायचे नाहींत. व्हिकीला तर प्रत्येक गोष्ट इतकी वेळच्या वेळीं आणि जिथल्या तिथें करायची संवय आहे." हें वाक्य होईपर्यंत व्हिकीनें माझा पाय हा दिव्याचा खांब आहे अशी समजूत करून घेतली.










"अय्या—हें ग काय व्हिके—बाथरूमध्यें नाहीं का जायचं! चावट कुटली—आणि हंसतेय वर..." मालकिणीला कुत्री हंसलेली दिसते. माझी विजार भिजलेली दिसत नाहीं. "...हुंड्याचं काय म्हणत होतां तुम्ही—"

"नाहीं...हुंड्याला आमची—"

"भॉ भॉ भॉ."

त्या व्हिक्टोरियाचा गळा दाबण्यासाठीं माझीं दहाहि बोटें शिवशिवतात. पण एका मुलीच्या बापाची कैफीयत घेऊन आलेलों असल्यामुळें दहा अंक मोजावे लागतात. नाना गडबोल्या पांच हजारापर्यंत तयार आहे आणि ही व्हिक्टोरियाची मालकीण दहा हजारांवर तटून बसली आहे. वास्तविक नाना गडबोल्याची शकू खरोखरीच नक्षत्रासारखी. पण नाना मुलगा होईल या खात्रीनें दर वेळीं गाफील राहिला आणि असल्या सात नक्षत्रांची काळजी डोक्यावर आली. घरचा तसा कितीहि बरा असला तरी सात पोरींच्या हुंड्यांची सात खिंडारें पडलेलीं. त्यांच्या वतीनं मी ह्या गणपुल्यांकडे रदबदली करायला आलों होतों. गणपुले मंडळींची कद्रूपणाविषयीं चार गांवांत ख्याति होती. पण मुलाचा बाप आमच्या जुन्या दोस्तांपैकीं. गणपुलीणबाईंचाहि चांगला परिचय. त्यांच्या मुलीचें लग्नहि मीच जमवून दिलें होतें. वाटलें होतें कीं स्मरेल. पण बाई अडून बसल्या होत्या. लग्नांच्या वाटाघाटींत जास्तींत जास्त पैशांवर अडून बसणाऱ्या कौटुंबिक घटकाचें—मग तो घटक दूरची आत्या किंवा मावसमावस मावशी किंवा काका असला तरी—त्याचें मन मोडायचें नाहीं असें एक धोरण संभाळलें जातें. इथें तर सख्खी आईच अडून बसलेली! बरें, कांहीं बोलायला तोंड उघडावें तर व्हिक्टोरिया एकनाड यावी तशी आड आलेली. पण देवाला डोळे आहेत. एकदम कुण्या अज्ञात देवदूतानें कानमंत्र द्यावा तसें कांहीसें झालें आणि मी बोलण्याचा सांधाच बदलून 'युरेका' असें ओरडलों. 'काय म्हणालांत?' गणपुलीणबाई दचकून म्हणाल्या. "सुरेखा?" "आं—सुरेखा—हो सुरेखा—मी तुमच्या व्हिक्टोरियाला मराठी नांव कुठलं चांगलं दिसेल याचा विचार करीत होतों—तें आठवलं—सुरेखा! सुरेखा!" आणि त्यानंतर मी श्रीगुरुदेव दत्त म्हणून त्या कुत्रीची तारीफ सुरू केली. कुत्रे ह्या विषयाची स्तुति कुठल्या मुद्यावर करतात ह्याविषयीं मी संपूर्ण अनभिज्ञ होतों. त्यामुळें मी स्तुतीच्या प्रत्यक्ष आणि अप्रत्यक्ष मार्गांतला दुसरा स्वीकारला. ह्यांत तुलनेनें परनिंदा करीत रहायचें असतें. डोळ्यापुढें सहा पोरींना जन्म दिल्याचे सहस्रापराध केल्यासारखा नाना गडबोल्याचा चेहरा दिसत होता. मनांत म्हटलें, 'परमेश्वरा, सत्कारणीं खोटें बोलतोंय्; क्षमा कर.' कधींहि खोटें बोलण्यापूर्वी हें एवढं म्हणून टाकावं असं माझ्या एका ब्रह्मचारी काकानें मला मरणापूर्वी सांगितलें होतें. सांगितल्यानंतर ते चांगले तीस पसतीस वर्षांनीं मरण पावले. पण एखाद्यानें मरणापूर्वी कांहीं सांगितलें होतें असें म्हटलें कीं तें अधिक परिणामकारक वाटतें. त्या काकाचें स्मरण करून मी परश्वाननिंदा सुरू केली.

"तुम्ही त्या मेजर मुजुमदारांची कुत्री पाहिली आहे का? दयागी कीं भागी काय म्हणतात ती—" हें एवढें बोलून होईपर्यंत ती व्हिक्टोरिया देखील बरी चूप राहिली. रोज मंडळांत जाऊन निंदेच्या असल्या ठराविक नांदीची तिलाहि संवय झाली असावी. "कसलीं भिकारडीं कुत्रीं पाळतात हीं माणसं! त्या






दिवशीं मी तासभर होतों तिथें—नुसतं मेल्यासारखं पडलं होतं. कुत्रं म्हणजे कसं खेळतं—भुंकतं हवं. मला रहावतंय् काय?— मी म्हटलं त्यांना—कीं मिस्टर मेजरसाहेब, एक्स्क्यूज हं जरा—पण आतांपर्यंत मीं अनेक कुत्रीं पाहिलीं पण मिसेस् गणपुल्यांची सर नाहीं—" "अय्या खरं म्हणतां कीं काय— तुम्ही तरी भारीच फटकळ आहांत." इथें गणपुलीणबाई माझ्या गालावर चापटी मारतात कीं काय असें मला वाटलें.

"म्हणजे भितों कीं काय मी त्याला—तो मेजर असला तर घरचा—आय ॲम् आफ्टर ऑल्...काय?" हें इंग्रजी शिंचं मध्येंच तटतं.

"बरोबर आहे."

"अहो आपलीं व्हिक्टोरिया—(तेवढ्यांत मी तिला आपली केली.) आणि त्या मेजर मुजुमदाराची भार्गा शेजारीं शेजारीं उभ्या राहिल्या तर अप्सरेच्या शेजारीं हब्शीण उभी केल्यासारखी वाटेल."

"चहा घेतां?"

त्यानंतर चहा आला. साहेबांसाठीं म्हणून काढून ठेवलेले थंड पोहे गरम होऊन आले. नंतर साहेब आले. पुन्हा चहा आला. सिगरेट आली. त्या मरहूम व्हिक्टोरिया राणीबद्दल एखादा मरहूम रावबहाद्दुर बोलला नसेल अशा उत्साहानें मी ह्या व्हिक्टोरियाविषयीं बोलत होतों. पुढें पुढें तर मेजर, क्याप्टन्, डॉक्टर, बॅरिस्टर अशा उपाधी अजिबात अस्तित्वांत नसलेल्या लोकांच्या आडनांवांना जोडून मी समोरची श्वानी वगळून उरलेल्या साऱ्या श्वानांची आणि मुख्यतः त्यांच्या मालकिणींची यथेच्छ निंदा केली. त्यांच्या नांवावर वाटेल त्या कथा खपवल्या आणि शेवटीं नाना गडबोल्याला त्याचा जांवई दीड हजारांत पाडून दिला. गणपुल्याला एकच मुलगा होता हें दुर्दैव नाहींतर गडबोल्याच्या सातहि पोरी एका घरांत उजवल्या असत्या.

कुत्रा घरांत आला कीं त्याच्या मालकिणीची अक्कल गहाण पडावी असा ईश्वरी संकेतच दिसतो. त्याबरोबर हीं माणसें इतरांचीहि ती बाजू कामांतून गेली आहे असें मानतात. एका दत्तभक्त कुत्रेवाल्यानें आपलें कुत्रें गुरुचरित्र म्हणतें व तें फक्त खऱ्या दत्तभक्तांनाच ऐकूं येतें अशी गोष्ट आणि मेख सांगितली होती. हें कुत्रें कांहीं खात असलें तरच गप्प असायचें. बाकीच्या वेळीं पहांटे भूपाळ्या-मग गुरुचरित्र-दुपारीं दासबोध-संध्याकाळीं शनिमहात्म्य आणि रात्रभर आरत्या म्हणत असावें. आपल्या कुत्र्याच्या अंगांत येतें अशी त्यांची समजूत होती. त्यामुळें तें ज्याला चावतें तो भाग्यवान् असा त्यानें त्या कुत्र्याचा लौकिक पसरवला होता. आणि आपल्या लोकांचीहि कमाल. त्याला ते टिळा लावीत. माळा घालीत. एके दिवशीं मी महाराजांना आमच्या गल्लीच्या नाक्यावरच त्या टिळेमाळासकट एका स्वजातीय गरीब शिष्येवर अनुग्रह करतांना पाहिल्यावर त्यांच्या महाराजपणाची मलाहि खात्री पटली. एवढें धैर्य सामान्य संसारी पुरुषांना कुठलें!

हीं माणसें कुत्र्यांना माणसांत कां आणतात हें मला समजत नाहीं. कुत्र्यांना जें जें कळायला हवें तें कळलें म्हणजे झालें. धोतर आणि चपाती ह्यांतला फरक त्याला कळावा. दिव्याचा खांब त्यानें नीट ओळखावा. समवयस्क कुत्री दिसली कीं आवश्यक पवित्रे कसे टाकावे ह्याचें त्याला जें उपजत ज्ञान असतें तें टिकूं द्यावें. माणसांचा नीतिधर्म त्याच्यावर लादूं नये.

'व्हिक्टोरिया' प्रकरणापासून मी श्वान ह्या पाळीव विषयांत जरा बारीक लक्ष घालायला सुरुवात केली आहे. मोटारींच्या मेक प्रमाणें कुत्र्यांचे मेकहि मला ओळखतां येत नाहींत. पण कांहीं आडाखे बसवले आहेत. उदाहरणार्थ —बंगला आणि आजूबाजूला बाग असलेल्या लोकांकडे जो एक मालकिणीइतका उन्मत्त दिसणारा आणि लांडग्याऐवजीं कुत्र्याच्या जन्माला घातल्यामुळें विधात्यावर सदैव भडकलेला कुत्रा असतो त्याला अल्सेशियन् म्हणतात. हा अल्सेशिया देश किंवा पर्वत जें कांहीं असेल त्याचा पत्ता लावायची माझी फार इच्छा आहे. कारण ह्या वंशाचें तिथें वुध्यांतच कांहीं निर्मूलन करतां आल्यास मी पहाणार आहें. हीं कुत्रीं फक्त दरोडेखोर सोडून इतर सर्वांना दरोडेखोर समजून एकदम नरडीचा घोटच घ्यायला येतात. असल्याच एका अल्सेशियन्वाल्याच्या बंगल्यांत पाहुणा म्हणून रहाण्याचा मला प्रसंग आला. पूर्वी मी कुणाकडेहि उतरत असें. आतां मात्र अनोळखी ठिकाणीं कारणपरत्वें रहायला लागणार असल्यास त्या भावी यजमानाच्या घरीं कुत्रें आणि गाणं शिकणारी मुलगी अगर पत्नी हे दोन उपद्रव नाहींत याची खात्री करून घेऊन नंतरच जातों. त्यापेक्षां मला उडुप्याचें हाटेल चालतें. सकाळीं तेवढा हाटेलच्याच काळजांत चर्र झाल्यासारखा 'डॉऽसाए'चा आवाज आणि वास एवढ्याचा थोडा त्रास होतो. पण तें शिकवणी आणि भुंकणें यापेक्षां बरें. चालू कथेंतल्या अल्सेशनचा आवाज सारें गांव जागवीत होता. दर पंधरावीस मिनिटांनीं हा भुंके. मग मालक दिवे लावीत. आणि हातांत बंदूक घेऊन 'कोण आहे?' असें त्या कुत्र्यावर आवाज काढून विचारीत. दरोडेखोर असल्यास त्यांनीं 'आम्ही पंधरावीस दरोडेखोर आहोंत—तसं कांहीं नाहीं —थोडासा दरोडा घालावा म्हणतोंय्-दिवे












अनुक्रमणिका

काढा आणि कुत्र्याला तेवढी सांखळी घाला बरं का बाबासाहेब!' असें म्हणावें अशी त्यांची इच्छा दिसली. नाहींतर 'कोण आहे?' ह्या प्रश्नाला अर्थ काय होता!

एकवेळ धिप्पाड कुत्र्याची गर्जना परवडली पण बगलेंत घालून पर्ससारखीं न्यायची एक चिंचोळ्या तोंडाच्या केसाळ कुत्रीची जात असते. तिच्या केंकाटण्यापुढें इलाजच नसतो. ह्या जातींत कुत्रा नसावा. सगळ्या कुत्र्याच असाव्या. कारण ह्या भुंकण्याला कानांत सळ्या खुपसल्यासारखी तीव्रता असते. त्या स्वराला कुठें ढालेपणाचा स्पर्शच नाहीं आणि भुंकण्यांत थोडेसे स्वल्पविराम सोडलेत तर इतर विराम-चिन्हेंच नाहींत. 'आमचं मेलं हें नशीब असलं-मेलं कुठें कुठें म्हणून जाणं नाहीं. कांहीं पहाणं नाहीं—काणं नाहीं—सकाळपासून मेलीं भांडीं घासा-धुणीं धुवा' ह्या चालीशीं गरजूंनीं तुलना करावी. शिवाय आपला जीव काय—आपण कुणावर भुंकतोंय याचा कांहीं पांचपोंचच नाहीं. ही टीचभर केसांची टीचभरच अवलाद मोठमोठ्या कुत्र्यांवर भुंकायला लागली कीं, आमचे अशील गंगाबाई भ्रतार कोंडू 'आणि फातमाबी विन इस्माईल रहाणार फेंपरे बुद्रुक' असल्या मजकुरानें सुरू होणाऱ्या नोटि-सांनीं भरलेलें एखादें जिल्हापत्र आपल्या सोळा ओळींच्या अग्रलेखांत '...म्हणून आम्ही श्री. निकिटा खुश्चाव यांस असें बजावून सांगतो कीं, छाप बजा धमकी वाचल्यासारखें वाटतें. ह्याखेरीज पोटानें जमीन खासत जागोरेंहि एक कुत्रें असतें असल्या नळकांडीवजा कुत्र्याला साखळीनें बांधून नेण्याऐवजीं उदबत्तीचा पुडा सुतानें ओढीत गेलेलें काय वाईट! पण कुत्रें जितकें कुरूप तितका त्याचा भाव अधिक हें गणित मला परदेशांत गेल्यावर कळलें. पण मी पाहिलेल्या सगळ्या कुत्र्यांत बुलडॉग इतका कुरूप कुत्रा दुसरा आढळला नाहीं. आयुष्यभर अत्यंत् बाह्यात् व्यसनें केलेल्या तपकिरी वर्णाच्या नकट्या माणसाच्या चेहऱ्यावर पन्नाशी उलटल्यावर येते तसली भीषण कळा ह्या कुत्र्याच्या चेहऱ्यावर असते.

कुत्रीं स्वस्थ बसलीं तर किती साजरी दिसतात कारण इतर प्राण्यांपेक्षां त्याचा चेहरा बराच संवेदनाशील असतो. बहुतेकांच्या चेहऱ्यावर मतें मागायला येणाऱ्या उमेदवाराची लाचारी असते. मधूनच तो कसचं कसचं म्हटल्या-सारखी मानाह उडवूं शकतो. गहन विचारांत गढल्यासारखें दाखवतो. भोंवतालच्या माण-सांच्या गप्पा लांबल्या तर पुढले दोन पाय ताणून 'याऽऽव्' अशी जांभई देऊन 'चला आवरा' असें न भितां जाहीर करतो. कित्येक वेळां माझी आवरलेली आणि त्याची सडेतोड जांभई ह्या जोडीनेंच गेल्या आहेत. कुत्र्यांसारखीं वागणारीं कुत्रीं हीं मला माणसांहूनहि आवडतात. कारण माणसासारखीं वागणारीं माणसें भेटायला आयुष्य खर्चीं पडतें. समोरून गेलेल्या कुत्रीकडे पहाण्यासाठीं मान न वळवतां जाणारीं कुत्रीं भलतीच शिष्ट वाटतात. नाकासमोर जाणारें कुत्रें हें तर कुत्रेंच नव्हे. कुत्र्यानें मागें रहात—पुढें पळत—बाजूच्या गटाराकडे हुंगत—वाटेंतल्या झाडाभोंवतीं प्रदक्षणा घालीतच चाललें पाहिजे. रात्रीच्या वेळीं मुन्सिपाल्टीच्या दिव्याच्या प्रकाशांत चारपांच कुत्रे एखाद्याच प्रेयसीभोंवतीं रिंगण धरतात तें कसें प्रामाणिक वाटतें. कुत्र्यांनीं श्वधर्म सोडायचें कारणच काय? पण हा धर्म त्यांना माणसें लावतात सोडायला. त्यांना साबण लावून आंघोळी काय घालतात—पावडरी काय लावतात—ब्रशानें त्यांचे दात काय साफ करतात. कांहीं उत्साही










माळकिणी• त्यांना लिपस्टिक लावून त्यांच्या डोळ्यांत् सुरमा घालतात असें मी ऐकलें आहे. लिपस्टिकची मला खात्री देतां येत नाहीं पण पूड्ल् कुत्रीचें खुर्चीवर बसवून आरशासमोर चाललेलें केशकर्तन मात्र मीं पाहिलें आहे. इतकेंच काय पण पोनी टेलची फ्याशन रूढ करायला कांहीं घोडया जबाबदार आहेत त्याचप्रमणें—ह्या कुत्र्यांनीं पूड्ल् कट् नांवाची एक स्त्रियांची केशभूषा सुरू केली आहे. तसं पाहिलं तर शेपटा हा प्रकार देखील प्राणीसृष्टींतूनच वनिताविश्वांत आला आहे.

कुत्र्यापासून किंवा घोड्यापासून एखादी फॅशन् शिकणाऱ्या भगिनींवर माझा राग नाहीं पण कुत्र्यांना नाहीं नाहीं त्या गोष्टी शिकवणारांना सोयिस्कर शिक्षा कोणती द्यावी याविषयीं माझा निर्णय अजूनहि पक्का झाला नाहीं. तोंडांत चेंडू किंवा काठी घेऊन जाणारीं कुत्रीं पाहिलीं कीं मला कींव येते. ज्या वयांत बिचाऱ्यानें जोडीदारीण शोधत जावें त्या वयांत त्याला दोन पायावर चालायला शिकवणाऱ्या मालकाला देवानें द्विपादांत कां टाकलें हा मला प्रश्न पडतो. रोजचें वर्तमानपत्र दातांत धरून आणणाऱ्या कुत्र्याला कितीहि नाहीं म्हटलें तरी आपणाहून एकमेकावर अधिक भुंकणारे आणि



रेडिओवरच्या नाटकाला "दुष्यंत" पोट धरधरून हंसला

कडकडून चावा घेणारे प्राणी आहेत याची जाणीव होऊन न्यूनगंड निर्माण झाल्याखेरीज कसा राहील? 'माणसाला कुत्रें चावलें तर ती बातमी नव्हे परंतु कुत्र्याला माणूस चावला तर ती बातमी' ह्या व्याख्येंतून जन्माला आलेलीं वर्तमानपत्रें माणसानेंच माणसाला चावल्याच्या बातम्या घेऊन जातात हें काय त्याला कळत नसेल? ज्या दांतांनीं हाडुक चघळायचें त्या दांतांत—वर्तमानपत्राची सुरळी धरून नेणारें कुत्रें मला पाहवत नाहीं. अशा कुत्र्यांना बिस्कुट टाकून त्याची त्या वृत्तपत्र (नेण्याच्या) व्यवसायांतून सुटका करावीशी वाटते.

कुत्रा हा प्राणी स्वभावानें पाण्यासारखा आहे. त्यांत घालावा तो रंग. सूटबूटवाल्यांचा कुत्रा धोतरवाल्यावर धांवून जातो—बंगल्यांतला झोपडीवाल्यांना चोर समजतो—सांखळी घातली कीं निमूटपणें घरांत रहाणारा कुत्रा मोकळा सोडला कीं मोटर किंवा स्कूटरशीं शर्यत खेळून येतोच येतो. खेड्यांतला ट्रकवाल्याशीं—सायकलवाल्यांशीं खेळतो. पण बैलगाडीच्या फक्त सावलींतून जातो. खेडयांतल्या कुत्र्यांना एकमेकांची भाषा कळत असल्यामुळें एकाच्या सवालाला चारी दिशांतून सगळ्यांचे जबाब येतात. फ्लॅटमधलीं कुत्रीं कॉस्मोपॉलिटन्. त्यामुळें एखाद्याचा 'व्हॅलंटाइन्' भुंकूं लागला तर दुसऱ्याचा 'श्वानसुंदरम्' भुंकेलच असें नाहीं. दिल्लीला तर डेप्युटी सेक्रेटरीच्या कुत्र्यानें शेपूट आर्धी हलवली तरच जॉइंट सेक्रेटरीचें कुत्रें उगीच जरा कान हलवल्यासारखें करतें. सचिवाधमाच्या कुत्र्यानें उपसचिवाच्या कुत्रीची अमर्यादा केली तर 'इन्कायरी' होते. प्रसंगीं बदल्या होतात. अर्थात् हें मीं ऐकलें आहे. कारण प्रमुख, उप, युक्त आणि अधम अशा ह्या सरकारी सचिवश्रेणींत यस्सर्, यस्सर् असें

इतकें चालतें कीं कुठल्याहि सारमेयाला आपल्या लांगूलचालनाविषयींचा अहंकार वाटण्याचें कांहींच कारण नाहीं. कुत्रीं ज्या वातावरणांत वाढतात त्याच्याशीं एकरूप होतात. मांजरासारखीं अलिप्त रहात नाहींत. शिवाजी महाराजांच्या कुत्र्यानें मालकाच्या चितेंत उडी टाकली याचें एकमेव कारण म्हणजे तो काळच मुळीं आत्मसमर्पण निष्ठा ह्यासारख्या बुरसटलेल्या इतिहासजमा गुणांचा होता. आजच्या काळांतल्या कुत्र्यानें त्या नेत्याची सही संपलेली पाहून नवा घरोबा केला असता.

बिचाऱ्या कुत्र्याला नेपोलियन म्हणा, म्याकमिलन म्हणा कीं आणखी कांहींहि म्हणा. त्याचें सुखस्वप्न एकच....सभोंवतीं हाडकांची रास आहे. आपण स्वस्थपणानें त्यांतलेंच एखादें चघळतों आहों. समोरच्या गल्लींतून शेपूट उडवीत एक अंगापिंडानें भरलेली कुत्री येते आहे. मोसम सोहाना आहे...गल्लींतलीं इतर सर्व कुत्रीं मुन्सिपालटीवाल्यांनीं गोणत्यांत पकडून नेलीं आहेत . गल्लींत आतां फक्त ती आणि मी...इतर कुणाचें भुंकणें नाहीं...गुरगुरणें नाहीं...कांहीं नाहीं...कांहीं नाहीं...

असल्या सुखस्वप्नांतच त्याला रंगूं दिलें पाहिजे. ह्या श्वानसमस्येचा मीं खोलवर विचार केला आणि ह्या सगळ्या कुत्रे पाळणारांपुढें आदर्श म्हणून शेवटीं मींच कुत्रा पाळायचें ठरवलें. रीतसर एक कुत्र्यासारखा दिसणारा कुत्रा मिळवला. इतका सुंदर फॉक्स् टेरियर निदान उत्तर मुंबईंत तरी कोणाकडे नसेल. पण हें त्याचें गुणवर्णन म्हणून नव्हे तर वस्तुस्थिति म्हणून सांगणें आलें—खानदानी कुत्र्यांची वागणूकच निराळी. शिवाय त्याला आम्ही इतरांच्या कुत्र्यांसारखं साखळींत घालून ठेवणार नव्हतों. मुक्त स्वातंत्र्य देणार होतों. पण तत्त्वांनाहि कधीं कधीं मुरड घालावी लागते. कारण हें कुत्रं आलें त्या दिवशींच आमच्या घरमालकाला चावलें. ह्या त्याच्या कृत्याबद्दल बिल्डिंगमधल्या मंडळींनीं त्या कुत्र्याचे मालक या नात्यानें माझें गुप्तपणें अभिनंदनहि केलें. पण एकदां कधीं नाहीं ती मनिआर्डर घेऊन आलेल्या पोस्टमनलाच चावल्या-नंतर त्याला नाइलाजानें सांखळी घालावी लागली. त्याचें नांव आम्ही अस्सल भारतीय परंपरेला आणि संस्कृतीला साजेल असेंच ठेवलं आहे. 'दुष्यंत'! घरांत मात्र दुष्यंताचें अजिबात कौतुक करायचें नाहीं असें



अनुक्रमणिका

बजावून ठेवलें आहे. पण 'दुष्यंत' इतक्या लवकर माणसें ओळखूं शकेल याची कल्पना नव्हती. कारण घरीं आणल्यापासून पंधराव्या दिवशीं एका टीकाकाराला चावला. त्यानंतर आठ दिवस तडफडत होता दुष्यंत. वर्ष होत आलें ह्या गोष्टीला. पण आतां मात्र चांगलाच रुळला आहे. त्या अवधींत घरांतल्या सर्वांना चावून झालें आहे. पण त्याची एक संवय आमच्या लक्षांत आली नव्हती. तो अंगावर येवो, कपडे फाडो, ओरखाडे काढो–भुंको—आपण स्वस्थ उभें राहिलें पाहिजे. म्हणजे तो चावत नाहीं. परकी माणसें हालचाल करतात आणि निष्कारण चावून घेतात. वास्तविक दुष्यंताइतकें समंजस कुत्रें मीं कधींच पाहिलें नाहीं. एक तर तें रात्रभर भुंकलें तरी मी बंदूक हातांत घेऊन 'कोण आहे!' वगैरे विचारण्याचा मूर्खपणा करीत नाहीं. शिवाय घरांतल्या वातावरणाशीं इतक्या लवकर समरस होणाऱ्या दुष्यंताच्या भुंकण्याचा आम्हांला तरी अजिबात त्रास होत नाहीं. शेजारच्यांनीं तक्रारी सुरू केल्या आहेत. पण कुत्रें आहे तिथें भुंकणारच!

परवांचीच गोष्ट. कांहींतरी लिहीत होतों पेनमधली शाई संपली. दुष्यंत लगेच आंत गेला आणि दांतांत दऊत धरून घेऊन आला. इतकंच कशाला, रेडियोवरच्या नाटकांतल्या विनोदाला देखील हंसतो दुष्यंत. आमची ही सांगत होती कीं रेडियोवर चिनी हल्ला परतवण्याचीं गाणीं सुरू झालीं कीं त्या तालांत तो पावलें टाकीत लेफ्राइट करतो. परवांचीच गोष्ट...परवांचीच गोष्ट...

हल्लीं आमच्या घरांतली मित्रांची वर्दळ एकाएकीं इतकी कां कमी झाली कळत नाहीं' आणि माणसें मलाहि थोडीं थोडीं टाळायला लागलीं आहेत. मी हिला म्हणालों देखील.

"लोकांना बरं बघवत नाहीं—हो कीं नाहीं रे दुष्यंता—" आणि दुष्यंत चक्क 'नाहीं तर काय!' असं म्हणाला. परवांचीच गोष्ट. अगदीं परवांची!






**अत्यंत अल्पावधींत लोकप्रिय झालेल्या**
**दीपावली बुद्धिबळ क्र. १चे विजेते.**

१. सौ. मालतीबाई नामदेव सुर्वे,
जी. के. रोड, दादर, मुंबई १४.
२. सौ. निर्मला पी. शिंदे, रुद्रपुरा, सुरत–१.
३. कु. चित्रा श्री. केळकर, सांताक्रुझ, मुंबई.
४. श्री. बळीराम महादेव पवार,
चंदनवाडी, मुंबई–२.
५. प्रतापराव बी. शिंदे, गिरगांव मुंबई–४

*विजेत्यांना बक्षिसें पाठविण्यांत येत आहेत.*
क्र. २चें बुद्धिबळ नोव्हें. अंकांत देण्यांत येईल.










